लें आहे.

त्याचा स्तुति कर्ता लिहितो कीं, "आह्मी त्याचे गुणाकडे कोठें जरी पाहिलें, तरी वास्तवीक स्तुति करावयाजोग्या गोष्टी बहुत आढळतील. त्याचे पूर्वी इंग्लंड देशांत जे राजे झाले, त्यांतून कोणी त्याचे इतका वांचला नव्हता, व कोणी त्याचे इतकें सुख भोगिलें नव्हतें. त्याचे अंमलाखालीं त्याच्या प्रजा व्यापारांत, व कळाकौशल्यांत वाढत होत्या, आणि त्यानें आपण थोडा खर्च करून लोकांसही तसें करण्याचा उपदेश केला, परंतु तो त्यांनीं चालविला नाहीं. त्याचा स्वभाव उतावीळ आणि रागीट होता, परंतु त्यापासून त्याचे वर्तणुकींत कांहीं फेर नव्हता, तो विचारानें वागत असे, तो मनाचा उघड, सरळ, वचनाचा खरा, चाकरांवर प्रीति करणारा, तो इतकाकीं बखेडा बहुत होऊन अगदीं जरूर होई तंवपर्यंत त्यानें आपले प्रधानासही सोडिलें नाहीं, असा तो होता. सारांश त्यानें जन्मभर उपयोगी आणि चांगला होण्याविषयीं प्रयत्न केला."

असें वर्णन त्याचे मित्रांनीं केलें आहे; परंतु दुसऱ्यांनीं तें फिरविलें आहे." त्याची बुद्धि, व गुण यांची स्तुति आमच्यानें करवत नाहीं. त्यास आपले जन्म देशा-

चें बळकट अगत्य होतें, त्यामुळें दुसऱ्या सर्व गोष्टी तो एकीकडे ठेवीत असे. तो आपण स्वतः विद्वान् होता, आणि इतरांच्या विद्येचाही तिरस्कार करीत असे. त्याचे राज्यांत गुणी लोक फार झाले, परंतु त्याचे आश्रयानें झाले नाहींत. तो इतका थोडा खर्च करीत असेकीं, त्यास कृपण म्हणावें; आणि तो आपलेच साठीं संग्रह करीत असे, आपले प्रजांसाठीं नाहीं. त्यामध्यें मोठा असा एकही गुण नव्हता, आणि तो कित्येक हलकीं कर्में आचरण करीत असे, अशी प्रसिद्धि आहे."

या दोहोंतून कोणतें वर्णन खरें, किंवा दोहोंतलेंही कांहीं कांहीं खरें, याचा विचार माझ्यानें सांगवत नाहीं.

द्वितीयभागसमाप्त

# प्रकरण ३६.

## तृतीय जार्ज राजाची कथा.

सन १७६० पासून १८२० पर्यंत.



द्वितीय **जार्ज** राजाचे मरणा नंतर त्याचा नातु तृतीय **जार्ज** राजा राज्य करूं लागला. त्याचा बाप लहानपणींच मेला होता. प्रथम त्यानें **नवेंबर** महिन्यांत **पार्लमेंट** सभेस बोलावणें केलें. तिनें **सिविल्लिस्त** याची नेमणुक प्रतिवर्षी ८००००० **पौंड** करून दिली. पुढले वर्षी लढाया वगैरे चालविण्याचे सारे खर्चाचा आकार एक कोटि शाण्णव लक्ष सोळा हजार एकशें एकुणीस **पौंड** झाला, तितकाही पैका त्या वेळचे लढायांकरितां पाहिजेच होता.

**रोमन क्याथोलिक** धर्माचे बायकोशीं राजानें लग्न करूं नये असें होतें, म्हणून **जर्मनी** देशाचे वायव्येस, एक लहान राज्यांतील **मेकूलेन्बर्ग स्त्रिलिनस्** या नांवाचे वंशाचे राजे राज्य करीत होते, त्यांतून

एके बायकोशीं त्यानें लग्न केलें. लग्नाचा समारंभ सप्तं- १७६१
बर महिन्याचे आठवे तारिखेस झाला; व त्याच महिन्या-
चे बाविसावे तारिखेस वेस्त्मिन्स्तर आबे यांत रा
ज्याभिषेक झाला.

यावर्षामध्यें युरोप देशांत कांहीं मोठी लढाई झाली नाहीं. हिंदुस्थानांत बंगाल्याचे नबाबास राज्यावरून काढून त्याचे जांवयास त्याचे जागेवर नेमिलें.

नंतर राज्याचा प्रधान पिट साहेब शत्रूंचे दावे व लबाड्या यांचा शोध करूं लागला. त्याचे लक्ष्यांत होतेंकीं, स्पानिश सरकारानें पूर्वी फ्रेंच लोकांविषयीं उदासीनपणा राखणें कबूल केलें होतें, तरी, त्यांचा तिकडे पक्ष आहे. पुढें त्यास गुप्त बातमीदारांचे द्वारें शोध लागला कीं, फ्रेंच सरकार व स्पानिश सरकार यांचा तह झाला; आणि यावरून त्याचे लक्ष्यांत आलें कीं. ते लवकरच इंग्लिश लोकांशीं युद्ध करण्याची उघड प्रतिज्ञा करितील. म्हणून त्यानें बेत केलाकीं, जर स्पानिश सरकारानें इंग्लिश यांची खातरी केली नाहीं, तर त्यांचें अरमार घ्यावें किंवा दुसरा कांहीं त्यांचा नाश करावा; म्हणून आपण मेदितरेनियन समुद्रांत अरमार पाठवावें. पिट साहेबाचा इतर प्र-

धानांशीं द्वेष होता, आणि त्याचे तेजाखालीं राज्यांतील मोठे मोठे जुने मातबर कुटुंबाचा मान कमी होत चालिला होता, म्हणून अर्लटेंपूल या वांचून इतर सर्व प्रधानांनीं हा बेत चालूं दिला नाहीं. त्यामुळें पिट साहेब अर्लटेंपूल यांनीं आपलीं कामें सोडिलीं. पिट साहेबानें सरकारचें काम चांगलें केलें, म्हणून त्यास तीन पिढ्यापावेतों ३००० पोंड वर्षास नेमणुक करून दिली, व त्याचे बायकोस बारोनेस चाथम असा किताब मिळाला.

पिट साहेबानें काम सोडिल्यानंतर कांहीं महिन्यांनीं कळूं आलें कीं. त्याचे मनांतील संशय खरे होते. हें कळावयास कारण असें झालें कीं, स्पानिश दरबारांतील इंग्लिश वकील अर्ल ब्रिस्तल यानें, ज्या वेळेस त्यांचा आणि फ्रेंच यांचा आंतून तह झाला तो पहावयासाठीं, व फ्रेंच यांस त्यालढाईत मदत करावयाविषयीं स्पानिश यांचे मनांत काय आहे हें कळण्यासाठीं, यत्न आरंभिला, तेव्हां त्याची कांहीं खातर झाली नाहीं, म्हणून तो वकील निरोप न घेतां तेथून निघून आला.

पुढें जुने पार्लमेंट सभेस निरोप होऊन नवी

सभा झाली, तींत असें ठरलें कीं, राणी जर राजाचे मागें वांचली, तर तिला १००००० पौंड नेमणुक व सामर्सेट वाडा द्यावा. पुढें त्या वाड्याचा व बकिंगम हौस याच्या बद्दल केला. पुढले वर्षाचा पुरावा त्या वर्षाचे पुराव्या पेक्षां दहा लक्ष पौंड कमी झाला.

पिट साहेबानें काम सोडिलें तंवपर्यंत प्रधान पूर्वीचे राज्याचे शेवटीं जसे होते तसेच होते. राजाचे प्रीतींतला लार्ड ब्यूट यास अर्ल होल्डर्नेस याचे जागेवर राज्याचा सेक्रतारी नेमिलें होतें. परंतु पुढें पेलम वंश फार समर्थ झाला, हें समजून अशी युक्ति केली कीं, ड्युक न्यूक्यास्तिल् यास आपली प्रधानाची जागा सोडावी लागली. मग त्या जागेवर लार्ड ब्यूट याची नेमणुक झाली. या दोघांचे पक्षपाती लोकांमध्यें त्या मुळें फार द्वेष वाढत चालिला.

ड्युक न्यूक्यास्तिल् यामध्यें मोठे गुण कोणते नव्हते, परंतु तो स्वच्छ मनाचा, उदार, निष्पक्षपाति, दाता, असा होता, त्यानें आपणाकरितां व आपले कुटुंबाकरितां नेमणुकी व जागा मिळवून ठेविल्या नाहींत; आणि राजाची प्रतिष्ठा व राज्याची शोभा रहाण्याकरितां आपली संपत्ति भरीस घा-

तली. त्यास काम सोडिल्यानंतर नेमणुक करून देऊं लागले, तेव्हां त्यानें उत्तर केलें कीं, आपले देशाकरितां मी माझी एवढी संपत्ति खर्च करून आतां लोकांवर भार घालणार नाहीं.

इकडे लार्ड ब्यूट यामध्यें गुण व चांगली बुद्धि होती, परंतु त्याचा स्वभाव भला नव्हता, जो स्वभाव असल्या वांचून इंग्लंड देशांतील प्रधानावर लोकांची प्रीति असत नाही. तो विद्वान् होता, म्हणून जर त्यानें पूर्वीची जागा सोडिली नसती, तर विद्वानास आश्रय दिल्यानें त्याची कीर्ति झाली असती. परंतु तो राज्य कारभारांत पडल्यामुळें त्यास अडचण पडली, आणि राजावर लोकांची प्रीति कांहीं कमी झाली.

तथापि लढाया पूर्वी सारिख्याच निकरानें चालिल्या होत्या. स्पेन देशाचे संस्थानांवर दोन लढाया आरंभिल्या. एक मेक्सिको प्रांताजवळचे समुद्रांत हावाना बंदरावर; व दुसरी पूर्वेस मानिला शहरावर. त्या दोहोंत ही इंग्लिश यांचा जय झाला. पहिले लढाईतील लुटीची किमत तीस लाख पौंड झाली; दुसरें ठिकाण दहा लाख पौंड द्यावयाचें करून स्पानिश यांनीं सोडविलें, परंतु तो पैका कधीं दिला नाहीं. त्यावेळेस इंग्लिश यांचा साथी प्रशिया देशाचा राजा

होता, यानें त्या लढाईंत कीर्ति राहावया जोगा पराक्रम केला. त्यास कांहीं दिवस शत्रूंचे उपद्रवापासून फार भय झालें होतें; परंतु दैववशात् कांहीं गोष्ट घडून त्याचा निभाव लागला. ती गोष्ट अशी. रशिया देशाची राणी इलिझाबेथ मेली, आणि त्या देशांत तिचा पुतण्या तिसरा पीटर राजा झाला. त्यानें प्रशिया देशचे राजाशीं तह करून त्यास शत्रूंशीं लढाई करण्यास मदत केली; परंतु या कृत्यानें प्रजांचा रोष त्यावर झाल्यामुळें तो पदच्युत होऊन बंदीस पडला; व लवकरच मेला. त्यानंतर त्याची बायको राज्य करूं लागली, तिनें आपले नवऱ्याचा बेत सोडून देऊन प्रशिया देशचे राजा कडची आपली फौज परत आणविली; परंतु त्याशीं पुनः लढाई चालू केली नाहीं. या रीतीनें त्या राजाचा एक मोठा शत्रु गेल्यावर बाकीच्यांचें निवारण करावयास त्यास अधिक सामर्थ्य आलें.

ही लढाई फार चांगली सिद्धीस गेली, व इंग्लिश यांची तीपासून कीर्तिही झाली. सात वर्षांत सर्व उत्तर अमेरिका देश ग्रेटब्रिटन याचे ताबेखालीं आला. पंचवीस मोठीं व उपयोगी ठिकाणचीं बेटें स्वाधीन झालीं; समुद्र व जमीन यांतून बारा लढायांत

जय झाला, सुमारें पन्नास किल्ले व शहरें हाताखालीं आ-
लीं; शत्रूंचीं लढाऊ जहाजें शंभरांवर घेतलीं व मोडलीं;
व एक कोटि वीस लाख पौंड लूट सांपडली. इतका च-
ढाव झाला असतांही ब्रिटन देशाचे सरकारचे मनांतू-
न तह नकरावा असें नव्हते. अमेरिका एथील संस्था-
नें निर्भय व्हावीं म्हणून ही लढाई आरंभिली होती,
ती गोष्ट चांगली सिद्धीस गेली.

ब्रिटिश सरकारास पैका बहुत उत्पन्न होत
असे खरा, परंतु खर्च आपेक्षां अधिक होई, व लोक-
मिळावयास फार पैका पडत असे. दुसरे लढाई करणा
रे सरकारांसही तह करण्याचें जरूर झालें. फ्रेंच यांचें
सारें आरमार नाहींसे झालें, व राज्यांतील पैका आणि
लोक गेले. स्पानिश सरकास भय उत्पन्न झालें कीं, पुढें
लढाई चालिली असतां आपला नाश होईल, व पो-
र्तुगल्ल देशाचा फार नाश झाला होता. या कारणामुळें
सर्वांचे मनांत तह करावा असें आलें, व तहाचें बोलणें
इ.स. १७६३ पारिस शहरांत चालू झालें. कांहीं बोलणीं होऊन शेवटीं
फेब्रुआरी महिन्याचे १० तारिखेस तह ठरला. ह्यावा
ना याबद्दल ब्रिटिश सरकारास फ्लारिडा प्रांत दिला.
दुसरी क्यानडा, केप ब्रिटन, टोबेगो, डोमिनिका,

सेंट विन्संट ग्रीनेडास व आफ्रिका खंडाचे कांठावरी-
ल सिनिगाल इतकीं ठेऊन बाकीचा जो मुलुख घेतला
होता, तो परत दिला. पुढें लवकरच हंगरी देशाची रा-
णी व प्रशिया एथील राजा यांचाही सल्ला झाला, आ-
णि सर्व युरोप खंडांत पुनः स्वस्थता झाली. लढाई सं-
पली तेव्हां इंग्लिश सरकारास चवदा कोटि ऐशीं ल-
क्ष कर्ज होतें, व त्याचें व्याज दरवर्षास पन्नास लाख पौं
ड होत असे.

लार्ड ब्यूट याची नेमणूक झाली तेव्हां प्रथमच
ती पक्षपातानें झाली असा बोभाट झाला होता;
आणि तो वाढतां वाढतां शेवटीं सैडर (मद्याचा
एक प्रकार) यावर कर बसविला, त्यामुळें त्याचा नाश
झाला. त्यानें आपली जागा एप्रिल महिन्यांत सोडिली;
व त्या जागेवर पुढें जार्ज ग्रान्विल साहेबाची नेमणुक
झाली. पुढें शस्त्रांची लढाई बंद होऊन लिहिण्यांची ल-
ढाई चालू झाली. राजास विरुद्ध जे त्या वेळेस कागद
वगैरे छापिले गेले, त्यांत नार्थ ब्रिटन या नांवाचें एक
वर्तमानपत्र विल्कस् साहेब छापीत असे; त्याचे ४५
वे कागदांत त्यानें, राजानें पार्लमेंट सभेंत भाषण केलें
त्याची फार निंदा केली होती. त्यावरून त्यास व छाप-

णारांस धरून चौकशी झाली, आणि कामन्स सभेंत असें ठरलें कीं, नार्थ ब्रिटन याचा ४५वा कागद लबाड, फितूरी, व खोटा असा आहे. पुढें त्यास जान्युआरी महिन्यांत कामन्स सभेंतून काढून दिलें; आणि कांहीं फिर्यादींचे जाब देण्याकरितां बोलावणें केलें, तेव्हां तो आला नाहीं, म्हणून तो औटला असें प्रसिद्ध केलें. त्यामुळें, आपणास राज्याचा सेक्रतारी यानें निःकारण बंदींत ठेविलें म्हणून त्याची फिर्याद होती, ती रद्द झाली. असा प्रधान आणि विल्कूस साहेब यांमध्यें तंटा झाला, त्यापासून पार्लमेंट सभेंत असें ठरलें कीं, जनरल वारंट हीं कायद्या प्रमाणें नाहींत; आणि पुढें कोणास धरून आणणें असल्यास वारंट यांत त्याचें नांव लिहिलें पाहिजे. त्यावर्षी राजाची वडील बहीण प्रिन्सेस आगस्टा इचें आणि ब्रन्सविक प्रांताचा प्रिन्स याचें लग्न झालें.

इ० स० १७६४ (margin note beside the lines beginning "री महिन्यांत" and "कांहीं फिर्यादींचे")

दुसरे बाहेरचे देशांत यावर्षी कांहीं मोठ्या गोष्टी झाल्या नाहींत. कौंट पोन्याटोस्की म्हणून पोलंड देशांतील रहाणारा होता, त्यास त्या राज्यांतील राजा नेमिलें. पूर्वीं सन १७३९ त रुशीया देशाचे सिंहासनावर इवान किंवा जान यानांवाचा कोणी पुरुष बसला

होता, त्यास तेथून लवकरच काढून बंदींत ठेविलें होतें, त्यास रखवाली लोकांनीं मारिलें. सुमारें चाळीस इंग्लिश लोकांस हिंदुस्थानांत बंगालचा पदच्युत सुभेदार काशीम अलीखान याचे आज्ञेनें, व कंपनी सरकारचे फौजेंतून सोमर्स या नांवाचा कोणी पळून गेला होता त्याचे हातानें मारिलें.

दुसरे वर्षाचे प्रारंभीं कांहीं वर्तमान घडलें, त्या इ.स. १७
पासून युरोप व उत्तर अमेरिका या देशांचा फार नाश झाला. तें वर्तमान हेंकीं, अमेरिका देशांतील इंग्लिश संस्थानावर स्टांप आक्ट म्हणून कर बसविला; परंतु तो त्यांनीं सर्व संमतानें मान्य केला नाहीं, व दुसरें सेशन यांत रद्द झाला. असतांही त्यांस त्याची विसर पडली नाहीं.

त्या वेळेस लोकांमध्यें पक्षपात फार झाल्यामुळें एक मोठा तोटा झाला. तो हाकीं, वारंवार प्रधान आणि राज्यमसलती यांमध्यें फेरफार होऊं लागले. त्यामुळें बाहेरचीं राज्यें इंग्लिश लोकांशीं तह करण्यास राजी होईनात, व राज्यांतील लहान पदवीचे लोक सरकारास मानीनात असें झालें. ही गोष्ट राज्य चांगलें चालण्यास फार विघ्न करिते. असे फेर होण्याचे रीतीप्रमाणें ग्रान्विल साहेबाचे जागेवर राकिंगम एथील मार्कुइस यास प्रधान ने-

मिळे. तो मनाचा स्वच्छ, निर्लोभी, आपले देशाचें बरें इच्छि- णारा, आणि मध्यम बुद्धीचा होता. या नवे प्रधानांनीं, पूर्वी चे प्रधानांनीं जें काय केलें होतें तें मोडलें, आणि त्यांनीं के- लें होतें तें त्यांचे पुढले प्रधानांनीं मोडलें. या वर्षांत कांहीं बहुत व मोठीं वर्तमानें घडलीं नाहींत. जर्मनी देशाचा एंपरर मेला त्याचे जागेवर पुढें प्रिन्स जोझफ राज्य करूं लागला. फ्रान्स एथील प्रिन्स, इंग्लिश राजाचा चु- लता कंबर्लंड याचा ड्युक, त्याचा लहान भाऊ प्रिन्स- विलियम फ्रेदरिक, हे, व फ्रानाचा प्रिटेंडर रूम शहरां- त सत्याहत्तरावे वर्षी मरण पावला.

तेहमी प्रमाणें नवें वर्ष लागतांच नवे प्रधान झा- ले. मार्कुइस राकिंगम याच्या जागेवर ड्युक ग्राफ्ट- न नेमिला. राज्याचें सारसब पिट साहेबाचे स्वाधीन केलें, आणि त्यास अर्ल चाथम असा किताब दिला.

या वर्षी हिंदुस्थानांत कंपनी सरकारचे राज्यांत त्यांचे चाकरांचे लोभामुळें फार धांदल झाली होती. ते न जर या नांवानें तेथील राजांपासून बहुत पैका घेऊं लागले, म्हणून त्या लोकांस त्रास उत्पन्न होऊन ते सर्व एकत्र मिळू- न इंग्लिश लोकांस बाहेर काढून देतील असें भय उत्प- न्न झालें. यास उपाय करावयाकरितां लार्ड क्लैव यास

हिंदुस्थानांत पाठविलें. आणि त्यानें लवकरच मोगलाईशीं तह करून कंपनी सरकास रोकड सत्रा लक्ष पौंड वसूल यावा असें केलें. त्यानेंही आपण बहुत पैका मिळविला, परंतु आपले मुलुखाची मोठी चाकरी तरी केली.

पार्लमेंट सभेनें हुकूम केलाकीं, बादशाही फोजेस सामानाचा पुरावा अमेरिका देशांतील संस्थानांनीं करावा. हा हुकूम न्यूयार्क संस्थानानें ऐकिला नाहीं, म्हणून पार्लमेंट सभेनें दुसरा हुकूम केला कीं, पहिल्या हुकुमाप्रमाणें वर्तणूक झाल्याचे पूर्वीं त्या प्रांतांतील सभेनें नवे कायदे करूं नये. या प्रतिबंधास मान्य न होऊन अमेरिकन लोकांनीं इंग्लंड देशांतून माल आपले देशांत येऊं नये म्हणून कानू करण्याचा आरंभ केला.

त्या पार्लमेंट सभेचा नेमलेला वेळ संपला, म्हणून तीस निरोप देऊन दुसरी करण्यासाठीं प्रांतोप्रांतीं हुकूम गेले. तेव्हां कांहीं गडबड नहोतां सगळे प्रांतांत नेमणुकी झाल्या. प्रेस्तन प्रांतांत व आणखी कांहीं ठिकाणीं मात्र लोकांनीं कांहीं दांडगाई केली. सन १७६३चे वर्षीं विलकूस साहेब ज्यास औट्लॉ असें प्रसिद्ध केलें होतें. तो तेव्हांपासून बाहेर देशांत होता, त्यानें आतां परत येऊन मिडूलसेक्स प्रांतांतील सभासदाचे जागे-

साठीं यत्न केला. त्याविषयीं बहुत लोकांचें संमत पडून त्यास नेमिलें. या रीतीनें पार्लमेंट सभेंत जागा मिळाल्या. वर ज्यानें आपणास औटला असें केलें होतें, तें किंग्स बेंच् कोर्ट यासमोर तो आपण स्वयें आला, म्हणून कोर्ट यानें आपला पूर्वींचा हुकुम फिरविला. आणि त्यानें दोन वर्षेंपर्यंत कैदेंत रहावें, आणि एक हजार पौंड दंड द्यावा असें ठरविलें. त्यानें राज्याचे स्वतंत्रतेसाठीं शासन सोसलें असें समजून लंडन शहरांतील कांहीं व्यापाऱ्यांनीं त्याचा दंड देण्याकरितां, कैदेंत त्याचा निर्वाह होण्याकरितां, आणि त्यास सुमारें वीस हजार पौंड कर्ज होतें त्याची तोड करण्या करितां, एक टीप केली; आणि शेवटीं हीं सर्व कामें घडून आलीं.

हा मिड्ल्सेक्स प्रांतांतील नेमणूक व तीपासून जो पुढें द्वेष वाढला तो, अमेरिका देशांत लढाई होण्यास थोडा बहुत कारण झाला; त्यापासून राज्यासंबंधी वर्तमानांत उलट पालट झाली; प्रधानांत अकस्मात् फेर फार पडूं लागला; कधीं व्हावयाचे नव्हत असे विचार होऊं लागले, इंग्लिश यांची आंतलेआंत फूट पडूं लागली; आणि लोकांची सरकारावर प्रीति नाहीं अशी झाली. ही संधी पाहून त्या सरकारचे तांबेंतील संस्थानें बाहेर

देशांत होती, त्यांनीं नवे हक्क आणि सत्ता मागण्याचा आरंभ केला.

यावर्षीं लोकांस शिल्प, मूर्तिकोरण्याची विद्या, आणि चित्र कढणें हीं शिकविण्याकरितां राजानें रायल आक्याडेमी या नांवाची मोठी शाळा उत्पन्न केली. पूर्वीं बहुत दिवसांपासून कारागीर लोकांनीं अशी एक मंडळी केली होती. आणि त्या त्या कळा पूर्णपणास आणिल्या होत्या; म्हणून या नवे मंडळीपासून दुसरें कांहीं झालें नाहीं; कारागिरांत पक्ष मात्र पडले, परंतु त्या दोन शाळा शेवटीं एक झाल्या.

ब्रिटन आणि अमेरिका देशांतील संस्थानें, यामध्यें जो तंटा होता तो नवीं नवीं कारणें होऊन वाढत चालिला. त्यावेळेस नुकतेंच पार्लमेंट सभेचे हुकुमावरून असें ठरलें होतें कीं, इंग्लंड देशांतून अमेरिका देशांतील बंदरांत कांच, कागद, वगैरे जो जिन्नस जाईल त्यावर कांहीं हक्क बसवावा, आणि तो घेण्याकरितां सर्व बंदरांत चौक्या ठेविल्या होत्या. या रीतीनें आपला स्वतंत्रपणा जाऊं लागला असें समजून अमेरिकन लोकांनीं पूर्वीं जसा कर बंद होईपर्यंत इंग्लिश जिन्नस देशांत खर्चूं नये असा ठराव

निश्चय केला होता, तसा आतां उघड केला. हें सिद्धीस जाण्याकरितां बोस्तन शहरचे सभेनें इतर सभांस पत्रें पाठविलीं कीं, सर्वांच्या मसलती एकसारिख्याच असाव्या. या कृत्याकरितां बोस्तन शहरचे सभेस निरोप दिला, आणि दुसरी सभा नेमिली; परंतु तिचाही तसाच आग्रह पाहून तिलाही निरोप दिला. त्या जकातीचे कारभारी, यांस लोकांनीं इतका उपद्रव केला कीं, ते शहर सोडून फोर्ट विलियम किल्यावर जाऊन राहिले. सारांश, बोस्तन शहरांतील लोकांस इतका संताप आला कीं, हालिफाक्स शहराहून पायदळाच्या दोन पलटणी, व तितक्याच अयर्लंड देशांतून तिकडे पाठविणें जरूर पडलें.

तेव्हां एशिया खंडांतही नवेंच वर्तमान घडलें. हैदर अली म्हणून कोणी शिपायाचे पायरीपासून चढून राजा झाला होता. त्यानें कंपनी सरकाराशीं लढाया आरंभिल्या, आणि जुने सर्व नबाबांपेक्षां त्यांस फार उपद्रव दिला.

अशीं बाहेर वर्तमानें घडत असतां, इंग्लंड देशांत नवे पार्लमेंट सभेचे वेळेस विल्कस साहेब इतरांप्रमाणें सभेंत बसेल, असें समजून तो बंदींत हो-

ता तेथून कामन्स यांचे सभेंत नेण्याकरितां लोक जमले. तेथें लवकरच सरी प्रांतांतील न्यायाधीश आले, आणि त्यांनीं रयट* आक्ट वाचिलें, परंतु लोक जाईनात म्हणून फौजेस बोलावून बंदुका चालु करण्याचा हुकुम केला, कित्येकांस थोडी दुखापत झाली, दोघां तिघांस मरावया सारिखी झाली, व एक तेथेंच ठार मेला. या कामांत त्यांनीं धीरानें वर्तणुक केली, म्हणून सरकारचा सेक्रतारी लार्ड वे मौथ यानें त्या न्यायाधीशांस स्तुतिपत्रें पाठविलीं. विल्कस साहेबानें तें सर्व वर्तमान पाहून त्या प्रसंगीं प्रधानाची फार निंदा केली; त्यानें पुढें लार्ड वे मौथ याचें पत्र आणि त्यावर आपण कांहीं लिहून प्रसिद्ध केलें; त्यांत बंदिखान्याजवळ जी गोष्ट घडली ती वास्तवीक खून असें लिहिलें. या कारणामुळें त्यास पार्लमेंट सभेंतून काढिलें. मिडूल सेक्स प्रांताचे लोकां-

---

* लोकांचा दंगा बंद होण्यासाठीं सरकारी फौज वगैरे जाते, तिनें लोकांवर गोळी मारण्याचे पूर्वीं, सरकारी कामगार, लोकांनीं आपापले घरीं जाण्यासाठीं जो कायदा वाचतात तो.

नीं फिरून त्यास सर्व संमतानें नेमिलें. ही नेमणुक रद्द करून फिरून हुकुम पाठविला. लोकांनीं फिरून ही आग्रहानें सर्व संमत होऊन त्यासच नेमिलें. तीही नेमणुक **पार्लमेंट** सभेनें रद्द केली, आणि या रीतीनें लोंकांचें नेमणें व **पार्लमेंट** सभेचें रद्द करणें नेहमी नचालावें, याकरितां **लार्ड इर्नम** याचा मुलगा **कर्नेल लत्रल** याकडून **पार्लमेंट** सभेंतील जागा सोडवून त्या प्रांताचे जागे साठीं यत्न करविला. त्याकडे २९६ लोकांचीं समतें पडलीं, आणि **विल्क्स** साहेबाकडे ११४३ लोकांचीं पडलीं, तरी **कामन्स** सभेंत **लत्रल** साहेबाकडे अधिक संमतें पडून तोच मुकरर झाला.

या गोष्टीपासून राज्याचे स्वतंत्रपणाचा फार नाश होईल असें लोकांस वाटूं लागलें. इतके दिवसपर्यंत या नेमणुकीचा **विल्क्स** साहेब, व त्याचे शत्रु यांशीं मात्र संबंध होता, परंतु आतां ती पासून सर्वांस भय पडलें कीं, या नेमणुकीपासून आमचे हक्क बुडाले. यामुळें प्रथम अर्ज्या, आणि पुढें फिर्यादी राज्यांतील सर्व प्रांतांतून येऊं लागल्या. त्यांतून कित्येक मोठे धीरानें आणि कित्येक द्वांडगेपणानें लिहिलेल्या होत्या. त्यांनीं विनंती केलीकीं **पार्लमेंट** सभेस निरोप द्यावा.

आणि स्पष्ट लिहिलें कीं ही पार्लमेंट सभा कायद्याप्रमाणें नव्हे.

असें तेव्हां सरकार मोठे संकटांत पडलें. त्यानें लोकांस अशा अर्ज्या करावयासारिख्या गोष्टी करूं नये होत्या, आणि केल्यातर लोकांचे उद्धतपणासाठीं शासन करावयाचें होतें. परंतु त्यास इतकी हिंमत झाली नाहीं, आणि त्याचे अशे भित्रेपणामुळें लोकांमध्यें राज्याचा तिरस्कार उत्पन्न झाला, आणि त्याचें फळ लवकरच असें आलें कीं, बाहेरचे लोक इंग्लिश सरकारास फार मानितात असें झालें, आणि अमेरिकन लोकांनींही सरकारचें भय सोडिलें.

यावर्षीं पार्लमेंट सभेंतील लोकांचे नेमणुकीसंबंधी तंट्याचा कामन्स यांचे सभेंत विचार होण्याची जी रीति होती, तिच्या बंदोबस्ताकरितां एक मोठा कायदा झाला. पूर्वीं या तंट्यांचा विचार सर्व सभा करीत असे, आणि फारकरून प्रधानांचा पक्ष सिद्धीस जाई. परंतु आतां ग्रान्विल साहेबाचे सांगण्यावरून असा कायदा ठरला कीं, अशे तंट्यांचा विचार तेरा आसामीनीं ठरवावा, आणि ते असामी दैवानें ज्यांची नेमणुक होईल असे असावे. हा कायदा केल्यापासून

पक्षपाताचा संशय वास्तवीक कधींही झाला नाहीं.

सांप्रतचे प्रधानाचीं प्रथम लार्डचाथम यानें राजाजवळ शिफारस केली होती, आणि तेही कांहीं वेळपर्यंत त्याचे मसलतीनें चालत असत; परंतु पुढें ते त्यास पूर्वीसारिखे विचारीनात असे झाले, म्हणून लार्डचाथम यानें आपली प्रधानाची जागा सोडून दिली, तीवर पुढें अर्लब्रिस्तल याची नेमणुक झाली. नंतर ड्युक ग्राफूटन याचे मुख्य प्रधानाचे जागेवर लार्डनार्थ याची नेमणुक झाली. या रीतीनें जुने प्रधान जाऊन नवे झाले, त्यांनीं अमेरिका देशांत कांहीं गरज नसतां लढाई आरंभिली, ती शाहाणपणावांचून आणि धीरावांचून चालविली; आणि शेवटीं फार अप्रतिष्ठा आणि तोटा होऊन संपविली.

पूर्वी स्वदेशांतील कारभार चालविण्यांत प्रधानांनीं जसा भित्रेपणा दाखविला होता, तसा ते आतां बाहेरचे राज्यनीतींत करूं लागले. त्यांनीं मेडितरेनियन समुद्रांत एक कार्सिका म्हणून बेट आहे, तें फ्रेंच लोकांस घेऊं दिलें. तें बेट पूर्वी जिनोईस लोकांजवळ होतें; परंतु त्यांनीं क्रूरपणा केल्यामुळें ते

थील लोकांनीं बंड करून त्यांची सत्ता नाहीं अशी करून आपला देश स्वतंत्र केला. म्हणून जिनोईस लोकांनीं तें फ्रेंच यांचे स्वाधीन केलें, आणि त्यांनीं तें लागलेंच घेतलें, परंतु त्या लढाईंत त्यांचे दाहा हजार लोक, आणि एक कोटि ऐशीं लक्ष लिवर* इतका खर्च झाला.

बहुत लोकांचे मनांत होतें कीं, फ्रेंच लोकांचें राज्य वाढण्यास इंग्लिश यांनीं विघ्न करावें; परंतु ते अमेरिकन लोकांशीं लढाई करण्याचे कामास लागले होते, म्हणून त्यांनीं कांहीं तो उद्योग केला नाहीं.

पुढें लंडन शहरांत असें झालें कीं, कामन्स सभेचा एक शिपाई सभासदांचीं भाषणें कोणी एके छापणारानें प्रसिद्ध केलीं, म्हणून त्यास धरावयास शहरांत गेला. त्या छापणारानें एक कान्स्तेबूल यास बोलावून आणिलें, आणि त्यानें त्या दोघांसही लार्डमेयर क्रास्बि याजवळ नेलें. तो क्रास्बि साहेब, व आलडर्मान विल्कस आणि आलिवर यांनीं इ. स. १७७१

---

* लिवर म्हणून फ्रान्स देशांत एक नाणें आहे. त्याची किंमत सुमारें अर्ध रुपया आहे.

मिळून त्या छापणारास सोडून दिलें. आणि माजिरे ट याचे हुकुमावांचून आपणास धरण्याचें कारण काय, असे त्या छापणाराचे फिर्यादीचा जाब देण्याकरितां जामीन घावा असा शिपायास हुकुम केला. तो त्यानें प्रथम कबूल केला नाहीं, परंतु त्यांनीं त्यास बंदींत ठेवण्याचे हुकुमावर सही केली, म्हणून त्यानें जामीन दिला. असा आपले सत्तेचा तिरस्कार केला असें पाहून कामन्स यांस राग आला, आणि त्यांनीं ते दोन आल्डर्मेन व मेयर यांस हजीर होण्याची आज्ञा केली. क्रास्बि व आलिवर साहेब यांस त्या सभेंत जागा होत्या, म्हणून ते आले; परंतु बिल्क्स साहेब म्हणूं लागला कीं, माझी मिड्ल्सेक्स प्रांताची जागा काईम झाल्याशिवाय मी येणार नाहीं. हा शेवटचा गृहस्थ सांपडावयाचा उपाय कामन्स यांजवळ कांहीं नव्हता, म्हणून त्यांनीं पूर्वीचे दोघांचें मात्र शासन केलें. तें हें कीं त्यांस किल्यांवर सेशन संपेपर्यंत बंदीस ठेविलें.

यावर्षी हिंदुस्थानांत एक मोठा दुष्काळ पडला. त्यामुळें तेथील लोकांतून एक तृतीयांश म्हणजे एककोटि लोक मेले. आपले शास्त्राप्रमाणें त्या देशचे लो-

क मांसादिक खात नाहींत, तांदूळ मात्र खातात. ते तांदूळ बहुतकरून सगळे कंपनी सरकारचे चाकर खरेदी करून अशे मोठे किमतीनें विकूं लागले कीं, गरीब लोकांस ते घेण्याची शक्ति अगदीं नव्हती.

ज्या राज्यांत राजास प्रजांचे संमतानें नेमिलात. तेथें राजाचें तक्त रिकामें झालें म्हणजे फारकरून मोठमोठ्या मारामारी आणि दंगे होतात. म्हणून युरोप खंडांतील बहुतकरून सर्व राज्यांत वंशपरंपरेनें राज्य चालवावें, असे ठराव झाले आहेत, तथापि तशे ठिकाणींही अधिकाराविषयीं तंटा पडला, म्हणजे आंतलेआंत लढाया होऊन रक्तें पडतात, म्हणून अधिकाराच्या अनुक्रमाविषयीं फार बंदोबस्त करावा लागतो. याकरितां इंग्लंड देशचे राजाचे कुटुंबांत लग्नें होण्याचा इतका बंदोबस्त आहे. राजाचे दोन भाऊ ड्युक ग्लोस्तर व ड्युक कंबर्लंड यांनीं गुप्तपणें लग्नें केलीं. पहिला यानें कौंटेस वालड्ग्रेव इशीं आणि दुसऱ्यानें लार्ड इर्नम याचे विधवा मुलीशीं, केलें. म्हणून, असा कायदा ठरला कीं, सरकारी मोहोर होऊन हुकूम झाल्यावांचून राजाचे कुटुंबांतील कोणी लग्न करूं नये, आणि अशे लग्नाचा संस्कार जे कोणी करतील, किं

वा त्या लग्नास मदत करीतील, त्या सर्वांचें शासन केलें जाईल.

या पार्लमेंट सभेच्या बैठकीमध्यें राज्याचे फौजदारी कायद्यांत एक मोठा फेरफार झाला. पूर्वी असें होतें कीं, कोणी फेलन मी अपराधी, किंवा नाहीं, हें बोलावयास अमान्य झाला, म्हणजे त्याची पाठ जमिनीवरून ओढून छातीवर भार ठेवावा तो मरेपर्यंत तो भार हळू हळू वाढवावा, आणि त्यास एक भाकरीचा तुकडा आणि चिखलाचें पाणी इतकें मात्र द्यावें. आतां ही वाईट चाल मोडून असा कायदा झाला कीं, कोणी उत्तर न दिलें, तर त्यावर जो आरोप असेल तो खरा असें समजावें.

या वर्षी युरोप खंडांतील तीन राजांनीं फार अन्याय कर्म केलें. जर्मनी देशाचा एंपरर, प्रशिया देशाचा राजा, आणि रशिया देशाची एंप्रेस या तिघांनीं एक मसलत करून पोलंड मुलुखावर आपला जुना दावा आहे असे निमित्तानें त्या देशाच्या लागवडीचा जो अंश होता तो वांटून घेतला, आणि बाकीचा भाग स्वतंत्र राज्य असें करून पूर्वी तेथें राजा नेमावा अशी चाल होती ती मोडून, तेथील राजानें

वंशपरंपरेनें तें भोगावें असें केलें. या त्यांचे उद्योगास युरोप खंडांतील कोणी दुसरे सरकारांनीं विघ्न केलें नाहीं, म्हणून तो सिद्धीस गेला. तसेंच त्यावर्षीं स्वीडन देशांतील राजानें, राज्यपदावर बसण्याचे समयीं धर्मानें करार केला होता तो मोडून, आपण परतंत्र होता तो सर्वांपेक्षां स्वेच्छाचारी झाला. डेन्मार्क देशांतील राजाचा सर्व अधिकार त्याची सासू, विधवा राणी, व त्याचा सावत्र भाऊ प्रिन्स फ्रेडरिक या तिघांनीं घेतला, व त्याचे प्रीतींतले स्त्रुएन्सी व ब्रांट या नांवांचे दोघे होते त्यांचा शिरच्छेद केला. इंग्लिश राजाची बहीण माटिल्डा, तेथील राजाची राणी, जीव घेऊन मोठे संकटानें निभावली; ती पुढें जर्मनी देशांत झेल शहरांत कांहीं वर्षेंपर्यंत होती; आणि पुढें दुखणें होऊन मृत्यु पावली.

याव ईसट इंडिया कंपनी यांचे हिंदुस्थानांतील चाकरांचे लोभास प्रतिबंध करण्याकरितां बंगाल्यांत एक न्यायाचें स्रुप्रीमकोर्ट नेमिलें. त्यांत प्रतिवर्षीं ८००० पौंड पगार देऊन एक मुख्य न्यायाधीश, व ६००० पौंड पगार देऊन हाताखालचे तीन न्यायाधीश नेमिले.

यावेळेस अयर्लंड व स्कादूलंड देशाचे उत्तरभ तांतील साधारण लोकांस त्यांचे निर्दय जामीनदारां नीं फारउपद्रव दिला. त्यांनीं लोकांस कर देण्याचें सामर्थ्य नाहीं, असें पाहून जमिनीवर फारच कर बसविला, म्हणून ते बहुत एकीकडे जमून अमेरिका खंडास निघून गेले, आणि असें सांगतातकीं, त्या देशांत ज्याफौजेनें लढाईचा प्रारंभ केला, जीनें ती लढाई धीरानें चालविली, आणि आपला नवा मिळविलेला देश स्वतंत्र होईपर्यंत जिनें ती सोडिली नाहीं, तीमध्यें बहुतकरून हे लोक होते. असें आहेकीं, प्रजांवर फार जुलुम केला म्हणजे त्याच परम वैरी होतात, आणि आपले जुलूमगारांचा सूड उगवावा अशी त्यांस हिमत उत्पन्न होते, तशी दुसरे देशाचे लोकांस होत नाहीं.

यावर्षीं क्यापूटन फिपूस, व क्यापूटन लटूविच, यांस सरकारानें हिंदुस्थानाकडे जाण्यास ईशानी कडून किंवा नैर्ऋत्येकडून वाट सांपडेल किंनाहीं, याचा शोध करण्याकरितां पाठविलें. ते भूमध्यरेषेपासून उत्तरेस ८१ अंश ३९ कळांपर्यंत गेले, पुढें बर्फाचे डोंगर किंवा बेटें सांपडूं लागलीं, त्यामुळें

त्यांचें जाणें होईना. ते आपलें काम झाल्यावांचून प-
रत देशीं आले.

या राज्यांत लोकांस समुद्रांत देश शोधावया-
करितां जाण्याची उमेद फार उत्पन्न झाली होती. दक्षि-
ण समुद्रांत देश शोधण्याचे कामासाठीं पृथ्वीसभों
वत्या पांच वेगवेगळ्या प्रदक्षिणा झाल्या. पहिली,
**कमोडोरबैरन** यानें, दुसरी **क्यापटन वालिस**
यानें, तिसरी **क्यापटन क्यार्टिरेट** यानें, आणि च-
वथी व पांचवी **क्यापटन कूक** यानें केली. **क्या-
पटन कूक** यानें तिसरी प्रदक्षिणा करण्याचाही
उद्योग केला, तेव्हां दक्षिणसमुद्रांत नवे सांपडले-
ले **ओवेही** या नांवाचे एके बेटांतील लोकांशीं
कांहीं तंटा झाल्यामुळें त्यांनीं त्यास मारिलें, त्यामु-
ळें सर्व गुणग्राही लोकांस फार दुःख झालें.

**इंग्लंड** देश व त्याचे ताबेखालचीं **अमेरि
कन** संस्थानें यांमध्यें, त्यावेळेस कर बसविण्या-
चा अधिकार कोणाकडे, याविषयीं फार तंटा चालू
लागला. **ब्रिटिश पार्लमेंट** यानें आग्रह धरिला
कीं, आपले हुकमानें त्यांवर कर बसविण्यास अ-
धिकार आहे. संस्थानें त्या अधिकारास कबूल

होईनांत. त्यांचें बोलणें पडलें कीं, आमचे संमतावांचून आम्हांवर कर बसविणें हें योग्य नव्हे, आणि त्यांनीं निश्चय केला कीं, कसीं भयें आलीं किंवा कसा प्रसंग पडला तरी यावांचून दुसरे रीतीनें बसविलेले करांस आपण राजी होणार नाहीं. या निश्चयाप्रमाणें ते करितात किंवा नाहीं, ही परीक्षा पाहण्याकरितां, चाहाबर कांहीं एक कर बसवून तो अमेरिका देशास पाठविला. हा चाहा खालीं उतरायास न देतां, तशाचा तसाच तेथील लोकांनीं परत इंग्लंड देशास पाठविला. बोस्तन बंदरांत त्याची याही पेक्षां दुर्दशा झाली. तो लोकांनीं गलबतांतून काढून समुद्रांत टाकिला.

या दांडगाईकरितां न्यूइंग्लंड प्रांतांतील लोकाचें शासन करावयासाठीं दोन कायदे ठरले. एक असाकीं, बोस्तन बंदर काढावें, आणि दुसरा असाकीं, कायद्या प्रमाणें लोकांस वर्तविण्याचा अधिकार तेथील लोकांकडून घेऊन सरकाराजवळ ठेवावा, राजाचा प्रधान यानें मुख्यापासून पार्लमेंट सभेमध्यें मोठा अंमल चालविला होता, परंतु त्या सभेचा समय संपत आला होता म्हणून त्यानें विचार केला कीं, ते ह-

मीप्रमाणें नव्या नेमणुकी करण्याविषयीं जर लोकांस संधि सांपडूं दिली, तर आपले सांगितल्याप्रमाणें ऐकणारी दुसरी **कामन्स** सभा मिळणार नाहीं. म्हणून त्यानें अकस्मात् जुनें **पार्लमेंट** सभेस निरोप देऊन नवी लगीच बोलाविली.

वर सांगितलेंकीं क्रूर कर्मे **बोस्तन** शहरांत झालीं खरीं; परंतु बहुतकरून दुसरे सर्व संस्थानांनीं लवकरच तसें करण्यास प्रारंभ केला. त्यांचे ध्यानांत आलेंकीं आम्हीं सर्वांनीं जरी चाहाचा नाश केला नाहीं, तरी तो नाकबूल केला, यामुळें **बोस्तन** शहराचें जें शासन झालें, तेंच आपलें होईल म्हणून त्यांनीं **न्यूइंग्लंड** प्रांताचा पक्ष धरण्याचा निश्चय केला; आणि **नोवास्कोशिया**, व **जार्जिया**, हीं दोन खेरीजकरून बाकीचे सर्व संस्थानांनीं, एक **फिलेडेल्फिया** शहरांत मोठी राजसभा जमविली, तीमध्यें आपले वकील पाठविले. त्या सभेनें आपलें नांव **कांग्रेस** असें ठेवून **इंग्लिश** राजाजवळ फिर्याद केलीकीं, आम्हावर जुलूम चालले आहेत हे बंद व्हावे. पुढले वर्षी **जार्जिया** प्रांतही त्या संस्थानांत मिळाला. असे ते प्रांत मिळून पुढें लवकरच इं-

ग्लिश सरकारावर बंड करून आपण स्वतंत्र राज्य असे झाले. राज्यसभेनें राजाजवळ फिर्याद केली होती, तेवढयानेंच संतुष्ट नहोतां बोस्तन बंदराविषयींचा कायदा व दुसरा जुलूम बंद होण्याकरितां न्यूइंग्लंड प्रांताचे लोकांस संकटसमयीं मदत कबूल केली. त्या प्रांताचे लोकांचा स्वभावही याविषयीं अनुकूळ होता, आणि त्यांनीं धर्माविषयीं स्वतंत्र होऊन फार दिवस मनांत इच्छिलें होतेंकीं, राज्याविषयींही आपण स्वतंत्र असावें

ब्रिटन व अमेरिका देशांतील संस्थानें, यांमध्यें इतके दिवस जें वांकडें पडलें होतें, तें आतां उघड झालें. मासाच्यूसेट्स एथील अमलदार जनरल गेज यानें, कांकर्ड या नांवाचे ठिकाणीं बंडवाल्यांनीं लढाऊ सामान जमविलें आहे, असें ऐकून त्यांचा नाश करावयास फौजेची एक टोळी पाठविली. त्या टोळीस कांकर्ड यापासून सुमारें साहा मैल अंतरावर लेक्सिंग्टन शहराजवळ मिलिशिया लोकांतून कित्येक भेटले. त्यांमध्यें व राजाचे फौजेमध्यें कांहीं गोळागोळी झाली, तींत आठ अमेरिकन लोक मेले, व कित्येकांस जखमा

लागल्या. नंतर त्या टोळीनें आणखी कांहीं विघ्न न होतां कांकर्ड एथें जाऊन तेथील सामानाचा नाश केला; परंतु परत येत असतां अमेरिकन यांचे एके मोठे टोळीनें येऊन त्यांवर हल्ला केला; आणि ते बोस्तन शहरास पोंचेपर्यंत त्यांची फार दुर्दशा झाली. त्या लढाईमध्यें राजाचे फौजेंतले ६५ लोक मेले, ते व जखमी आणि बंदिवान वगैरे मिळून एकंदर दोनशें ब्याहात्तर नांहीं असे झाले. अमेरिकन यांचे सुमारें चाळीस मेले, व वीस जखमी झाले.

या लढाईची बातमी देशांत जिकडे तिकडे कळतांच सर्व मुलुख एकदांच लढावयास तयार झाला, आणि थोडे दिवसांत बोस्तन शहरास सुमारें वीस हजार मिलिशिया लोकांचा वेढा पडला. लेक्सिंगतन एथील वर्तमान, व बोस्तन शहराचा वेढा, या दोन गोष्टी कांग्रेस या सभेचे कानास जातांच तिनें न्यूइंगलंड प्रांतांतले लोकांचीं सर्व कृत्यें मान्य केलीं, आणि विचार करविला कीं, सरकार व मासाशसेट्स एथील लोकांमध्यें जो संबंध होता, तो सुटला. फौजेस, किंवा आरमारास, किंवा भाडयाचे गलबतांस सामानाचा पुरावा, करण्याची लोकांस त्यांनीं अ-

गर्दी मनाई केली. ब्रिटिश सरकाराविषयीं आपला तिरस्कार उघड करावयाकरितां, जो डाक्तर फ्रांक्लिन यास इंग्लंड देशांत त्या जागेवरून अप्रतिष्ठेनें काढिलें होतें, त्यास नवा एक डांकेचा कारखाना करून त्यावर मुख्य नेमिलें, व हानकाक आणि आडम्स साहेब यांवांचून जे कोणी हत्यारें ठेवून आपले कामावर येतील, त्या सर्वांस क्षमा मिळेल, असा जनरल गेज यानें जाहीरनामा लावितांच, त्यांनीं हानकाक साहेबास प्रेसिडेंट नेमिलें.

इ.स. १७७५ यावेळेस उपाय लवकर होईल अशा आतां गोष्टी राहिल्या नव्हत्या, म्हणून उभयपक्षीं परस्परांचा एकदांच मोड करण्याची संधि पाहात होते. बोस्तन शहराचे जवळ बंकर्सहिल यानांवाची एक टेंकडी आहे, त्या टेंकडीवर जून महिन्याचे एके लहान रात्रीस अमेरिकन यांनीं मोरचा बांधिला. त्याठिकाणापासून शहरास व बंदराचे लोकांस फार उपद्रव होईल, म्हणून त्यांस तेथून काढण्याकरितां जनरल हो आणि पिगट या दोन सरदारांबरोबर दोन हजारांवर लोक देऊन त्यांस पाठविलें. नंतर गलबतांपासून व बोस्तन

शहरांत **कोप्सहिल** म्हणून ठिकाण आहे, तेथून तोफांचा मार झाला. हा मार **अमेरिकन** यांनीं मोठे धीरानें सोसिला. राजाची फौज मोरच्याजवळ येईपर्यंत त्यांनीं गोळे मारिले नाहींत. ती तेथें गेल्यावर त्यांनीं तीवर तोफा चालू केल्या.त्यामुळें राजाचे फौजेची धांदल झाली, आणि तींतील कित्येक फार शूर सरदार मेले गेले. तथापि फौजेनें तत्क्षणीं बंदोबस्त करून त्यांचा मोरचा चहूंकडून मोडला, आणि **अमेरिकन** यांस तेथून काढून देशांत घालविलें. त्या लढाईंत फौज समारें अर्धी मेली गेली व जखमी झाली. ती सर्व मिळून संख्या एक हजार चौपन्न. या लढाईंत सरदार फार पडले, याचें कारण असें सांगतात कीं **अमेरिकन** लोकांचें फौजेंत निशाण, अचुक मारावयास शिकविलेले कित्येक लोक होते.

**न्यूइंग्लंड** प्रांतांतील लोकांनीं या प्रसंगीं शौर्य प्रगट केलें, त्यामुळें **कांग्रेस** या सभेस पुढेंही लढाईची तयारी चालविण्यास उमेद आली. कांहीं दिवसांपूर्वीं त्यांनीं एक फौज जमवून तिला पगार देण्याची आज्ञा केली होती, आणि आतां त्यांनीं लढाई करण्याचीं आपलीं कारणें आणि आपणावरचे जु-

कूम बंद झाल्यावांचून, म्हणजे पार्लमेंट सभेचे हुकूम फिरल्यावांचून, आम्ही शस्त्रें ठेवणार नाहीं अशी प्रतिज्ञा प्रसिद्ध केली. वार्जिनिया प्रांताचा वकील वाशिंग्तन साहेब यास सर्व अमेरिकन फोजेचा सरदार नेमिलें.

परंतु मूळचे राज्यापासून वेगळें होण्याची आपली इच्छा नाहीं असें दाखवावयाकरितां त्यांनीं ग्रेटब्रिटन एथील लोकांस एक पत्र, अयर्लंड बेटांतील लोकांस एक पत्र, व राजास एक अर्जी, हीं पाठविलीं. त्यासर्वांमध्यें लिहिलेंकीं, आमचे सरकारापासून वेगळें होण्याची आमची इच्छा नाहीं; आणि वास्तविक व चांगला करार होऊन एकी व्हावी यावांचून दुसरी कोणती गोष्ट आमचे मनांत नाहीं. बहुत लोकांस त्यावेळेस वाटलेंकीं, त्यांचे म्हटल्याप्रमाणें, व इंग्लंड देशाची प्रतिष्ठा कमी न होतां करार करितां येईल; व बहुतांनीं कित्येक करार करून पार्लमेंट सभेस कळविलें, परंतु ते सर्व रद्द पडले.

त्या वेळेस प्रधानांनीं असा वेडा निश्चय केलाकीं, सर्व अमेरिका देश शस्त्राचे बळानें स्वाधीन करावा. ही गोष्ट कधीं घडावयाजोगी नव्हती; आणि

घडली असती, तरी त्या देशांतून जो नफा होणार तो त्याचे संरक्षणाकडे खर्च झाला असता. परंतु त्यावेळेस प्रधानांस मोठा श्रम पडला होता. अमेरिका देशांत पेन्सिल्वेनिया प्रांताचें संस्थान ज्या पुरुषानें स्थापिलें, त्याचे वंशांतला, त्या प्रांताच्या मालकांतील द्रव्यवान् व बहुश्रुत पेन या नांवाचा पुरुष इंग्लंड देशांत आला होता. त्यानें कांग्रेस या सभेची शेवटची अर्जी राजास देण्याकरितां आणिली होती. या पुरुषाचे सांगण्यावरून ही प्रधानाचे डोळे उघडले नाहींत. त्याला लार्ड सभेंत बोलावून तेथील गोष्टींविषयीं प्रश्न केले, तेव्हां त्यानें उत्तरें दिलीं, त्यांतील सारांश हा कीं, तेथील संस्थानांनीं आजूनपर्यंत आपलें राज्य स्वतंत्र होण्याचा कांहीं बेत केला नाहीं; आणि आपला व आपले मुळाचे राज्याचा तंटा बंद व्हावा अशी त्यांची फार इच्छा आहे; परंतु ही त्यांची शेवटची अर्जी जर कबूल केली नाहीं, तर ते परराज्यांशीं बंदोबस्त करितील असें भय आहे; आणि जर एकदां असा बंदोबस्त झाला, तर त्यांमध्यें फूट पडण्यास फार कठीण पडेल. ही त्यानें बातमी सांगितली तिचा कांहीं विचार केला नाहीं;

आणि अर्जीविषयीं प्रधानांनीं सांगीतलें कीं, तिचें उत्तर आम्ही कांहीं देत नाहीं.

अगोदरच बंकर्सहिल टेंकडीवर आपण पराक्रम केला, हा अमेरिकन लोकांस मोठा गर्व झाला होता, तशांत असा त्यांचा ब्रिटिश सरकारापासून अपमान होतांच त्यांनीं लढाईचा निश्चय केला. ब्रिटिश प्रधानांस त्यांचा धीर व तयारी यांची पुरी माहीतगारी नव्हती, आणि त्यांशीं जो तंटा होता तो सर्व बंद करण्यासही संधी चांगली होती, परंतु ती एकदां गेल्यावर पुनः कधीं आली नाहीं.

पुढें अमेरिकन लोकांस आपले संरक्षणाचाच उद्योग पुरे होईना असा झाला. न्यूइंग्लंड व न्यूयार्क या प्रांतांतील मिलिशिया लोकांची एक टोळी, जनरल्ल मांट्गामरी व आर्नोल्ड या दोन सरदारांखालची, क्यानडा प्रांतावर गेली. त्यांनीं शांबूली, व सेंट जान हे किल्ले, आणि मोंत्रिआल शहर हीं घेतलीं. त्यांनीं केबेक शहरावर अकस्मात् हल्ला करून घेण्याचा उद्योग केला, परंतु लढाईंत मांट्गामरी मेला आणि आर्नोल्ड जखमी झाला, म्हणून त्यांस तो उद्योग सोडून देणें अ-

वश्य झालें, आणि पुढें लवकरच **इंग्लंड** देशाहून बहुत फौज आली, त्यामुळें त्यांस शेवटीं तो प्रांत अगदीं सोडावा लागला.

परंतु त्यावेळेस **बोस्तन** शहरांतली फौज मोठे विपत्तींत होती. त्या फौजेचा सरदार पूर्वी **जनरलगेज** म्हणून होता, त्याचे जागेवर **जनरलहो** म्हणून झाला, तो मोठे धीराचा, लढाईमध्यें कुशल, आणि युक्ति व कावे यांतही चतुर होता, तथापि त्याजागेवर त्याचा निभाव लागेना. सर्व **अमेरिका** देशापासून त्याला सामानाचा थोडाही पुरावा होऊं नये असा पक्का बंदोबस्त केला, आणि **इंग्लंड** देशांतलीं सामानाचीं गलबतें येण्यास वेळ लागे, आणि त्यांतून कित्येकांस शत्रू वाटेनें अडथळा करीत. सारांश **बोस्तन** शहरांतली फौज व लोक हे अन्नाचे दुष्काळामुळें मरतील असें भय उत्पन्न झालें. दुसरें **अमेरिकन** लोकांनीं असें केलें कीं जवळचे डोंगरावर मजबूद बुरुज बांधिले होते, त्यांवरून हिंवाळा संपल्यानंतर शहरावर भडमार करूं लागले. पुढें लढाई आणि दुष्काळ हीं दोन भयें मनांत आणून तेथील फौज, व ज्यांनीं त्यांचे बरोबर जाण्या

चा निश्चय केला होता, असे कित्येक लोक, तें ठिकाण सोडून भाड्याचे गलबतांवर बसून थोडे दिवसांत नोवास्कोशिया प्रांतांत हलिफाक्स शहरीं जाऊन उतरले. जनरलहौ यानें तें शहर सोडतांच शत्रूंचा सरदार जनरल वाशिंगतन यानें तें लागलेंच घेतलें, व दुसरे देशचे कित्येक इंजिनियर यांचे मदतीनें त्याचा असा बंदोबस्त केला कीं, तें केवळ अजिंक व्हावें.

त्या वेळेस समुद्राचे फांटे व बंदरें यांची माहीतगारी नव्हती, त्यामुळें दक्षिण क्योरोलिना प्रांतांत चार्लस टौन शहर घेण्याचा इंग्लिश यांनीं उद्योग केला. त्या गलबतांचा सरदार सरपीटर पार्कर होता, आणि जमिनीवरचे फौजेचा जनरल क्लिंटन ती फौज लांगऐलंड या नांवाचे एके बेटावर उतरली, त्याजवळेच समुद्राचे फांट्यापलिकडे सलिवान्सऐलंड म्हणून दुसरें एक होतें. सलिवान्सऐलंड यावर, शत्रूंनीं शहराजवळ गलबतें येण्याची वाट बंद व्हावी म्हणून बळकट मोरचा बांधिला होता, त्या ठिकाणावर आड्मरल यानें मोठे शौर्यानें हल्ला केला, आणि फौज

एका बेटावरून दुसरे बेटावर जाऊं लागली, तों मधील समुद्राचा फांटा अठरा इंच खोल असें जें समजलें होतें, तो सात फुट खोल आहे असें कळलें. ती लढाई दहा तासपर्यंत झाली, तीमध्यें कित्येक फार शूर लोक व सरदार पडले. शत्रूंचे हातीं लागण्याचे भयानें एक लढाऊ गलबत जाळावें लागलें, आणि इतकेंही होऊन शेवटीं तो बेत असाध्य म्हणून आडमरल यास सोडून धावा लागला या पराजयाचे बातेमी पासून इंग्लंड देशांत कोणास फारसें बरें वाईट वाटलें नाहीं, कारणकीं, त्यावेळेस प्रधान व बहुतकरून सर्व लोक राज्याची प्रतिष्ठा व राज्याचें हित यांची फार अनास्था करीत असत.

आतां अमेरिकन लोकांस वाटूं लागलेंकीं, सांप्रतजी स्थिति झाली आहे, तीवरून आपण व आपले मूळचें सरकार यांमध्यें फार दिवस टिकणारा, व मनापासून, तह होत नाहीं. दुसरा त्यांनीं असा विचार केलाकीं, आपण ब्रिटिश सरकारची रयत असें कबूल करीत असतां, सर्व पृथ्वी आपणास आपले वास्तवीक राज्याशीं लढाई करणारे बंडवाले असें मानिते, म्हणून आपणाशीं दुसरीं राज्यें कोणी

बंदोबस्त करणार नाहींत. अशा गोष्टी मनांत आणून त्यांनीं आपली स्वतंत्रतेची प्रतिज्ञा प्रसिद्ध केली, ती अशीकीं, आमचा व ग्रेटब्रिटन देशाचा कांहीं संबंध नाहीं, आणि आम्ही स्वतंत्र आणि आपले सत्तेचें राज्य केलें.

जनरल हौ, हालिफाक्स शहरांत गेला म्हणून पूर्वीं सांगितलें, तो तेथें फार दिवस राहिला नाहीं, परंतु तेथून गलबतांवरून न्यूयार्क प्रांताचे समोर आला, तेथें त्याचा भाऊ लार्डहौ मोठें आरमार व बहुत फौजेचा पुरावा घेऊन त्यास मिळून, त्यानें शत्रूंस प्रथम लांगऐलंड या बेटांतून काढून टाकिलें, आणि मग न्यूयार्क शहरांतून हाकून दिलें, आणि न्यूयार्क बेटाचे शेवटास केनिंग्सब्रिज म्हणून ठिकाण आहे, तेथें त्यांनीं मोरचा बांधिला होता, तोही त्यांकडून घेतला. तशीच त्यानें वेट्प्लेन्स या नांवाचे ठिकाणापर्यंत त्यांचे पाठीस लागून त्यांशीं लहानशी लढाई केली, परंतु ते मोठी लढाई करीनात, म्हणून त्यानें न्यूयार्क शहरास येऊन तें आपलें मुख्य ठिकाण केलें.

त्यावेळेस कांग्रेस सभेचें वर्तमान फार क-

ठीण झालें होतें त्यांची फौज मुदतीनें चाकरीस ठेविली होती, ती मुदत सरतांच पंचवीस हजार होती, ती तीन हजार झाली. परंतु जनरल वाशिंग्टन यानें लवकरच दोन पराक्रम केले, त्यांमुळें त्यांचे फौजेस हुशारी आली; व ब्रिटिश लोकांची हुशारी गेली. क्रिस्त्मस दिवशीं रात्रीस त्यानें नदी उतरून त्रेंतन शहराजवळ हेसियन लोक ठेविले होते त्यांवर हल्ला करून, त्यांतून नऊशें अठरांस धरून कैद करून नेलें. त्यानें पुनः थोडे दिवसांनीं ती नदी दुसऱ्यानें उतरून कर्नल माहुड सरदाराचे हाताखालीं ब्रिटिश फौजेची एक टोळी होती, तींतून बहुतकरून सर्व मारिले, किंवा धरून कैद केले. असे त्याचे विजय होत चालले, याचें कारण केवळ त्याचा पराक्रम नव्हे; परंतु त्यास त्यादेशाची माहीतगारी चांगली होती हें खरें; परंतु एवढी सोई आपणास साध्य व्हावी याविषयीं ब्रिटिश प्रधानांनीं कांहीं उपाय केला नाहीं.

आजपर्यंत फ्रान्स व स्पेन एथील सरकारांनीं ब्रिटन आणि अमेरिका देशांतलीं संस्थानें यांविषयीं केवळ उदासीनपणा बाहेरून

दाखविला होता. परंतु त्यांनीं पुढें एक जी गोष्ट केली तीवरून त्यांविषयीं संशय उत्पन्न झाला. ती गोष्ट हीकीं, आपले बंदरांत अमेरिका देशाचे लुटारू गलबतांस घेतलें, आणि ब्रिटिश व्यापाऱ्यांपासून जी त्यांनीं बहुत लूट मिळविली होती, ती त्यांस विकूं दिली. तसाच त्यांनीं अमेरिकन लोकांस तोफखान्याचा पुरावा केला, आणि त्यांचे सरदार व इंजिनियर ही त्यादेशांत गेले, त्यामुळें शत्रूंचे फौजेचें कौशल्य व बळ हीं बहुत वाढलीं. त्यावेळेस तीं दोन ही सरकारें फार तजविजेनें आपलीं अरमारें वाढवीत चाललीं, तेव्हां ज्यांस कांहीं थोडें तरी समजत होतें, त्या सर्व लोकांनीं पाहिलें, आणि सांगीतलें कीं ते लवकरच अमेरिकन लोकांचा पक्ष उघड रीतीनें घेतील. परंतु हीं त्यांचीं भविष्यें प्रधानांनीं मनास आणिलीं नाहींत, आणि त्यांची थट्टा व तिरस्कार केला.

पूर्वीं लिहिलें कीं, हा राजा सिंहासनावर बसला तेव्हां ८००००० पौंड नेमणूक मुलुखी खर्चाकरितां करून दिली होती. परंतु ही खर्चास पुरेना अशी झाली, म्हणून आजपर्यंत जो अधिक

खर्च झाला होता त्याबद्दल पांच लाख पौंड यापेक्षां अधिक पैका दिला, आणि पुढें १००००० पौंड नेमणुक वाटविली, ती सर्व मिळून आतां इंग्लंड देशाचे राजास आपला मुलखी खर्च चालविण्याकरितां प्रतिवर्षी ९००००० पौंड नेमणुक आहे. याबत्याविषयीं कित्येक प्रधानाचेंही मत काय होतें, हें कामन्स सभेंतील सर फ्लेचर नार्टन त्यानें त्याविषयींचा हुकूम राजास देतेवेळेस जें भाषण केलें त्यावरून कळेल. त्यानें राजास सांगितलेंकीं, "आपले विश्वासु कामन्स यांनीं हें आपले प्रीतीचें चिन्ह दिलें आहे, परंतु हा समय असा आहे कीं, सर्व प्रांतांवर त्यांचे सामर्थ्यापेक्षां अधिक कर बसले आहेत." त्यानें आणखी सांगितलेंकीं, "त्यांनीं तुम्हास आतां पैक्याचा मोठा पुरावा मात्र केला असें नाहीं, परंतु कधीं झाली नाहीं अशी, आणि आपले खर्चापेक्षांही फार अधिक नवी मोठी नेमणुकही करून दिली; परंतु, महाराज, हें सर्व त्यांनीं या भरंवशावर केलें आहे कीं, अशा उदारपणानें जें दिलें, तें आपण विचारानें खर्च कराल."

जून महिन्यामध्यें न्यूयार्क प्रांतांत जनरल हौ यानें फिरून लढाई चालू केली; आणि शत्रूंस लढाईचा प्रसंग आणण्याचा फार यत्न के- इ॰स॰ १७७

ला. परंतु जनरलवाशिंग्तन यानें तो प्रसंग मोठ्या युक्तीनें चुकविला, म्हणून त्याचें नांव अमेरिकन फेबियस* असें पडलें. यारीतीनें शत्रु कोणतेहि रीतीनें समोर लढाईस उभे राहीनात असें पाहून, जनरल हौ यानें दक्षिणप्रांतांत एक वेळ यत्न करून पाहाण्याचा निश्चय केला. मग समारें दोनशें भाड्याच्या गलबतांवर आपली फौज चढवून फिलेडेल्फिया शहरास निघाला, परंतु तो डेलावेर नदीचे तोंडाशीं आला, तेव्हां त्यानें नदींत शेवोदेफ्रीझ म्हणजे लोखंडाचे टोकांच्या लांकडी काठ्या इतक्या भरलेल्या पाहिल्या कीं, तेथून पुढें जातां येईना म्हणून त्यानें मेरिलांड प्रांतांत एक उतार आहे, तेथें आपली फौज उतरली. त्या ठिकाणाहून तो पुढें जात असतां, त्यास जनरल वाशिंग्तन भेटला. वाशिंग्तन यास फिलेडेल्फिया शहर राखण्याची फार इच्छा होती, म्हणून त्यानें नेहमीचा बेत सोडून लढाई करावयाचा निश्चय

---

* फेबियस म्हणून एक पूर्वी रोमन लोकांचा सरदार होता. तसा हा शूर म्हणून यास तो किताब दिला.

केला. मग त्या दोन फौजांची एक दिवसपर्यंत मोठे निकरानें लढाई झाली, शेवटीं इंग्लिश फौजेच्या बंदोबस्तामुळें शत्रूंचा मोड झाला. नंतर इंग्लिश फौजेनें फिलेडेल्फिया शहरास जाऊन तें घेतलें, परंतु त्या शहरापासून सुमारें साहा मैल अंतरावर जर्मन्टौन म्हणून गांव आहे, तेथें बहुत करून सर्व फौजेनें तळ दिला.

बांडिवेन एथील लढाईंत मोड झाला असतांही, वाशिंग्तन यानें हींमत न सोडितां फिरून उद्योग चालविला. त्यानें जर्मन्टौन गांवांहून सुमारें सोळा मैल अंतरावर स्किपाचू क्रीक म्हणून ठिकाण आहे तेथें ठाणें दिलें; आणि तेथें त्यास फौजेचा बहुत पुरावाही झाला. मग अकटोबर महिन्याचे तिसरे तारिखेस तो त्या ठिकाणाहून गुप्तपणें निघाला, आणि त्यानें जर्मन्टौन गांवांत सुमारें पाहांटेचे प्रहर रात्रीस येऊन राजाचे फौजेवर मोठा हल्ला करून तिची धांदल केली. परंतु त्यांनीं आपला बंदोबस्त करून लढाई चालू केली, म्हणून शत्रु हटून गेले, तथापि त्यांनीं बंदोबस्तानें आपला तोफखाना बरोबर घेतला.

त्या लढाईंत राजाचे फौजेंतले लोक सुमारें ५०० पडले, शत्रूंचे यापेक्षां अधिक पडले.

पुढें नदीचे कांठावर शत्रूंनीं जे किल्ले बांधिले होते, त्यामुळें सामान घेऊन फिलेडेल्फिया शहराजवळ गलबतांचें येणें होईना, म्हणून ते मोडण्याचा जनरलहौ यानें उद्योग केला. त्यानें त्या कामाकरितां हेसियन लोकांची एक बळकट टोळी पाठविली, तींतले बहुतकरून सर्व लोक शत्रूंनीं जखमी केले, किंवा ठार मारिले. परंतु ते किल्ले मोडल्यावांचून हिवाळ्यांत फिलेडेल्फिया शहरांतले फौजेचा निभाव होणें कठीण, म्हणून नदींत गलबतें पाठविलीं, त्यामुळें मोरच्यांचा नाश झाला, आणि किल्ल्यांवर जमिनीकडुन अकस्मात् हल्ला करण्याची तयारी केली असें पाहून शत्रु शेवटीं ते सोडून गेले. तथापि त्यांनीं नदींत लोखंडी टोकांच्या काठ्या पुरल्या होत्या, त्यामुळें लढाई किंवा मोठीं गलबतें यांचें जाणें होईना.

क्यानडा प्रांतांत सुमारें दहा हजार फौज, व तींत कांहीं तद्देशीय लोक होते, तिचा सरदार जनरल बर्गाइन यानें न्यूइंग्लंड प्रां-

तावर हल्ला करावा असा निश्चय केला. तो कांहीं अटकाव न होतां जार्ज आणि चांप्लिन हीं तळीं उतरला, आणि त्यानें तिकांदरेगो किल्ला ही घेतला. परंतु तो सारानोगा ठिकाणाजवळ आला, तेव्हां जनरल गेट्स व जनरल आर्नोल्ड यांचे हाताखालचे न्यूइंग्लंड प्रांतांतील लोकांचे एके टोळीनें त्यावर येऊन हल्ला केला. त्यांजबरोबर त्यानें मोठे शौर्यानें दोन वेळ लढाई केली; परंतु त्याचें फार नुकसान झालें, आणि त्याचे छावणीवर शेवटीं अकस्मात् हल्ला करून त्यास धरून कैद केलें; आणि करार करून घेतलाकीं, तुम्ही हत्यारें ठेवावीं म्हणजे तुम्हास आम्ही बोस्तन शहरास नेऊन, तेथून ग्रेटब्रिटन देशास जाऊं देऊं. परंतु या लढाईंत फिरून तुम्हीं किंवा तुमचे लोकांनीं अमेरिका देशांत चाकरीवर येऊं नये.

याचे पूर्वीं थोडे दिवसांवर हिंदुस्थानांत एक विलक्षण गोष्ट झाली. मद्रासेंत लार्ड पिगट म्हणून गवर्नर होता, त्यानें डिरेक्टर यांचे हुकुमाप्रमाणें वर्तणुक केली, म्हणून कौन्सिल यांतील मुख्य लोकांनीं त्यास धरून बंदींत ठेविलें, त्यामुळें त्या-

चे प्राणाविषयीं ही भय उत्पन्न झालें. पुढें त्या अपमानामुळें दुःख होऊन तो दुखण्यांत पडून मृत्यु पावला. त्यामुळें लोकांस फार दुःख झालें, कारण तो फार गुणी होता.

यावर्षी जेम्स ऐट्किन म्हणून जान पेंटर यानांवानें प्रसिद्ध असा पुरुष होता, त्यानें पोर्टस्मोथ शहरांत रोपहौस या नांवाचे वाडयास व ब्रिस्तल शहरांत कीलेन या नांवाचे गल्लीस आग लाविली. असें सांगतात कीं, इंग्लंड बेटांतील सर्व मुख्य मुख्य व्यापाराचीं शहरें, तेथील गोदी व गलबतें यांसुद्धां जाळावीं, असा त्याचा बेत होता, परंतु तो सिद्धीस जाण्याचे पूर्वीं त्यास धरून चौकशी करून त्यावर अन्याय ठरवून त्यास फांशीं दिलें, व सांखळांत टांगून ठेविलें.

इ. स. १७७८ राज्यांतील शाहणे लोक, व पार्लमेंट सभेंतील प्रधानांचे विरुद्ध पक्षाचे लोक फार दिवस जें भविष्य सांगत असत, तें आतां घडून आलें. तें हेंकीं फ्रेंच लोकांनीं पडदा सोडून उघड अमेरिकन लोकांचा पक्ष घेतला, आणि ते स्वतंत्र असें कबूल केलें.

अमेरिका देशांत जनरलहौ याचे जागेव-

र जनरल क्लिंटन याची नेमणुक झाली, आणि त्यानें फिलेडेल्फिया शहर सोडून न्यूयार्क प्रांतास जाण्याचा उद्योग केला. त्यावर वाटेनें जनरलवाशिंग्तन यानें येऊन हल्ला केला, परंतु उभयपक्षीं फारसे लोक पडले नाहींत. त्या लढाईंत जनरल ली म्हणून अमेरिकन सरदार होता त्यानें ब्रिटिश फौजेवर नेहमीप्रमाणें आवेशानें हल्ला केला नाहीं, असा त्यावर आरोप येऊन, त्यास एक वर्षपर्यंत कामावरून दूर केलें.

जरी ग्रेटब्रिटन व फ्रान्स या दोन देशांमध्यें रीतीप्रमाणें लढाईची प्रतिज्ञा झाली नव्हती, तथापि त्या दोन राज्यांमध्यें लढाईविषयीं संशय राहिला नाहीं. उभयपक्षीं आरमारांची तयारी झाली. फ्रेंच यांचें आरमारांचा सरदार डोर्विलियर्स यास नेमिलें. या दोन आरमारांची जुलै महिन्याचे २७ वे तारिखेस गांठ पडून लहानशी लढाई झाली. आड्मिरल केपल याचे हाताखालचा पालिसर म्हणून सरदार होता, त्यानें केपल यावर आपलें काम न केल्याचा आरोप घेतला, परंतु त्याची चौकशी होऊन तो अबरूनें सुटला. पालिसर यावरही आ-

ज्ञा मानिली नाहीं असा आरोप आला. त्यांतून त्यावर कांहीं गुन्हा लागू झाला, व कांहीं झाला नाहीं.

यावर्षी मोठा कीर्तिमान्, वक्ता, आणि उत्कृष्ट चतुर अमात्य जो **अर्लचाथम**, तो मृत्य पावला. त्यानें राज्यावर जे उपकार केले, त्यांविषयीं कांहीं कृतज्ञपणा दाखविण्याकरितां, त्याचे कर्जाचा फडशा करण्यासाठीं **पार्लमेंट** सभेनें वीस हजार पौंड दिले, त्याचा मुलगा व त्याचे कुळांतील सर्व वारिसदार यांस वंशपरंपरेनें चार हजार पौंड प्रतिवर्षी नेमणुक करून दिली, त्याचें शरीर मोठे समारंभानें **वेस्तमिन्स्तर आबे** या ठिकाणीं पुरलें, आणि त्याची कबर सरकारी खर्चानें बांधण्याचा हुकूम केला.

यावर्षी एक धीट **पालजोन्स** या नांवाचे पुरुषानें बेटाच्या पश्चिमेकडच्या कांठावर भय उत्पन्न केलें. त्यानें **वेटहेवन** बंदराजवळ उतरून तेथील एक गलबत जाळून शहरही जाळण्याचा यत्न केला. पुढें त्यानें **स्काटलंड** देशावर जाऊन **अर्लसेलकर्क** यांचे घर लुटलें. कांहीं दिवसांनीं **सेरापिस** गलबताचा **क्यापटन** पि-

र्सन याशीं लढाई करून त्यास जिंकिलें, परंतु आपल्या गलबतांची फार खराबी झाली म्हणून लूट घेण्याकरितां तो त्यावरून निघून जातांच तें बुडालें. क्यापटन फार्मर यानेंही फ्रेंच गलबतांशीं निकरानें लढाई केली; इ. स. १७७९ परंतु त्याचे गलबतास अकस्मात् आग लागून तो व त्याचे बहुत करून खलाशी लोक आकाशांत उडून गेले.

वेस्त् इंडीस प्रांतांत फ्रेंच व इंग्लिश लोकांत लढाई फार झाली. तेथें इंग्लिश यांनीं त्यांपासून सेंट लुशिया बेट घेतलें, व त्यांनीं इंग्लिश यांपासून डोमिनिका, सेंट विन्सेंट व ग्रानडा हीं घेतलीं. अमेरिका देशांत कर्नल क्यांपबेल व कमोडोर पार्कर यांनीं जार्जिया प्रांत घेतला. तो परत त्यांपासून घेण्यासाठीं फ्रेंच आड्मरल डेस्तें व अमेरिकन जनरल लिंकन यांनीं प्रयत्न केला, परंतु मेजर जनरल प्रेवोस्त यानें तो चालूं दिला नाहीं. जनरल वाशिंग्तन आपले संरक्षणाकरितां मात्र लपून राहून लढाई करीत असे. सर हेनरी क्लिंटन यानें फार युक्ति केल्या, तरी तो उघड लढाई करीना.

या वर्षांत अमेरिका देशांतील संस्थानांचे

तंटे बंद होण्याविषयीं दुसरा एक प्रयत्न झाला. त्या देशांत तह करण्याकरितां अर्लक्यार्लैल, ईड्न साहेब आणि गवर्नर जान्स्तन असे तिघे गृहस्थांस पाठविलें, तो तह सिद्धीस जाणार नाहीं हें सर्वांनी पूर्वी सांगितलेंच होतें. तेथें पाठविलेले एके गृहस्थानें रीड साहेब या नांवाचे एके अमेरिकन सरदारास, तह करण्यासाठीं यत्न केला असतां दहा हजार पौंड, आणि त्या देशांत राज्यांतली कोणती पाहिजे ती जागा देऊं असें जेव्हां कबूल केलें, त्यावेळेस त्यानें तो लांच असें समजून उत्तर दिलें कीं, " मी विकत घेण्यास योग्य नव्हे; परंतु मी असा असतांही ब्रिटन एथील राजास मला विकत घेण्याची शक्ति नाहीं."

आतां स्पेन देशचे राजानें फ्रेंच राजाप्रमाणें अमेरिकन लोकांचा स्वतंत्रपणा कबूल केला. मग त्या दोन सरकारांचीं गलबतें एकत्र जमून इंग्लिश यांस अजिंक्य झालीं. या उन्हाळ्यांत कांहीं मिलिशिया लोक ही लढाईकरितां तयार केले.

इ.स. १७८० यावर्षी पार्लमेंट सभेमध्यें विचार होऊन कित्येक ठिकाणीं खर्च कमी केला, आणि कित्येक निरुपयोगी कारखाने होते, ते मोडले. प्रधानांचे सांगण्यावरून

सरकारी साहेबांचे चौकशीकरितां कमिशनर नेमिले, आणि त्यांनीं चौकशी केल्यावरून सरकारी वसूल व खर्च यासंबंधि बहुत गोष्टींची उघडीक झाली.

यावर्षीं पूर्वीं कर्जानें व दारिद्र्यानें पीडित अशे एके पुरुषानें ब्रिटिश निशाणाची अबरू वाढविली. त्याचें नांव आड्मरल् राड्नी, यानें एक बळकट अरमार घेऊन जिबराल्टर बंदरास जात असतां प्रथम स्पानिश व्यापारी गलबतांची एक मातबर टोळी घेतली, मग त्यांचे लढाऊ गलबतांचा मोड करून आड्मरल डान लान्गारा याचे गलबतां खेरीज दुसरीं तीन गलबतें घेतलीं, पुढें कांहीं महिन्यांनीं वेस्तइंडीस प्रांतांत कौंट डीगिशेन याचे हाताखालचे दुसरे एक अरमाराचा मोड केला, आणि ११० तोफांचे विल्डिपारिस या नांवाचें गलबत होतें. तें व दुसरींही घेतलीं. या त्याचे शूर कर्मासाठीं त्यास लार्ड असा किताब मिळाला.

यावर्षांत अमेरिका देशामध्यें मुख्य गोष्टी इतक्या झाल्या. सौथक्यारोलिना प्रांतांत चार्लसटौन शहर सरहेन्री क्लिंटन व आड्मरल आर्बथ्नाट या दोघांनीं घेतलें. लार्ड कार्न्वालिस यानें जनरल गेट्स याचा पराजय केला; ब्रिटिश फौजेचा आ-

डुजटेंट जनरल मेजर आंद्रे, अमेरिकन फौजेंत गुप्त वेषानें सांपडला, त्यास चोर बातमीदार म्हणून धरून फांशीं दिलें, आणि जनरल आर्नोल्ड अमेरिकन लोकांचा पक्ष सोडून ब्रिटिश फौजेंत आला.

इंग्लिश देशांत फार वाईट आणि फजीतीचीं वर्तमानें घडलीं. रोमनक्याथोलिक लोकांस पार्लमेंट सभेनें कांहीं सूट करून दिली, त्यामुळें दोनही पार्लमेंट सभांस अर्जी करण्याकरितां सेंटजार्जस फील्ड्स या नांवाचे ठिकाणीं दांडगे लोकांची मंडळी जमली, आणि लवकरच फार दांडगाई होऊं लागली. त्यांनीं शहरामध्यें किंवा जवळ जीं रोमन क्याथोलिक लोकांचीं देवळें होतीं तीं मोडलीं, आणि न्यूगेट, फ्लीट आणि किंग्स्बेंच हे सर्व बंदिखानें जाळिले, आणि ते मोठे पेढीवरही हल्ला करण्याचे बेतांत होते, इतक्यांत लढाईचें काम शिकलेले लंडन आसोशिएशन या नांवाचे लोकांनीं, व पुढें शिपाई लोकांस बोलावलें, त्यांनीं मिळून ती धांदल बंद केली, परंतु ती करणारांतील मुख्य लोकांतून सुमारें दोनशें वीस मारिले गेले, आणि फार जखमा लागल्या. हा जमाव मिळविला म्हणून लार्डजार्ज गार्डन याची चौकशी झा-

ली, परंतु त्याचे मनांत धर्माच्या गोष्टीमुळें उमेद आ-
ली होती, आणि लोकांनीं दांडगाई करावी हा त्याचा
कांहीं बेत नव्हता, म्हणून त्यास सोडून दिलें.

या वर्षांत वर्तमानें मोठीं किंवा बहुत ही घड- इ॰स॰ १७८१
लीं नाहींत. इंग्लिश लोकांनीं डच लोकांबरोबर ल-
ढाई आरंभिली. वेस्ट इंडीस प्रांतांत सेंट युस्ते
शियस बेट त्यांकडून इंग्लिश यांनीं घेतलें, परंतु
पुढें लवकरच फ्रेंच लोकांनीं तें परत घेतलें. डागर
बांक याचे बाहेरचे बाजूस आड्मरल पार्कर या
चे हातारवालचीं कांहीं थोडीं इंग्लिश गलबतें, व
आड्मरल झूटमान याचे हातारवालचीं तित-
कींच डच गलबतें यांमध्यें मोठे निकराची लढाई
झाली. ती लढाई साडेतीन तासपर्यंत उभयपक्षीं
मोठे शौर्यानें चालली, परंतु शेवटीं दोघांतून कोणा-
चाच जय झाला नाहीं.

अमेरिका देशामध्यें जमिनीवरून व समु-
द्रांतून कांहीं लहान लढाया झाल्या, त्यांतून कित्ये-
कांत इंग्लिश यांचा मोड झाला, कित्येकांत जय
झाला. परंतु शेवटीं इंग्लिश लोकांचा दुसरा सरदा-
र अर्ल कार्न्वालिस यानें आपणास अशे संकट

डुजटेंट जनरल मेजर आंद्रे, अमेरिकन फौजेंत गुप्त वेषानें सांपडला, त्यास चोर बातमीदार म्हणून धरून फांशीं दिलें, आणि जनरल आर्नोल्ड अमेरिकन लोकांचा पक्ष सोडून ब्रिटिश फौजेंत आला.

इंग्लिश देशांत फार वाईट आणि फजीतीचीं वर्तमानें घडलीं. रोमनक्याथोलिक लोकांस पार्लमेंट सभेनें कांहीं सूट करून दिली, त्यामुळें दोनही पार्लमेंट सभांस अर्जी करण्याकरितां सेंटजार्जूस फील्ड्स या नांवाचे ठिकाणीं दांडगे लोकाची मंडळी जमली, आणि लवकरच फार दांडगाई होऊं लागली. त्यांनीं शहरामध्यें किंवा जवळ जीं रोमन क्याथोलिक लोकांचीं देवळें होतीं तीं मोडलीं, आणि न्यूगेट, फ्लीट आणि किंग्स्बेंच हे सर्व बंदिखानें जाळिले, आणि ते मोठे पेढीवरही हल्ला करण्याचे बेतांत होते, इतक्यांत लढाईचें काम शिकलेले लंडन आसोशिएशन या नांवाचे लोकांनीं, व पुढें शिपाई लोकांस बोलावलें, त्यांनीं मिळून ती धांदल बंद केली, परंतु ती करणारांतील मुख्य लोकांतून सुमारें दोनशें वीस मारिले गेले, आणि फार जखमा लागल्या. हा जमाव मिळविला म्हणून लार्डजार्ज गार्डन याची चौकशी झा-

ली, परंतु त्याचे मनांत धर्माच्या गोष्टीमुळें उमेद आली होती, आणि लोकांनीं दांडगाई करावी हा त्याचा कांहीं बेत नव्हता, म्हणून त्यास सोडून दिलें.

या वर्षांत वर्तमानें मोठीं किंवा बहुतही घडलीं नाहींत. इंग्लिश लोकांनीं डच लोकांबरोबर लढाई आरंभिली. वेस्ट इंडीस प्रांतांत सेंट युस्तेशियस बेट त्यांकडून इंग्लिश यांनीं घेतलें, परंतु पुढें लवकरच फ्रेंच लोकांनीं तें परत घेतलें. डागर बांक याचे बाहेरचे बाजूस आडमरल पार्कर याचे हाताखालचीं कांहीं थोडीं इंग्लिश गलबतें, व आडमरल झूटमान याचे हाताखालचीं तितकींच डच गलबतें यांमध्यें मोठे निकराची लढाई झाली. ती लढाई साडेतीन तासपर्यंत उभयपक्षीं मोठे शौर्यानें चालली, परंतु शेवटीं दोघांतून कोणाचाच जय झाला नाहीं. इ॰स॰ १७८१

अमेरिका देशामध्यें जमिनीवरून व समुद्रांतून कांहीं लहान लढाया झाल्या, त्यांतून कित्येकांत इंग्लिश यांचा मोड झाला, कित्येकांत जय झाला. परंतु शेवटीं इंग्लिश लोकांचा दुसरा सरदार अर्ल कार्न् वालिस यानें आपणास अशे संकट

स्थळीं पडून घेतलें कीं, **अमेरिका** व **फ्रांन्स** एथील मिळालेल्या फौजा **जनरल वाशिंग्तन** याचे हाता खालीं होत्या, त्यांनीं त्यास व त्याचे सर्व फौजेस धरून कैद केलें. त्यावरूनही, त्या देशांत लढाई करून फळ नाहीं, हें प्रधानाचे ध्यानांत आलें नाहीं.

हिंदुस्थानांत हैदर अली व मराठे यांनीं मिळून **इंग्लिश** यांशीं लढाई केली, **कर्नल बेली** साहेबाचा मोड केला, व **सर हेक्टर मनरो** साहेबास पळविलें; परंतु पुढें **सर अयरकूट** यानें येऊन फौजेचा सरदारपणा आपण घेऊन शत्रूंचा पराजय केला.

इ॰ स॰ १७८२ **लार्ड कार्नवालिस** धरिला गेल्यावर **अमेरिका** देशांतील लढाई केवळ जरी बंद झाली नाहीं, तरी ती बंद झाल्याप्रमाणेंच झाली. लढाईपासून जी गोष्ट साध्य करावयाची होती, तिची आशा व्यर्थ असें कळून आलें, आणि पुढें ज्या लढाया झाल्या त्या तेथील संस्थानें स्वाधीन करण्यासाठीं नाहीं, परंतु **ब्रिटिश** फौजेची अबरू राहाण्याकरितां झाल्या. अशी लढाईची निराशा झाल्यावर लोकांचे मनांत तह व्हावा अशी इच्छा झाली, परंतु इतके दिवस ज्या

प्रधानांनीं मोठे अभिमानानें लढाई चालविली होती, त्यांच्या हातानें चांगला तह होईना, म्हणून नवे प्रधानांची गरज अवश्य लागली. मग जुने प्रधान दूर करून नवे नेमिले. **मार्कुइस राकिंगम** यास **लोर्डट्रेझरर**, **लार्ड जान क्यावेंडिश**, यास एक्सचेकर याचा चान्सेलर, **फाक्स साहेब** आणि **लार्ड शेलबर्न** यांस राज्याचे सक्रेतारी, **ड्युक रिचमंड** यास **आईर्नान्स** याचा **मास्तर जनरल**, म्हणजे तोफखान्यांचा मुख्य, आणि **जनरल कान्वे** यास फौजेचा मुख्य सरदार अशा नेमणुकी झाल्या. **लार्ड थर्लो**, **चान्सेलर**, या वांचून जुने प्रधानांतील एकही अधिकारावर राहिला नाहीं.

**स्पेन** देशाशीं लढायांचा प्रारंभ झाल्यापासून **जिबराल्टर** बंदराचे किल्ल्या सभोंवता त्या देशाचे लोकांचा वेढा होता, परंतु तेथील **इंग्लिश** यांचा सरदार **जनरल एलियट** याचें चातुर्य, आणि शूरपणा यांपुढें त्यांचे सर्व उपाय व्यर्थ झाले. परंतु त्यांनीं दुसरे ठिकाणीं **मेदितरेनियन** समुद्रांतील **मिनार्का** बेट आणि **अमेरिका** देशांत **वेस्ट फ्लारिडा** प्रांत हीं दोन **इंग्लिश** यांपासून घेत-

ली.

नंतर नवे प्रधानांनीं तहाचें काम चालू केलें. **पारिस** शहरांत बोलणीं चालू झालीं, परंतु मुख्य प्रधान **मार्कुइस राकिंगम** मेला, त्यामुळें त्यांची दुर्दशा झाली. त्याचे जागेवर **अर्लशेलबर्न** याची नेमणुक झाली, या गोष्टीपासून राज्यकामांतले कित्येक मुख्यांस तिरस्कार आला, आणि **फाक्स** साहेब, **लार्डजानक्यावेंडिश**, **बर्क** साहेब आणि दुसरे कित्येक गृहस्थ यांनीं आपलीं कामें सोडिलीं. नवे प्रधानांनींही तहाचीं कलमें जशीं चांगलीं ठरतील, तशीं ठरविण्याचा उद्योग केला, परंतु **फाक्स** साहेब आणि **लार्डनार्थ** यांचीं राज्यकारणाचीं मतें पूर्वीं वेगवेगळीं असतांही ते आतां एक मत करून मित्रभावानें वागूंलागले, आणि त्या दोघांचा **पार्लमेंट** सभेंत मोठा मान होता, म्हणून प्रधानांचे इच्छे-
इ॰स॰ १७८३ प्रमाणें तह सिद्धिस गेला नाहीं. या रीतीनें **मार्कुइस राकिंगम** याचे हाताखालीं **फाक्स** साहेबानें जो तह आरंभिला होता, तो त्यानें सिद्धीस नेला, आणि **लार्डनार्थ** यास पूर्वीं जी **अमेरिका** देशांतील संस्थानें घेण्याची आशा होती, त्यांची स्वतंत्र-

ला त्यास कबूल करावी लागली.

असा तह झाल्यावर, आणि नुकताच राज्यांतील कामगारांत फेर पडला होता, व एक मत झालें होतें यामुळें जी गडबड झाली होती ती संपल्यावर, प्रधानांनीं एक मोठा विचार करावयास आरंभिला. तो हाकीं, ईस्ट इंडियाकंपनी यांचे स्वदेशांतील व परदेशांतील कारभाराचा बंदोबस्त करावा. कंपनी यांच्या व्यापारांत आणि राज्यांत जे दोष होते, ते असे उघड झाले कीं, ते झांकतां येईनात, किंवा त्यांस काहीं बयाद सांगतां येईना; म्हणून लबाडीच्या वाटा बंद करण्याकरितां, आणि पूर्व देशचे रीतींतील सर्व दोष नीट करण्याकरितां फाक्स साहेबानें एक बेत योजिला. तो असा कीं इस्ट इंडिया कंपनी यांचे डरेक्टर व प्रोप्रेइटर यांच्या सर्व व्यापारासंबंधि आणि राज्यसंबंधि अखत्यार काढावा; त्यांचें लीडन्हाल गल्लींतलें घर, वह्या, व कागद, हीं सर्व घ्यावीं, आणि सर्व सत्ता, बंदोबस्त, लढाई व तह करण्याचा अखत्यार, व त्यांचा सर्व वसूल, हीं सात कमिशनर यांचे सत्तेखालीं ठेवावीं. ते कमिशनर प्रथम पार्लमेंट सभेनें नेमावे, परंतु मग राजानें नेमावे;

आणि ते जंवपर्यंत चांगले चालतील, तंवपर्यंत त्यांजवळ कामें असावीं, आणि पार्लमेंट सभेनें प्रार्थना केल्यावांचून त्यांस दूर करूं नये.

पूर्वीचे प्रधानांचे पक्षाचे लोक, व ज्यांस ईस्ट इंडिया कंपनी यांचे व्यवहाराचें कांहीं अगत्य होतें, त्यासर्वांनीं हा बेत मोडण्याचा उद्योग केला, आणि तो सरकारचें व लोकांचें नुकसान करून स्वार्थ साधण्याकरितां योजिला आहे, असें समजून सर्व लोकही त्यास विघ्नें करूं लागले. कामन्स सभेंत याबेताचे विरुद्ध लोकांमध्यें मुख्य विलियम पिट साहेब होता. कंपनी यांची सनद मोडली जाते, कमिशनर यांजकडे सत्ता फार होते, सरकारचे सत्तेची आणि लोकांचे स्वतंत्रतेची खराबी होते, हे मुख्य दोष त्या कायद्यावर सभेमध्यें आणि बाहेर लोक ठेवूं लागले. तथापि फाक्स साहेबाचा कायदा शेवटीं कामन्स सभेस मान्य झाला.

लार्ड यांचे सभेमध्यें त्यावर यांपेक्षां जबरदस्त दोष दिले. ते हे कीं, त्यापासून रयतेचे मालाची खराबी होते, आणि राज्यांतील तीन मोठ्या सत्तांपेक्षां ही मोठी सत्ता उत्पन्न होते. मग त्याविषयीं फार

वाद होऊन शेवटीं तो रद्द झाला.

असा प्रधानाचा फार प्रीतीचा बेत रद्द झाल्यावर, ते, आणि पार्लमेंट सभेंत जे त्यांशीं विरुद्ध लोक होते त्यांमध्यें, कांहीं वेळपर्यंत तंटा चालला. नंतर नवे प्रधान नेमिले, व त्यांमध्यें मुख्य प्रधान आणि एकुस्चेकर याचा चान्सेलर या दोन जाग्यांवर पिट साहेबास नेमिलें. परंतु कामन्स सभेंत त्याचे मतलब सिद्धीस जाईनात, कारणकीं तींतील फार लोक जुन्या प्रधानाचे पक्षाचे होते. या दोन पक्षांचा मिलाफ करण्याकरितां कित्येक लोकांनीं प्रयत्न केले, परंतु ते सिद्धीस गेले नाहींत, म्हणून काम नीट चालवण्याकरितां त्या पार्लमेंट सभेस निरोप देऊन दुसरी सभा करावी असा विचार करून, राजानें तसें केलें. २५ मार्च इ॰स॰ १७८४

या सांप्रतचे प्रधानाची नेमणुक कायद्याप्रमाणें झाली किंवा नाहीं, आणि लोकांचे मनांत ज्या गोष्टी होत्या, त्या आणि जुने प्रधानाचे पक्षाची जी फजीती झाली ती वाजवी किंवा नाहीं, हा विचार कसाही असो. परंतु इतकें खरें कीं, नव्या नेमणुकी झाल्या त्यांमुळें जुने प्रधानाचा पक्ष अगदीं मोडला. त्या पक्षाचे

मुख्य लोक मोठे संपत्तिवान्, वजनदार, अबरूचे, आणि त्यांतून बहुत गुणी, असे होते, त्यांतून क्रमारें तिसांची नेमणूक नव्या सभेंत झाली नाहीं. पुढें प्रध नांचे पक्षावर बहुत संमतें पडूं लागलीं, व लोकही त्यांचे कृत्यांवर फार भरंवसा ठेवूं लागले.

हिंदुस्थानसंबंधि कारभाराचें आजूनही अगत्य होतें, म्हणून पिट साहेबानें तीन कायदे करून पार्लमेंट सभेंत नेले. त्यांपासून सरकारचें व लोकांचें पहिले कायद्यांपेक्षां अधिक हित होईल, आणि कंपनी सरकारचे चाकरांचे वाईट चालींचा बंदोबस्त त्या प्रमाणेंच होईल, असें होतें. या कायद्यांस जुने प्रधानांचे मित्रांनीं जितका अटकाव करवेल तितका केला, परंतु शेवटीं ते ठरले. त्या कायद्यांप्रमाणें कंपनी सरकारचे कारभाराचे चौकशीकरितां कित्येक चौकशी करणारांची मंडळी बोर्डआफकंत्रोल या नांवाची नेमिली, ती त्याप्रमाणें अजून चालत आहे. डुरेक्टर व प्रोप्रैइटर यांचे हक्क तसेच राहिले. हे कायदे ठरल्यावर बर्क साहेबानें सभेस आपला अभिप्राय कळविला कीं, बंगाल्याचा गव्हर्नर जनरल हेस्तिंग्झ साहेब, याचे वर्तणुकीची चौकशी चालवावी असें मा-

झे मनांत आहे.

त्या सभेच्चे बैठकींत पुढें खर्चाचा बंदोबस्त झाला, व जकात दिल्याशिवाय माल आणण्यामुळें दर साल वीस लक्ष पौंड तोटा होत होता, तो बंद होण्याकरितां एक कायदा ठरला. याकरितांच, दुसरा कायदा केला, असाकीं चहावरची मोठी जकात कमी केली, आणि याचे बद्दल खिडक्यांवर कर बसविला. या कल्यांची पार्लमेंट सभेंत व बाहेर फार निंदा झाली. असा जकात न दिलेला जिन्नस येऊं नये म्हणून पिट साहेबानें सर्व जातींचे ब्रिटिश दारूवरचे जकातीच्या बंदोबस्ताविषयीं, आणि वेस्ट इंडीस देशापासून आलेले दारूवर कांहीं वेळपर्यंत जकात घेऊं नये असा कायदा केला.

पुढें पिट साहेबानें ६००००० पौंड उसनवार घेतले. टोप्या, फिती, वगैरे यांवर कर बसविण्याचा बेत केला, त्याविषयीं बहुत वाद होऊन तो रद्द झाला, परंतु उसनवारीचा करार आणि रीति, यांची विरुद्ध लोकांतील मुख्यांनींही स्तुति केली. सन १७४५ त बंड संपलें, तेव्हां स्काट्लंड देशांतील कित्येक लोकांचे वित्तविषयाची सरकारांत जप्ती केली होती, तो प-

रत देण्याचा कायदा डुंडास साहेबानें उपक्रम केल्यावरून दोनही सभांत ठरला.

इ.स. १७८५ दुसरे वर्षीं फार वर्तमानें घडलीं नाहींत. पिट साहेबानें पार्लमेंट सभेंत, दुसरे शंभर लोक प्रजांकडुन्चे असावे, आणि त्यांच्या नेमणुकी करण्याच्या पूर्वीं ज्यांस अधिकार नव्हता, अशे एक लाख लोकांस अधिकार द्यावा, असा कायदा ठरवून घेण्याचा उद्योग आरंभिला. परंतु सभेंतील अधिक लोक या बेतास विरुद्द होते, म्हणून त्यांनीं तो कायदा सभेंत रीतीप्रमाणें येऊं दिला नाहीं. तोफखान्याचा मुख्य ड्युक रिचूमंड यानें नवे किल्ले बांधण्याकरितां बेत करून सभेंत आणिला, त्याविषयीं पूर्वीं फार खर्च झाला होता, म्हणून कांहीं वेळपर्यंत त्याचा विचार होऊन शेवटीं स्पीकर याची मात्र एक अधिक संमती पडून तो रद्द झाला.

पूर्वींचे लढाईंत ज्या अमेरिकन लोकांनीं इंग्लिश यांचा पक्ष धरिला होता, त्यास सरकारानें कांहीं आश्रय द्यावा हें योग्य होतें. तह झाल्यावर त्यांचे स्थितीविषयीं बहुत वाद झाले होते, आणि त्यांची चौकशी करण्याकरितां कमिशनर नेमिले होते.

आतां पिट साहेबानें सभेस कळविलेंकीं, कमिशनर यांनीं ४७१००० पौंड त्या कामास एकंदर द्यावे असें ठरविलें. त्यानें सांगितलेंकीं, यांतून १५०००० पौंड अर्जदारांस लागलेच द्यावे, आणि पुढें त्यांचा चरितार्थ होण्याकरितां सोडतीनें पैका उत्पन्न करावा. त्या बेठकींत ग्रेटब्रिटन आणि अयर्लंड या दोहोंमध्यें व्यापाराची नवी रीति असावी असा कायदा निघाला. त्यास विरुद्ध अर्ज्या बहुत व्यापाराचे शहरांतील लोकांनीं दिल्या. या कायद्यावर दोनही राज्यांतील पार्लमेंट सभांत बहुत वाद झाला. इंग्लिश पार्लमेंट सभेंत तीन महिनेपर्यंत त्याचा विचार चालला होता. एकवेळ लार्ड सभेंत तो रद्द होऊन कामन्स सभेंत आला, तेव्हां पिट साहेबानें ठरविलेंकीं, आपण जें काय केलें तें राजास कळवावें. मग तें काम ऐरिश पार्लमेंट सभेकडे सोंपवून दिलें, तेथें पुरा वाद होऊन सर्व बेत शेवटीं रद्द झाला.

इ॰स॰ १७८६ पुढील वर्षाचे प्रारंभीं पिट साहेबानें राज्यखर्चासंबंधि एक कायदा करण्याचा उपक्रम केला. तो त्याचे मनांत फार दिवसांपासून होता, आणि राज्यसं-

बंधी बहुत लोकांनीं त्याचा फार विचार केला आहे. तो असा कीं, सरकारी कर्जाचा फडशा करण्याकरितां एक पुंजी उत्पन्न करावी. या कामासाठीं कमिशनर यांचे हातीं प्रति तीन महिन्यांत २५००० पौंड याप्रमाणें दरसाल दहा लक्ष पौंड जमा करावे. त्या पैक्याचा चक्रवाढ व्याजानें थोडक्या दिवसांत फार ऐवज होईल, अठ्ठावीस वर्षांत चाळीस लाख पौंड, मुदलावर जाजती व्याज येईल असें योजिलें होतें. हा पैका दुसरे कोणते कामास लावूं नये असें केलें होतें. या बेतावर उभयपक्षीं मोठे चातुर्यानें फार वाद झाले; परंतु शेवटीं तो ठरला.

ारि. २ ागष्ट यावर्षीं एक चमत्कारीक गोष्ट घडली. तीं अशी कीं, सेंट जेम्स वाड्याचे दरवाजांत राजा रथांतून उतरत असतां अर्जी देण्याचे मिषानें तेथें एक निकल्सन या नांवाची बायको होती, तिनें राजाचे आंगावर छुरी मारिली. परंतु दैववशात् त्याचे आंगास कांहीं दुखापत झाली नाहीं. चौकशी केली तंव ती बायको वेडी असें कळलें, म्हणून तिला बेथ्लम आस्पितल एथें पाठविलें. त्यावेळेस लंडन व इतर शहरचे लोकांनीं राजास संतोषाचीं

पत्रें पाठविलीं.

याचवर्षांत दुसरी एक फार दिवस स्मरण राहाव-या जोगी गोष्ट घडली. ती ही कीं, हेस्तिंग्झ साहेबाची चौकशी होऊन त्यावर शेवटीं गुन्हा ठेवावा, असा निश्चय ठरला. ती चौकशी चालविणारा मुख्य एडुमंड बर्क साहेब होता. त्याचे, व ज्याची चौकशी करावयाची त्याचे गुण आणि कीर्ति यामुळें त्या चौकशीची सर्व लोकांस फार आस्था उपन्न झाली. बर्क साहेबास कांहीं कागद पाहिजे होते, ते त्यास देण्याविषयीं तंटा झाल्यावर शे-वटीं त्या गृहस्थानें हेस्तिंग्झ साहेबावर एकवीस आ-रोप ठेविले, आणि दुसऱ्या महिन्यांत फ्रान्सिस साहेबा-नें नवा एक ठेविला.

ते आरोप असे. पहिला, रोहिले यांबरोबर ल-ढाई केली. दुसरा, लार्डक्लैव यानें मोगल यास कोरा व आलाहाबाद प्रांत दिले होते, त्यांचा वसूल, जेव्हां तो राजा आपली राजधानी दिल्ली एथें गेला, आणि मरा-ठ्यांच्या आश्रयानें राहिला, तेव्हां त्यास दिला नाहीं. ति-सरा, लढाईकरितां काशीचे राजाकडून बहुत मदत मा-गितली, आणि त्यानें नाहीं म्हटलें म्हणून त्यास दंड करून राज्यांतून काढून टाकिलें. चवथा, अयोध्येच्या

बेगम साहेबांस धरून बंदीस ठेविलें, पैका काढण्याकरितां त्यांचे चाकरांस कैद करून पायांत बिड्या घातल्या, त्यांचे कुटुंबास विपत्तींत पाडिलें, आणि त्यांकडून बळानें जाहागीरी व संपत्ति हीं घेतली. पांचवा, फरेकाबादचे राजाची जी अवस्था केली तीसंबंधी. साहावा, साहाळूचे राजासंबंधी. सातवा, दहावा, अकरावा, आणि बारावा, हेस्तिंग्झ साहेबानें कंपनी सरकाराकडून कांहीं मोठे कंट्राकूट म्हणजे मखते केले होते, व सरअयरकूट साहेब यास व आपण कित्येक नवीं कामें करून त्यांवर लोक ठेविले होते त्यांस, पगार फार केला होता, त्यासंबंधी. आठवा, चोरून पैका व कायद्यांबाहेर नजरा घेतल्या त्यासंबंधी. नववा, हेस्तिंग्झ साहेबानें विलायतेंत कित्येक लोकांस आपले नांवानें अधिकार सोडण्याकरितां अखत्यार दिला असतांही आपले जागेवर जो पुढें नेमणुक होऊन आला, त्यास तो मान्य होईना, या संबंधी. तेरावा, अर्काटचा नबाब व दक्षिणेचा सुभेदार (निजाम) यांजवळ वकिलाती पाठविल्या त्यांसंबंधी. चवदावा, मराठ्यांचे तहांत गोहदचे राण्यास सोडला, त्यासंबंधी. पंधरावा, बंगा-

ल्चा वसूल मनास येईल तसा बहुत खर्च केला. सोळावा असा कीं, हेस्तिंग्झ साहेबानें अयोध्या प्रांताचा फार नाश केला. सतरावा, महंमद रिझारखान या नांवाचा कोणी, बंगाल देशची वहिवाट सरकाराकडून फार दिवस चालवीत असे, त्यास हेस्तिंग्झ साहेबानें काढलें त्या संबंधि. अठरावा, हेस्तिंग्झ साहेबानें मोगल यास मराठ्यांचे स्वाधीन केलें. एकुणिसावा, डिरेक्टर यांचा अपमान केला. विसावा असा कीं, मराठ्यांशीं लढाई उत्पन्न केली, त्यामुळें जांशीं तह केला, त्यांविषयीं गैरविश्वास झाला. एकविसावा, कागद पत्र नाहीं असें केलें, आणि बाविसावा, फिझूलाखानाची जी अवस्था केली ती संबंधि.

मग कोणते रीतीनें तें काम चालवावें, याविषयीं कांहीं अडचणी पडल्या त्या गेल्यावर, जून महिन्याचे पहिले तारिखेस बर्क साहेबानें हेस्तिंग्झ साहेबावर पहिला आरोप ठेवावा असें सांगितलें; परंतु त्याविषयीं फार वाद होऊन तें चाललें नाहीं. मग काशीचे राजास काढून दिलें या आरोपाविषयीं वाद होऊन तो लागू झाला, आणि दुसरेही बहुतकरून लागू झाले, म्हणून ठरविलें कीं, लार्ड स-

भेस जाऊन बर्क साहेबानें हेस्तिंग्झ साहेबावर मोठे गुन्हे आणि फार वाईट वर्तणूक यांचा आरोप ठेवावा. हा निरोप लागलाच कळवून जीं कलमें तयार केलीं होतीं तीं लार्ड सभेकडे पाठविलीं. त्याच महिन्याचे २१ वो तारिखेस बर्क साहेबानें गुन्हेगारीचें दुसरें एक कलम आणिलें हे आणि लार्डचान्सेलर यास सांगितलें कीं, हेस्तिंग्झ साहेब कैदेंत आहे, आणि सभेचे पुढें येण्यास तयार आहे. मग हेस्तिंग्झ साहेबास सभेंत आणण्याचा हुकूम केला, आणि कलमें वाचलीं. लार्डचान्सेलर यानें आपले कडचें कांहीं बोलावयाचें असल्यास बोलावें असें त्यास सांगितलें. तेव्हां त्यानें सभा वास्तवीक आहे तें करील, असें बोलून आपले आरोपपत्राची एक नक्कल मागितली, आणि आपला जबाब करण्यास कांहीं मुदत द्यावी, आणि वकील करण्यास व जामीन देण्यास आज्ञा असावी, अशी प्रार्थना केली. मग त्याचे वीस हजार पौंड ऐवजाचे दोन जामीन घेतले, आणि ते जामीन समन साहेब आणि सलिवानसाहेब यांतूनही प्रत्येकाचा दहा हजार पौंड ऐवजाचा जामीन घेतला. आणि लार्ड सभेचे दुसरे बैठकीचे दुसरे दिवशीं त्याचा जबाब

घ्यावा, असें नेमिलें.

म्हणून ही चौकशी एकीकडे ठेवून दुसरीं मध्यें घडलेलीं वर्तमानें लिहितों. पार्लमेंट सभेचे प्रारंभीं ग्रेटब्रिटन व फ्रान्स या दोन देशांमध्यें व्यापाराचा तह ठरून वर्सेल्स शहरांत सह्या झाल्या होत्या, तो तह सभेस जाहीर केला. त्या तहांतील सारांश हाकीं, दोन देशांमध्यें लढाईचे सामानावांचून सर्व जिन्नस आण्यायेण्यास हरकत होऊं नये. या तहावर दोनही सभांत विरुद्ध बोलणीं पडलीं, परंतु व्यापारी लोकांच्या मंडळ्या त्याविषयीं फार विरुद्ध नव्हत्या. फ्रान्स देशामध्यें लोकांस हा तह फार वाईट वाटला, कारणकीं त्यापासून दोनही देशांचे स्वार्थ सारिखे होत नव्हते. या तहाप्रमाणें पोर्टयुगल, स्पेन, आणि मादिरा एथील शराबेवर जो कर होता तो, फ्रेंच दारूवरचे नवे करापेक्षां एक तृतीयांश कमी केला.

या वर्षीं सरकारचा वसूलही कांहीं वाढला, त्यावरून सर्वांस संतोष झाला. प्रधानानें त्या वर्षाचीं जमा व खर्च हीं चांगले रीतीनें झालीं, असें सभेंत सांगितलें; परंतु त्याचे शत्रूंनीं ती गोष्ट खोटी असा पु-

गवा करण्याचा उद्योग केला. त्यावेळीं एक घोड्यावर चाकर मरवू त्यानें द्यावा, असें फार लोकांचें बोलणें विरुद्ध पडलें असतां, पार्लमेंट सभेंत ठरवून घेतलें. प्राटेस्तंट डिसेंटर यांनीं टेस्ट व कार्पोरेशान आकूट या नांवाचे हुकूम फिरवावे म्हणून अर्जी केली, परंतु ती अध्याहत्तर अधिक संमतें पडून रद्द झाली. त्या गोष्टीवरून असें वाटलेंकीं, त्याविषयीं फिरून यत्न केला असतां सिद्धीस जाईल.

मागले वर्षी राजाचा मुलगा प्रिन्सआफवेल्स यानें आपले मोठे खर्चास पुरावयाजोगी आपली प्राप्ति नाहीं असें पाहून, आणि आपण मागितल्यावांचून प्राप्ति कांहीं अधिक वाढावी अशी त्यास आशा होती ती व्यर्थ गेल्यावर, त्यानें सरकार संबंधि आपली शोभा बंद करावी असा निश्चय केला. हा त्याचा उत्तम विचार लोकांस प. ८ चांगला वाटला. त्याविषयीं लोकांमध्यें प्रसिद्ध भाषण होई तेव्हां असे गुणी, उदार राजपुत्रानें पैक्याचे तोट्यासाठीं आपले थोरपणाप्रमाणें जी शोभा पाहिजे होती ती सोडली, ही गोष्ट वाईट झाली असें लोक बोलत असत. म्हणून सउ महिनेपर्यंत त्यानें सा-

धारण लोकांसारिखा राहून आपले कर्जाचा कांहीं फडशा केल्यानंतर, सरकारविरुद्ध लोकांनीं ही गोष्ट पार्लमेंट सभेंत निघेल, असें भय घातलें.

न्यूनहम साहेब म्हणून लंडन शहराकडचा सभासद होता, त्यानें पिट साहेबास विचारिलें. कीं, राजपुत्र सांप्रत संकट अवस्थेंत आहे, तीपासून त्यास मुक्त करावयाविषयीं तुमचें कांहीं बोलणें आहे कीं नाहीं? पिट साहेबानें उत्तर केलें कीं, मला अशी कांहीं राजाची आज्ञा नाहीं. तेव्हां त्या गृहस्थानें कळविलें कीं, चालीप्रमाणें या गोष्टीविषयीं मी कांहीं बोलणार आहें. ती गोष्ट निघावयाचे पूर्वीं एके दिवशीं सभेंत कांहीं भाषण झालें, त्यांत कोणी एके गृहस्थानें सुचविलें कीं, राजपुत्र एके क्याथोलिक मताचे बायकोशीं लग्नाचा बेत करितो असा संशय आहे; परंतु राजपुत्राचे परम स्नेही तेथें होते, त्यांनीं खातरी केली कीं, ती बातमी खोटी. मग सभेमध्यें फार वाद झाल्यावर शेवटीं बाहेर कांहीं मसलत झाल्यामुळें न्यूनहम साहेबास ती गोष्ट काढण्याचें प्रयोजन पडलें नाहीं. राजापासून निरोप आल्यावरून राजपुत्राची नेमणूक

नाति
एपि
इ.न
१७..

दरसाल १०००० पौंड वाढविली; क्यार्लटन वाड्या चें काम चालवावयास २०००० पौंड दिले, आणि त्या चे कर्जाचे फडशाकरितां १६१००० पौंड दिले, राजाचे निरोपांत होतें कीं, " राजपुत्रानें या पुढें आपल्या खर्च प्राप्तीचे आंत आटपावयाची आपली इच्छा आहे अशी माझी पुरी खातरी केली आहे; आणि त्यानें त्या खर्चाचा बेत आणि बंदोबस्त केला आहे, त्यावरून त्याचा यत्न सिद्धीस जाईल असें मला खचित वाटतें.

यावर्षामध्यें हालंड देशांतील संस्थानांत एक फेरफार झाला. तो प्रथम एके फ्रेंच टोळीनें उत्पन्न केला, परंतु त्यामुळें पुढें इंग्लंड व प्रशिया एथील सरकारांस त्या तंट्यांत पडणें जरूर पडलें. ड्युक आफ ब्रन्स्विक याचे हाताखालची प्रशियन फौज सप्तंबर महिन्याचे तेरावे तारिखेस हालंड देशांत गेली; आणि तिनें थोडा परंतु सफल प्रयत्न करून सर्व देशांत स्वस्थता केली. फ्रान्स देशाचे सरकारानें डच लोकांचे पक्षाकडची युद्धाची तयारी करण्याचा आपला बेत जाहीर केला; त्यामुळें ब्रिटिश सरकारानेंही एक अर-

मार तयार केलें, परंतु तें दोनही दरबारांचे संमतानें पुढील अक्टोबर महिन्यांत दूर केलें.

पुढील पार्लमेंट सभेचे बैठकींत मुख्य काम हेस्तिंग्झ साहेबाची चौकशी झाली. लार्ड सभेनें नेमिलें होतें त्याप्रमाणें हेस्तिंग्झ साहेबानें आपलें उत्तर दिलें, आणि कामन्स सभेनें त्याजवर प्रत्युत्तर दिलें. फेब्रुवारी महिन्याचे १३ वे तारिखेस चौकशी व्हावी असें नेमिलें. त्यादिवशीं अकरा वाजतां कामन्स सभा, व तिचेपुढें अन्याय ठेवणारे कामगार, असे आपले सभागृहांतून वेस्तमिन्स्तर वाड्यांत आले, त्यावेळेस त्या प्रसंगाप्रमाणें तेथें बसावयाच्या जागा केल्या होत्या. त्यामंडळीचे पुढें बर्क साहेब होता, ते बांकांवर बसल्यानंतर एकेअर्धतासानें लार्ड आपले वाड्यांतून निघाले. प्रथम पार्लमेंट सभेचे कारकून, मग चान्सरी याचे मास्तर, मग सर्जंट या नांवाचे कामगार, आणि मग न्यायाधीश. त्यांचे मागून एक चोपदार, पियर यांचें वडील मुलगे, मग लहान वयाचे पियर, मग अशार म्हणून कामगार, बारन, बिशप, वैकौंट, अर्ल, मार्केडस, ड्यूक, अर्चबिशप, आणि मग लार्ड- इ॰स॰ १७८८

चान्सेलर. त्या समारंभांत सर्वांचे शेवटीं राजाचे कुटुंबांतली मनुष्यें आलीं. त्यांत प्रथम ड्युक ग्लास्तर याचा मुलगा, आणि शेवटीं प्रिन्स आफ वेल्स. आपले जागेवर जातेवेळेस त्यांनीं आपल्या टोप्या काढून तक्तास सलाम केला. चालीप्रमाणें स्तुति झाल्यावर कोर्ट याचे कारकुनांनीं आरोप वाचून चौकशी चालू झाली, आणि मध्यें कांहीं दिवसांचे अवकाशानें ती तीन महिनेपर्यंत चालली.

या बैठकीचे शेवटीं आफ्रिका देशांतून वेस्त इंडीस प्रांतांत गुलाम पाठविण्याचा चांगला बंदोबस्त करण्याविषयीं एक कायदा झाला. हें लिहिण्याचें कारण कीं, गुलामाचा क्रूर व्यापार बंद करण्याविषयीं हा पहिला यत्न.

त्या वेळेस ब्रिटन देशामध्यें सर्वत्र स्वास्थ्य होतें. युरोप खंडांतील इतर देशांत लढाया आणि तंटे चालले होते. ज्या राजनीतीपासून अशा गोष्टी झाल्या तिचा उपकार मानून, सन १६८८ मध्यें राज्यांत फेरफार होऊन तृतीय विलियम राजा आला, त्या दिवसाचें स्मरण राहाण्यासाठीं, सर्व ठिकाणचे लोक त्या दिवशीं आनंद करीत असत.

लोक यारीतीनें आपले स्वराचे स्थितीचा अनुभव घेत असतां अकस्मात् एक गोष्ट घडून त्यांस दुःख झालें. तें असें कीं, अक्टोबर महिन्याचे शेवटीं राजास दुखणें लागलें, त्यामुळें पार्लमेंट सभेंत पुढें राजा कोण व्हावा याचा विचार करणें प्राप्त झालें. त्यांत एक गोष्ट कठीण पडली ती हीकीं, प्रधान व विरुद्ध पक्षाचे लोक यांमध्यें भेद पडून विचार उत्पन्न झाला कीं, प्रिन्स आफवेल्स, राजाचा मुलगा यास राजा दुखणेकरी आहे तंवपर्यंत सर्व राज्याचा अख्त्यार देऊन कारभार चालवावयास नेमावें. किंवा जी सत्ता आणि जे हक्क राजा जीवंत असतां त्यावांचून दुसरे कोणास उपभोग करण्याचें सामर्थ्य नाहीं, ते त्याचे हातीं नसून त्यानें मुलुखाचा दुसरा कारभार चालवावा, असा बंदोबस्त करावा. प्रधानांचें म्हणणें होतेंकीं, राजपुत्राची सत्ता नियमित असावी. राजाचा घरगुती कारभार राणीचे स्वाधीन करावा, तिला मसलत सांगणारे प्रधान नेमावे, आणि राणी व तिचे प्रधान यांस राजाची प्रकृति बरी झाली असें वाटलें म्हणजे राजानें आपला अधिकार घ्यावा, आणि राजपुत्रानें कारभार सोडावा. हा प्रधानाचा बेत पा-

र्लमेंट सभेतील दुसरे पक्षाचे लोकांस फार विरुद्ध झाला.

त्यावेळेस प्रधान आपलीं कामें सोडणार होते, आणि नवे प्रधानांत विरुद्ध पक्षाचे लोकांची नेमणुक होणार असें दिसत होतें, तथापि सर्व लोकांचा पिट साहेबावर फार भरंवसा होता, ते त्यास स्तुतिपत्रें देत असत, व पार्लमेंट सभेंतही त्याचे पक्षाच्या संमति फार पडत, आणि जर राजपुत्रानें कारभार करावा असें ठरलें असतें, तर फार अडचण राहिली नसती.

त्यावेळेस नियमित सत्ता देऊन राजपुत्रास कारभार चालवावयास नेमिलें असतें, तर सरकारचें वजन कमी झालें असतें; परंतु तो कायदा ठरावयाचे वेळेस दैववशात् राजा दुखण्यांतून बरा झाला अशी बातमी आली. मग राजा चांगला बरा होऊन मार्च महिन्याचे प्रारंभीं राज्यकारभार पाहूं लागला. त्यामहिन्याचे १० तारिखेस लार्ड चान्सेलर यानें चालीप्रमाणें भाषण करून पार्लमेंट सभेचें काम चालू केलें. हें शुभ वर्तमान चांगलेंच देशांत सर्व ठिकाणीं कळलें. चहूंकडून आनंदपत्रें

येऊं लागली; लंडन व वेस्तमिन्स्तर या शहरांत दिवे लावून मोठी शोभा केली. एप्रिल महिन्याचे २३ वे तारिखेस सर्व राज्यांत लोकांनीं ईश्वराचा स्तव करावा असें योजिलें. त्या दिवशीं, राजा दुखण्यांतून निभावला म्हणून ईश्वराची स्तुति करण्याकरितां आपलें सर्व कुटुंब, व दोन पार्लमेंट सभा यांसहित सेंटपाल याचे देवळांत गेला. दुसरे रात्रीस दिव्यांची फारच शोभा झाली, तिचें वर्णन करून ती समजणार नाहीं. गरीब आणि मातबर दोघेही ती शोभा अधिक अधिक करूं लागले.

अयर्लंड बेटांत इग्लंड देशाप्रमाणेंच गजाचे दुखण्यांत राज्यकारभार चालण्याविषयींचे कायदे करावयाचा यत्न झाला. तेथील पार्लमेंट सभेंत ठरलें कीं, राजपुत्राचे सत्तेस कोणताही प्रतिबंध नसावा. ही सत्ता प्रिन्स यास देण्याचे कामाकरितां सहा आसामी नेमिले; परंतु ते येऊन पोंचण्याचे पूर्वींच राजा दुखण्यांतून बरा झाला.

पार्लमेंट सभा जमल्यावर प्रथम लोकांचें लक्ष्य दुकानावरचा कर बंद करण्याचे कामाकडे लागलें. तो थोडे वर्षांपूर्वी पिट साहेबानें बसविला हो-

ता. त्यापासून जुलुम होत नव्हता, तथापि तो बसवि-
ण्याची रीति सर्वांवर सारिखी नव्हती, म्हणून त्याचा
लोकांस फार त्रास आला होता, आणि तो बंद हो-
ण्यासाठीं बहुत वेळ यत्न केला असतांही तो सिद्धी-
स गेला नव्हता. शेवटीं फाक्स साहेबानें सांगित-
ल्यावरून कामन्स सभेनें त्याविषयीं लोकांची प्रार्थ-
ना ऐकिली. पूर्वी टेस्ट व कार्पेरेशन हे कायदे मो-
डण्याविषयीं डिसेंटर लोकांनीं अर्जी केली ती
अधिक संमतें पडून रद्द झाली होती, परंतु पुनः
केली असतां चालेल अशी आशा होती, म्हणून त्या-
विषयीं बोलणें निघालें, तेव्हां अधिक विरुद्ध संमतें
बावीस मात्र पडलीं. यावरून पुनः आशा आली, प-
रंतु ती पुढें फुकट गेली. यावर्षीं गुलामाचा व्यापार बं-
द होण्याकिरितां बहुत यत्न झाला. तो केवळ सिद्धी-
स गेला नाहीं, तथापि त्यास जे विरुद्ध लोक होते ते
पहिल्यापेक्षां थोडे झाले. त्या व्यापारांत ज्या लोकां-
चा संबंध होता, त्यासर्वांस भय पडलें, आणि त्या-
स विरुद्ध अर्ज्या कामन्स सभेंत बहुत येऊं लाग-
ल्या.

यावर्षांत बाकूचे व्यापारांत एक्सैसस काय-

रा चालू झाला. पूर्वीं बहुत वर्षांपासून त्या व्यापारांत लबाड्या उघड होत असत, परंतु एक्सैस कायदा त्या व्यापारावर लागू करणें हें लोकांस चांगलें वाटेना. म्हणून त्या कामांत प्रधानास सभेमध्यें व सभेचे बाहेर बहुत विघ्नें आलीं, तथापि तें दोनही सभांत सिद्दीस गेलें. पूर्वीं सरराबर्ट वाल्पोल याचे अमलांत अशे जातीचे एके कायद्यास इतका प्रतिबंध झाला कीं, त्यामुळें तो लवकर पदच्युत झाला. यावर्षीं कामन्स सभेचा स्पीकर, कार्नूवाल साहेब मेला, म्हणून त्या मोठे जागेवर ग्रेन्विल साहेबाची नेमणुक झाली, आणि त्यानें सरकारचा सेक्रतारी याची जागा कबूल केली, तेव्हां त्यांनीं हेनरी आडिंग्तन साहेबाची नेमणुक केली, त्याची वर्तणुक धीराची होती, आणि तो पक्षपात सोडून निवाडा करीत असे, म्हणून सर्व पक्षाचे लोकांची त्यावर प्रीति बसली.

यावर्षीं फ्रान्स देशामध्यें एक मोठा फेरफार झाला. त्याचा संक्षेपानें वृत्तांत असा आहे कीं, फ्रेंच लोकांचे खर्चाची व्यवस्था फार कठीण होत चालली, उदार कल्पना वाढत चालल्या, भाषण स्व-

तंत्र होत चालले, स्वतंत्रतेचे इच्छिणार फ्रान्स देशा-
मध्यें होते, त्यांची व इंग्लंड देशांतील तशा पुरुषांची
कागदपत्रें होऊं लागलीं, दरबार अशक्त झालें, आणि फौ-
ज लोकांचे पक्षाकडे येऊं लागली, यासर्व कारणामुळें
सर्व राज्य, जुनी राज्यरीति, राजा, मोठे लोक, पार्लि-
मेंट सभा, न्यायाच्या अदालती, आणि हक्क, हीं एक-
दांच नाश पावलीं. पुढें लोकांवर ज्यांनीं आपला हु-
कूम चालू केला, त्यांनीं जर शहाणपणानें आणि शां-
ततेनें सावधगिरीची वर्तणुक केली असती, तर
बरें होतें; परंतु ते मर्यादा नठेवितां सर्वत्र जुलूम
करूं लागले, आणि त्यांनीं चांगला स्वतंत्रपणा स्थिर
करण्याचें सोडून, जे आपल्या स्वाधीन झाले त्यांव-
र जुलुम आरंभिले. हा फ्रेंच राज्यांत फेरफार स-
न १७८९ त झाला, आणि पुढें १७९० त जेव्हां पार्ल-
मेंट सभा जमली तेव्हां सहज त्या गोष्टीविषयीं बो-
लणें होऊं लागलें. या लहानशी गोष्टीपासून मोठ्या
गोष्टी घडल्या. त्याप्रसंगीं बर्क साहेबानें फ्रान्स
देशांतील कामगारांची फार निंदा केली. त्यावरे,
विरुद्ध पक्षामध्यें त्याचे सोबती फाक्स साहेब व
शेरिडन साहेब यांनीं उत्तर दिलें. त्यांतून दुसरे

गृहस्थास बर्क साहेबानें म्हटलेंकीं, या घटिकेपासून तुमचा आमचा राज्यकारणीं स्नेह तुटला. प्रधान बर्क साहेबाचे मतास आश्रय देत असत, परंतु त्याचे बोलण्याचा कठोरपणा त्यांस मान्य नव्हता. या कज्जापासून पुढें विरुद्ध पक्षांत फुट पडली, व वाढत जाऊन तीपासून देशाचे स्वस्थतेंत अंतर पडावयाजोग्या गोष्टी बहुत घडल्या.

टेस्ट व कार्परेशन हे कायदे मोडण्याविषयीं दोन यत्न झाले, म्हणून पूर्वी सांगितलें. त्यांतून शेवटचे वेळेस अशी आशा आली होतीकीं, पुनः यत्न केला असतां सिद्धीस जाईल. परंतु डिसेंटर लोकांस फ्रेंच राज्यांत फेरफार झाला, व त्यापुढें जीं हत्यें झालीं त्यांची मोठी आवड आहे हें प्रसिद्ध होतें, म्हणून धर्मपक्षी व दरबारी लोक यांस भय पडलें. पुढें जेव्हां ते कायदे मोडण्याविषयीं पुनः बोलणें निघालें, तेव्हां बर्क साहेबानें डिसेंटर लोकांचे मनांतील गोष्टी सभेस सांगितल्या. त्या तेथें सभासद होते त्यांचे मनांत बऱ्याच भरल्या, ते कायदे न मोडण्याविषयीं प्रधानांनीं अशा युक्ति सांगितल्या, व कांहीं नवे गोष्टींचें त्यावेळेस इतकें भय होतें कीं,

अधिक संमतें पडून ते कायदे मोडूं नये असें ठरलें. ते समयीं सुमारें ४०० सभासदांनीं आपली संमतें दिली.

तेव्हां फुड साहेबानें पार्लमेंट सभेचे रीतींत कांहीं फेरफार करण्याचा बेत सभेंत आणिला होता. परंतु नव्या गोष्टींस लोक भितात, व फ्रान्स देशांत राज्यरीतीमध्यें कशीं कशीं संकटं उत्पन्न झालीं हें उघड आहे, ह्मणून तो बेत मतभेद नपडतां रद्द होईल, असें समजून फुड साहेबानेंच तो सभेंतून काढला. त्या बेताचा सारांश असा कीं, कामन्स सभेंत नवे दुसरे शंभर लोक अधिक असावे, व ते नेमण्याचा अधिकार सर्व प्रांतांतील रहाणारे नवे बहुत घरवाले लोकांस असावा. त्याचें दुसरें म्हणणें होतें कीं, शेरिफ व त्याचे डेप्युटी यांनीं त्यादिवशीं प्रति पारिशीं* यांत रहाणारे घरवाल्यांच्या संमति घ्याव्या.

पूर्वीं सांगितलें त्यावांचून या सभेंत दुसरें राज्यांतील वहिवाटीसंबंधि काम फार झालें नाहीं. परंतु इंग्लिश सरकार व स्पेन देशाचें सरकार या दो-

---

* एके धर्मपक्ष्याचे अमलाखालीं जितका प्रांत असतो, त्याचें नांव पारिश.

घांमध्यें एक तंटा झाला. त्यावरून शेवटीं लढाई होई-
ल असें भय पडलें. सन १७८६ मध्यें कित्येक ब्रिटिश
व्यापाऱ्यांनीं चिनई लोकांस चांमडीं पुरवावयासाठीं
नूटकासौंड या बंदरीं व्यापार चालवावयाचा बेत
आरंभिला. सन १७८८ यावर्षीं त्यांनीं आपलें तें सं-
स्थान टिकावयाजोगें जमविलें. परंतु त्या अपहारामु-
ळें स्पानियार्ड लोकांस राग येऊन सन १७८९ चे
मे महिन्यामध्यें त्यांचे एके गलबतानें इंग्लिश यांचीं दोन
गलबतें कैद केलीं, आणि त्यांनीं संस्थान केलें होतें
तें घेतलें. जेव्हां ही गोष्ट कामन्स सभेंत आली, ते-
व्हां प्रधानास आज्ञा झाली कीं, तिचा स्पानिश दर-
बारांतून बंदोबस्त व्हावयाजोगी तजवीज करावी.
तेव्हां सुमारें तीस लाख पौंड खर्चून एक अरमा-
र तयार केलें. हें अरमार मोठें भयंकर दिसलें त्यामु-
ळें, किंवा तहाचा उपाय करण्याची स्पेन देशाचे दर-
बारास इच्छा होती, यामुळें असें ठरलें कीं, ब्रिटिश
वकिलानें जी खातरी व तोटा भरून देण्याविषयीं
बोलणें लाविलें आहे, तें प्रथम कबूल करावें. पुढें बो
लणें झालें त्यांत, इमारती व गलबतें परत द्यावीं.
आणि ब्रिटिश लोकांचा जो तोटा झाला तो भरून

त्यावर पहिली अन्यायाची चौकशी संपली असें हो-
तें किंवा नाहीं. या विषयीं बहुत तंटा व वाद होऊन
शेवटीं नाहीं असें ठरलें. परंतु यासभेचे बैठकींत ती
चोकशी पुनः चालू झाली नाहीं.

सन १७९१ चे प्रारंभीं कांहीं थोडी हरकत हो-
ऊन एक कायदा ठरलाकीं, इंग्लिश रोमन क्याथो-
लिक यांनीं पोप याचे सत्तेचे विरुद्ध प्रतिज्ञेवर म
ही केली, म्हणजे त्यांस पूर्वीं कित्येक अधिकार नव्ह-
ते, ते मिळतील. ती प्रतिज्ञा अशे शब्दांनीं लिहिली हो-
ती कीं, त्याधर्माचे पक्षाचे उदार लोक होते त्यांच्या-
नें तीवर हरकत करवेना. परंतु तीपासून इतकें
झालेंकीं, तीवर ज्यांनीं सही केली, आणि ज्यांनीं के-
ली नाहीं, त्यांमध्यें भेद पडला. एप्रिल महिन्या-
मध्यें विल्बेर्फोर्स साहेबानें गुलामाचा व्यापार
बंद करण्यासाठीं बोलणें चालविलें, परंतु त्यावर
पंचाहत्तर अधिक संमति पडुन तें रद्द झालें. दुसरा
एक कायदा ठरलाकीं, आफ्रिका खंडाचे पूर्वेचे कां-
ठावर सिएरालिन या नांवाचा प्रांत आहे, तेथें वे-
स्टइंडीस देशचे व दुसरे उष्ण देशाचे जिनस स्व
तंत्र निग्रो लोकांकडुन काम घेऊन उत्पन्न करावे,

अशी सनद एके मंडळीस द्यावी. त्या मंडळीचे कामा-
स बहुत विघ्नें झालीं; परंतु जसजसा तिचा यत्न सि-
द्धीस जाईल, तसतसी तीपासून वेस्टइंडीस देशा-
चे संस्थानाची दुर्दशा होईल.

या पार्लमेंट सभेंत मोठी गोष्टही ठरलीकीं,
क्यानडा प्रांतांत नवी राज्यरीति स्थापावी, त्याप्रां-
ताचे अपर क्यानडा, व लोअरक्यानडा, या नां-
वाचे दोन विभाग करावे, प्रतिराज्यांत राजानें ने-
मिलेलें एक कौन्सिल आणि लोकांनीं नेमलेल्या स-
भा असाव्या, त्यांमध्यें हेबियस कार्पस कायदा मु-
ख्य असावा. तेथील व्यापार चालावयास जितकी
गरज लागेल त्यावांचून दुसरे कर पार्लमेंट सभेनें
बसवूं नये, व त्या करांचा वसूल तेथील प्रांताचे रा-
ज्य करणारांचे स्वाधीन असावा. या बेतापासून सर्व
लोकांस संतोष झाला. यांवर फाक्स साहेबानें कांहीं
विपरीत भाषण केलेंकीं, कौन्सिल यांस सात वर्षां-
नीं एक वेळ नेमणुकी करूं नये, परंतु प्रतिवर्षीं एक
वेळ, किंवा तीन वर्षांनीं एक वेळ कराव्या, आणि कि-
त्येक पदवीचे लोकांस जन्मपर्यंत कौन्सिल यांत ब-
सण्याचा अखत्यार देण्याची सत्ता सरकारानें आप-

गाजवळ ठेविली हें ठीक नाहीं या भाषणावरून फ्रान
देशामध्यें वंशपरंपरेचें किताब व प्रतिष्ठा हीं बुडा
ल्याची कांहीं गोष्ट निघाली, तेव्हां बर्क साहेब उठल
आणि त्यानें फाक्स साहेबाशीं कांहीं रागाचें बोल
णें बोलून पूर्वी जसा शेरिडन साहेबाचा स्नेह तो
डला होता, तसा फाक्स साहेबाचाही तोडला.
त्या फाक्स साहेबाचें व त्याचें पार्लमेंट सभेंत मु
ळापासून एक मत होतें, म्हणून अकस्मात् स्नेह तु
टल्यामुळें फाक्स साहेबाचे डोळ्यांत आश्रुपात
येऊन तो शांततेनें व स्नेहानें बोलूं लागला, परंतु ब-
र्क साहेबानें त्याचा तिरस्कार केला, आणि तेव्हांपा-
सून त्या दोघांचा स्नेह पुनः कधीं झाला नाहीं.

ही सभेची बैठक संपावयाचे पूर्वीं पुनः र-
शिया देशाशीं लढाई होईल असें भय पडलें. हं-
गारी देशचा राजा लिओपोल्ड राज्य करूं लाग-
ला, तेव्हां सन१७९० चे आगष्ट महिन्यांत त्यानें ब्रि-
टिश सरकारचे मदतीनें तुर्कस्थानाचे दरबाराशीं
तह केला. आतां ब्रिटिश सरकारानें रशिया देश-
चे गणीस निरोप पाठविला कीं, तुर्क आणि रशि-
या यांमध्यें पुनः तह व्हावा अशी आमची इच्छा आ-

हे. त्या राणीनें तिरस्कार करून ही मध्यस्थी कबूल केली नाहीं, आणि राजानें कामन्स सभेस निरोप पाठविलाकीं, मी व माझे स्नेही दुसरे राजे यांनीं मिळून तह होण्याचा यत्न केला, परंतु तो सिद्धीस गेला नाहीं, म्हणून आपलें आरमार कांहीं वाढवावें हें मला जरूर दिसतें. या निरोपाचा विचार होऊं लागला, तेव्हां रशियन मुलुखाशीं लढाईविषयीं सभेमध्यें व बाहेर लोकांचें बोलणें इतकें विपरीत पडलें कीं, राजाचा निरोप आल्यामुळें पिट साहेबाचें म्हणणें तर कबूल झालें खरें, परंतु त्यानें योजिलेला बेत सोडून दिला. व पुढें ब्रिटिश सरकारानें आणखी कांहीं मध्यस्थी केल्यावांचून रशिया व तुर्कस्थान यांमध्यें आगस्ट महिन्यांत तह झाला, परंतु तो असाकीं, त्यापासून रशिया देशाचे सरकाराचा स्वार्थ झाला. ही पार्लमेंट सभेची बैठक जून महिन्याचे १० वे तारिखेस बंद झाली.

पूर्वीं लिहिलेंकीं, सन १७८९ मध्यें फ्रान्स देशांत एक फेरफार झाला. तो अशे रीतीचाकीं, त्यापासून राज्याची, धर्माची, आणि लोकांची जुनी रीति अगदीं मोडली. फ्रेंच राज्यांतील खर्चाची व्यवस्था अमेरि-

का खंडांतील लढाईमुळें फार कठीण झाली होती. त्या लढाईमुळें फ्रेंच दरबाराचा गर्व शांत झाला, परंतु सामर्थ्य कमी झालें, म्हणून तेथील राजानें राज्यांतील मुख्य लोकांची सभा केली, आणि तीपासून चांगला कारभार चालेना, म्हणून दुसरी एक स्टेट्स जनरल या नांवाची मोठी केली. ती लुइस राजा १३ वा सन १६१४, तेव्हांपासून झाली नव्हती. तीमध्यें तीन प्रकारचे लोक होते, पहिले, मोठे लोक, दुसरे, धर्मपक्षी, आणि तिसरे, साधारण लोक. हे तिसरे लोक पहिले दोंन प्रकारचे लोकांचे एकंदर संख्येपेक्षां दुप्पट होते, आणि जेव्हां ती मोठी सभा वर्सेल्स शहरांत एकीकडे जमली, तेव्हां विचार पडला कीं, तिघांनीं तीन वेगवेगळे घरीं बसावें, किंवा सर्वांनीं मिळून एके घरांत बसावें. साधारण लोकांनीं शेवटचा पक्ष मोठे आग्रहानें धरिला. मग त्यांनीं नेशनल आसेंब्ली असा आपणास किताब वेऊन सांगितलेंकीं, दुसरे दोंन प्रकारचे लोक जर आजून आग्रह धरितील, तर आम्ही काम चालवावयास मुखत्यार आहों. पुढें मोठे लोक, व धर्मपक्षी, यांस ती गोष्ट कबूल करणें जरूर पडली, आणि त्या सर्वांची सभा एके वाड्यांत झाली. तितक्यांत पा·

रिस शहरावर पन्नास हजार माणसांचा वेढा पडला, आणि जरूर पडल्यास जबरीनें तें शहर शांत राखावें असा बेत होता. असें असतांही प्रजांच्या पक्षाचा प्रधान नेकर साहेब यास सन १७८९ चे जुलै महिन्यामध्यें जागेवरून दूर केलें, तेव्हां पारिस शहरामध्यें एक भयंकर बंड झालें, लढाऊ लोक प्रजांवर गोळी घालीनात, बास्तिल म्हणून एक बंदिखाना पारिस शहरचे लोकांस फार दिवस भयकारक झाला होता, तो लोकांनीं वेढिला, आणि घेतला; तेथील गवरनर व दुसरे कित्येक द्वेष्टे लोक यांचा शिरच्छेद करून त्यांचीं डोकीं मोठ्या उत्साहानें काठीवरून नेलीं; सारांश स्टेटस जनरल सभा एकत्र मिळाल्यानंतर दोन महिन्यांत राज्याचा फेरफार झाला, त्यापासून सर्व युरोप देशास आश्चर्य वाटलें. जुलै महिन्याचे १७ वे तारिखेस राजा पारिस शहरांतील होटेलडिविल या वाड्यांत गेला, आणि लोकांचे स्वाधीन झाला. तेव्हांपासून त्याची राजा म्हणून सत्ता होती ती सर्व गेली नंतर नेशनल आसेंब्ली या सभेचा विजय झाला, म्हणून त्यांनीं मोठे लोक व मोठे लोकांची जमिनीवर सत्ता असावी

हें सर्व मोडिलें, धर्मपक्ष्यांच्या जिनग्या जप्त करून त्यांनीं इतर सरकार चाकरांसारिखें सरकार देईल तें घेऊन रहावें असें केलें, आणि सर्व महंतांचीं संस्थानें बंद केलीं. अक्टोबर महिन्यांत वर्सैला शहरांत दुसरा एक दंगा केला, म्हणून राजा, त्याचें कुटुंब व नेशनल आसेंब्ली हीं पारिस शहरास निघून आलीं. वास्तविक राजा आतां कैदेंतच होता, कारणकीं त्याचा राजाप्रमाणें मान राखीत असत, परंतु तो काय करितो याची फार चौकशी होत असे. या दुःखदायक स्थितीपासून सुटावयाकरितां त्यानें सन १७९१ त, आपण, राणी, आपली बहीण, मुलगा, आणि मुलगी यांस बरोबर घेऊन जाण्याचा यत्न केला. तो राज्याच्या शेवटीं पोंचला होता, इतक्यांत त्यास धरून पुनः पारिस शहरास नेलें. परंतु त्यावेळेस प्रजापक्षाचे लोकांमध्यें शांतपणा इतका होताकीं, त्यांनीं त्यानंतर कांहीं दांडगाईचें कर्म केलें नाहीं. नेशनल आसेंब्ली या सभेनें नवी राज्यरीति पुरी केली, ती राजानें त्यावर्षींचे सप्टंबर महिन्यांत मान्य केली, आणि पुढें त्या सभेनें निरोप घेऊन नवी झाली परंतु तीमध्यें जुने सभा-

सदांतून कोणाची नेमणुक केली नाही. यामुळें फ्रान्स देशाची पुढें इतकी विपत्ति झाली.

या फेरफाराविषयीं इंग्लंड देशामध्यें लोकांचीं मतें वेगवेगळीं होतीं, व याविषयीं अनेक लहान लहान ग्रंथ व त्यांचीं उत्तरें प्रसिद्ध झालीं. सन १७९० मध्यें फेरफार झाला होता, त्या दिवसाचे स्मरणाकरितां लोकांनीं सभा केल्या, त्यांमध्यें राज्यरीतीविषयीं ज्यांचीं मतें विपरीत होतीं, तेही गेले होते. पुनः सन १७९१ त, १७८९ चे जुलै महिन्याचे १४ वे तारिखेस उत्साह झाला, तेव्हां सर्व सत्ताक राज्य करण्याचा ज्यांचा बेत दिसत होता, त्यांचा सूड उगविण्याचा लोकांनीं निश्चय केला. लंडन शहरामध्यें मंडळी बहुत मिळाली होती, परंतु माजिस्त्रेट यांचे बंदोबस्तामुळें तो दिवस निर्भयपणानें निभावला. बर्मिंगम शहरांत मंडळी थोडी मिळाली होती, परंतु तेथें दांडगाई फार झाली. दोन प्रहरांनंतर लोक उठले, त्यांनीं लोक मिळाले होते, त्यांस पळविलें, आणि पुढें ज्यांचा लोकांस कंटाळा आला होता, आणि जे तेथें नव्हते त्यांचा सूड उगवावयास ते प्रवृत्त झाले. दोन डिसेंटर सभांचीं घरें जाळून टाकिलीं. डाक्त-

र प्रीस्लूली म्हणून एक प्रख्यात विद्वान् होता त्याचें घर जाळलें, त्यांतून त्यास बाहेर निघावयास ही वेळ सांपडणें कठीण पडलें. त्याचे घराचें सामान, पुस्तकें, आणि बहुत यंत्रेंही सर्व अगदीं जळून गेलीं. दुसरे कित्येक गृहस्थ स्वतंत्रतेचे पक्षाचे होते, त्यांचीही घरें जाळलीं, व तो दंगा नाटिंगम शहरांतून पुढें कांहीं शिपाई येईपर्यंत बंद झाला नाहीं. त्या दंगा करणारांतून बहुतांस धरून चौकशी केली, व तिघांस फांशी दिलें.

पार्लमेंट सभा सन १७९२चे जान्युआरी महिन्याचे ३१ वे तारिखेपर्यंत मिळाली नाहीं. राजानें आपला मुलगा व प्रशिया देशाची राजकन्या फ्रेडेरिका या दोघांशीं लग्न झालें, असें कळविलें; सांगितलें कीं, आपण व आपले स्नेही राजे यांनीं मध्यस्थी करून जर्मनी देशाचा एंपरर, व तुर्कस्थान यांमध्यें तह झाला, आणि तुर्कस्थान व रशिया या दोहोंमध्यें तहाचीं पहिलीं कलमें ठरत आहेत. याविषयीं सभेमध्यें बहुत वाद झाले. परंतु शेवटीं त्यासंबंधी बोलणीं अनेक संमति पडून सिद्दीस गेलीं. पिट साहेबानें सभेपुढें सरकारी

खर्चाचे हिसाब आणून दाखविले, त्यांवरून मास्ती पेक्षां खर्च फार कमी असें कळूं आलें, तेव्हां पिट साहेबानें सांगितलेंकीं, सरकारी करांतून प्रतिवर्षी २००००० पौंड कर बंद करावे, आणि पार्लमेंट सभेनें प्रतिवर्षी दहा लक्ष पौंड कर्जाचे फडशा-कडे लावण्याचा हुकूम केला आहे, त्याखेरीज दुसरे ४०००००पौंड तिकडे लावावे. आतां रोकड ९०००००पौंड शिलक आहे त्यांतला हा पैका असें पिट साहेबानें सांगितलें. त्यानें दुसरें कळविलेंकीं, या संपत्तिकाळावरून पुढलें भविष्य करितां येत नाहीं खरें, तथापि युरोप देशाचे स्थितीवरून पा-हिलें असतां, फार दिवस स्वस्थपणा राहील अ-सा तर्क होतो.

विलबेर्फोर्स साहेबानें गुलामाचा व्यापार बंद होण्याविषयींचें आपलें बोलणें पुनः चालू केलें. डंडास साहेब सरकारचा सेक्रतारी म्हणूं लागला कीं, व्यापार बंद होणें याचे पूर्वी "सोई पाहून" हे शब्द असावे. त्यावर पिट साहेबानें ते नसावे म्हणून भाषण केलें. तथापि ६१ अधिक संमतानें तो फेर करावा असें ठरलें. तेव्हां डंडास साहेबा-

नें ठरविलेंकीं, " ब्रिटिश सरकारचे राज्यांत व्यापारासाठीं निग्रो लोक आणणें सन १८०० चे जान्यु आरी महिन्यांत बंद व्हावें." लार्डमार्निंगृतन यानें सन १७९६ चे जान्युआरि महिन्याची १ली तारिख केली; आणि अशीं कलमें ठरून लार्ड यांचे सभेस पाठविलीं. तथें तीं त्या बैठकींत तशींच राहिलीं, कारणकीं त्याविषयींची शायदी सर्व सभेंत ऐकावी, कामिटी इनें ऐकूं नये, असें तेथें ठरलें. याप्रसंगीं डयुक आफ क्लारेन्स, राजाचा तिसरा मुलगा, यानें तो व्यापार बंद होऊं नये या विषयीं भाषण केलें, त्यामुळें त्याची प्रसिद्धि झाली.

पूर्वींचे बैठकीमध्यें फाक्स साहेबाचे बोलण्यावरून लैबल यांचे गुन्ह्याविषयीं जुरी यांकडे अखत्यार किती आहे, हें ठरविण्याचा कायदा कामन्स सभेंत ठरला; परंतु लार्ड यांनीं तो रद्द केला होता. त्याविषयीं या बैठकींत फाक्स साहेबानें फिरून बोलणें चालवून तो ठरवून घेतला. त्यावर लार्ड यांचे सभेंत फार विपरीत संमतें पडलीं होतीं. त्या कायद्यावरून जुरी यांकडे

लैबल याचे निवाड्याविषयीं अखत्यार किती, याचा ठराव पुरा झाला.

फ्रेंच राज्यांत फेरफार झाल्यापासून कित्येक अयोग्य पुस्तकें प्रगट झालीं, ही गोष्ट प्रधानास फार वाईट वाटली, आणि मे महिन्यांत सरकारी जाहीरनामा लाविलाकीं, राज्यांतील स्वस्थतेस उपद्रव करण्याचे.हे यत्न बंद करण्याविषयीं सर्व माजिस्त्रेट यांनीं खबरदारी ठेवावी. हा जाहीरनामा पार्लमेंट यापुढें आणिला, तेव्हां दोनही सभांनीं राजास स्तुतिपत्रें पाठविलीं, आणि तसेंच राज्यांतील सर्व ठिकाणचे लोकांनीं ही केलें. मग त्या अयोग्य ग्रंथाचे छापणारे व करणारे यांची चौकशी चालू झाली. टामसपेन म्हणून एके पुरुषानें त्या जातीचीं दोन पुस्तकें केलीं होतीं, त्यावर किंग्स्बेंच्कोर्ट यांत गुन्हा लागू झाला. परंतु तो चौकशी होण्याचेपूर्वी राज्यांतून बाहेर गेला, आणि पुढें त्यास औट्ला असें जाहीर केलें.

त्या बैठकींत दुसरी गोष्ट एक हिंदुस्थानांतील लढाईची मात्र निघाली. त्या लढाईचें वर्तमान असे. सन१७८४ मध्यें कंपनी सरकारानें टिपू साहेब या-

शीं तह केला, तेव्हांपासून तो बळकट झाला, आणि त्यास फ्रेंच सरकारचा पक्ष होता, म्हणून त्यांचे सांगण्यावरून तो इंग्रेजी मुलुखांत उपद्रव करीत असे, असा तर्क होता. सन १७८९ चे उन्हाळ्यांत त्यानें कंपनी सरकारचा स्नेही त्रावणकोरचा राजा यास डुच लोकांनीं कांगूनोर म्हणून किल्ला विकला होता, त्यावर हल्ला केला. सन १७९० त मे महिन्याचे १ले तारिखेस राजानें टिपूचे फौजेवर हल्ला केला, व त्या आपले स्नेह्याचें रक्षण करावयास इंग्लिशही त्याबरोबर मिळाले. मग लौकरच करनाटकची मोठी फौज जनरल मेडोस साहेबाचे हाताखालीं एकीकडे जमली, आणि ती दक्षिणमुलुखांतून जाऊन म्हैसूर देशाची राजधानी श्रीरंगपट्टण यावर गेली. पश्चिमेचे बाजूनें मुंबईची फौज जनरल आबर्क्रोंबी साहेबाचे हाताखालीं कानानोर व समुद्रकांठावरचीं दुसरीं कांहीं ठिकाणें घेऊन म्हैसूर राज्यांत गेली. टिपूसुलतानानें मोठ्या शौर्यानें आपलें रक्षण केलें, म्हणून जनरल मेडोस साहेबास मद्रासेजवळ परत यावें लागलें. पुढें सन १७९० चे डिसेंबर महिन्यांत गवर्नर जनरल लार्ड कार्नूवालिस साहेबानें

आपण स्वतः सैन्याचा सरदारपणा घेऊन मद्रासेचे पश्चिमेकडील मुलुखांतून सरळ श्रीरंगपट्टणास एकाएकीं जावें असा निश्चय केला. मार्च महिन्याचे इ.स. १७९१ २१ वे तारिखेस मोठा किल्ला बांगलोर अकस्मात् हल्ला करून घेतला. त्यावेळेस इंग्लिश यांचा फार नाश झाला नाहीं. मे महिन्याचे १३ वे तारिखेस टिपूनें स्वतः राखलेले म्हैसूरचे राजधानीपासून दृष्टीचे टप्प्यावर येऊन फौज पोंचली. दुसरे दिवशीं लढाई झाली, तीमध्यें टिपूचा कांहींसा मोड झाला, परंतु कावेरी नदी (जीचे एके बेटांत श्रीरंगपट्टण आहे) तिला पूर आला, व सामानाचा तोटा पडला, यामुळें लार्ड कार्नवालिस साहेब यास परत बांगलोरास जावें लागलें, आणि जनरल आबर्क्रोंबी यानें लार्ड कार्नवालिस साहेबाशीं मिळण्याचा बेत केला होता, त्यालाही मोठ्या संकटानें व श्रमानें आपली फौज परत न्यावी लागली. परंतु पुढले लढाईत पुरा जय झाला. सन १७९२ चे फेब्रुवारी महिन्यांत पूर्वेकडची व पश्चिमेकडची फौज श्रीरंगपट्टणाच्या तटाखालीं एकत्र मिळाली. सातवे तारिखेस नाढण्यांत कललानाचे फौजेवर एक मोठा हल्ला केला.

त्यामुळें त्या शहरास अगदीं चहूंकडून वेढा पडला. त्यामुळें टिपूनें तह करण्यासाठीं लार्डकार्नवालिस साहेबाचे छावणींत एक वकील पाठविला, आणि तो या करारांवर कबूल केला. टिपूनें एकीकडे मिळालेले सरकारांस आपलें अर्धे राज्य द्यावें, लढाईचे खर्चाबद्दल तीन कोटि तीस लक्ष रुपये द्यावे, बंदिवान सोडावे, आणि तहांचीं कलमें पार पाडण्यासाठीं, आपले दोन मुलगे ओलीस द्यावे. या कलमांवर मार्च महिन्याचे एकुणिसावे तारिखेस टिपू सुलतान यानें सही करून तो तहनामा त्या ओलीस दिलेले राजपुत्रांचे हातून लार्डकार्नवालिस साहेबाचे हातीं दिला. ही लढाई फ्रेंच दरबारानें कावे करून उत्पन्न केली, असा तर्क होतो. त्या दरबारास असे बेत चालवावयास आतां सामर्थ्य राहिलें नव्हतें.

जून महिन्याचे १५ वे तारिखेस पार्लमेंट सभा उठली, त्यावेळेस राजानें कळविलें कीं, युरोप खंडांत लढाईचा प्रारंभ झाला म्हणून आपणास फार चिंता लागली आहे. एप्रिल महिन्यामध्यें फ्रेंच लोकांनीं जर्मनी देशाचा एंपरर याशीं लढाई क-

रण्याची प्रतिज्ञा केली होती, आणि एंपरर व प्र-
शिया देशाचा राजा या दोघांनीं मिळून फ्रेंच सभे-
चीं हत्यें चालूं द्यावयाचीं नाहीं असा निश्चय केला हो-
ता. त्या दोन सरकारांच्या फौजा एकीकडे जमून त्यां-
चा सरदार ड्युक ब्रन्स्विक लुनेनूबर्ग नेमिला.
तो ड्युक यानें प्रशिया व जर्मनी एथील सर-
कारांनीं आपल्या फौजा कोणत्या कारणासाठीं एक-
त्र केल्या हें लिहून कोब्लेंत्स शहराहून फ्रान्स देशा-
चे लोकांचे नांवानें एक प्रतिज्ञा प्रसिद्ध केली. ती अ-
शीकीं, याकामासाठीं आपणास मदत होण्याकरि-
तां, राज्यांतील शांत लोकांनीं (जे इतरांपेक्षां अधिक
आहेत असें त्याचे मनांत होतें त्यांनीं) आपले जुलु-
मगारांचे उद्योगास आपण कबूल नाहीं, असें उघड
बोलावें, दोन फौजांचा मुख्य सरदार मी सांगतोंकीं,
एकीकडे झालेले सरकारांचें लक्ष्य राज्य घेऊन आ
पण द्रव्यवान् होण्याचें नाहीं, परंतु फ्रान्स देशाचें
कल्याण व्हावें, राजा, त्याचे मनास चांगल्या वाट-
तील तशा सभा करण्याजोगा निर्भय व्हावा, आणि
त्यानें वचनदिल्याप्रमाणें व आपल्या सामर्थ्याप्र-
माणें आपले प्रजांचें कल्याण करावें, हीसासरकारांची

लक्ष्यें आहेत. एकीकडे जमलेले सैन्यास फ्रान्स देश त येण्यास स्वतंत्र फ्रेंच फौजेंनन जे अटकाव करितील, ते हातीं शस्त्रें असून धरिले गेल्यास, शत्रूप्रमाणें त्यांची अवस्था केली जाईल, व राजावर बंड करणारे आणि स्वस्थतेचे शत्रु म्हणून शासन केलें जाईल. चाकरीचे फ्रेंच फौजेसही मान्य होण्याचा हुकुम झाला, आणि न ऐकिल्यास आपले राजावर बंड केलें म्हणून शासन केलें जाईल, आणि सर्व शहरांतले, खेडयांतले, व प्रांतांतले लोक, जे एकत्र जमलेल्या फौजेस वाटेनें जातांनां उपद्रव करितील, त्यांचा जीव घेऊन जिनगी लुटली जाईल, असें भय दाखविलें. पारिस शहरचे अमलदार व लोक यांस हुकुम केला कीं, राजास तत्क्षणीं विलंब नकरितां मोकळीक द्यावी, आणि त्याच्या आज्ञा मानाव्या, न मानल्यास लढाईचे कायद्याप्रमाणें शिरच्छेद होईल; जर टिलरीस वाडयास कोणी जुलुम किंवा उपद्रव करील, जर कोणी राजास, राणीस, किंवा राजाचे कुटुंबांतून कोणाएकास थोडा उपद्रव करील आणि जर लागलींच त्या सर्वांस मोकळीक देऊन निर्भय रीतीनें ठेविलीं नाहींत, तर पारिस शहराचा लढा-

ई होऊन अगदीं नाश होईल. दुसरें जाहीर केलेंकीं, राजा कैदेंत असतां त्यानें जें केलें तें रद्द असे.

या जाहीरनाम्यापासून इच्छिल्याहून विपरीत फळ झालें. स्वतंत्र लोकांचे मनांत संशय आलाकीं, कारभारी लोकांनीं शत्रूंशीं मिलाफ केला आहे. असा त्यांच्या मनांत संशय येण्यास कांहीं मोठा आधार नव्हता, परंतु त्यापासून त्या गरीब राजाचा घात झाला. सन १७९२चे आगसट महिन्यांत पारिस शहरचा मेयर तेथील काहीं वकील बरोबर घेऊन नेशनल आसेंब्ली यासभेंत आला; आणि राजास पदच्युत करावें असें म्हणूं लागला. या बोलण्याचा विचार होण्याचे पूर्वीं भयंकर बंड झालें; राजाचे कुटुंबाची रहावयाची जागा ट्वीलरीस यावर हल्ला येऊन पडला; स्विस रखवाली लोकांचा मोड करून त्यांस ठार मारिलें, आणि राजा व राजाचें कुटुंब हीं नेशनल आसेंब्ली या सभेस शरण गेलीं. त्या सभेनें लागलेंच ठरविलेंकीं राजाजवळचा अधिकार बंद असावा, व सर्व लोकांची एक सभा व्हावी. राजा व त्याचें कुटुंब यांस पारिस शहरांत टेंपल या नांवाचे एके घरांत नेऊन क्रूरपणानें व हलकेपणानें कैद करून ठेविलें. मग प्रजांची मोठी सभा सप्टें-

बर महिन्याचे २१ वे तारिखेस एकीकडे जमली, आणि तेथें लागलाच विचार ठरलाकीं, राजसत्ताक राज्य मोडावें, आणि स्वतंत्र सर्वसत्ताक राज्य करावें. पुढले डिसेंबर महिन्यांत त्यांनीं हुकूम केलाकीं, आपणापुढें राजाची चौकशी व्हावी. त्या सभेनें आपण राजावर आरोप ठेवून, त्याची चौकशीही आपणाच करून, आणि शासनेही आपणाच ठरवून, त्याचा सन१७९३ चे जान्युआरी महिन्याचे २१ वे तारिखेस शिरच्छेद केला. हा राजा पदच्युत झाल्यापासून, राज्यकर्त्यांवर अप्रीति, हा आरोप ठेवून बहुत लोकांस कैद केलें होतें, व सप्तंबर महिन्याचे दुसरे तारिखेस बंदिखाना फोडून निर्दयपणानें कांहीं विचार नकरितां त्यांचा जीव घेतला. दुसऱ्या ज्या लोकांविषयीं शंका होती ते, बहुत हजार धर्मपक्षी, व मोठे लोक पळून गेले. त्यांतून बहुत इंग्लंड देशांत येऊन राहिले, आणि तेथें त्यांतून गरीबांचे उपजीविकेसाठीं सरकारांतून कांहीं नेमणुक झाली. अनेक वेळ जय पराजय होऊन, त्या एकत्र झालेले फौजेवर फ्रेंच सैन्यानें मान्स याजवळ हल्ला केला, आणि खचीत जय मिळविला, आणि त्या वर्षाचे समाप्तीचे पूर्वीं सर्व

आस्त्रियन नेदर्लंड मुलुख, लुक्सेंबर्ग व लिएज यांवांचून फ्रेंच लोकांचे ताबेग्वालीं आला. त्यांची फने फार लवकर होत चालली, सामानाचा तोटा पडला, पावसाळा फार दिवस राहिला, व प्रशियन लोक फार मरूं लागले, या कारणामुळें शेवटीं ते फ्रान्स देशाचे राज्यांतून निघून गेले, आणि त्यांचे मागून लवकर आस्त्रियन लोकांनीं ही तसेंच केलें.

हीं वर्तमानें ऐकुन इंग्लंड देशांत चिंता उत्पन्न झाली. नेशनल कन्वेन्शन या सभेमध्यें हुकुम झाले, ते इंग्लंड देशाचे स्वस्थतेस प्रतिकूळ, असें समजून प्रधानांनीं लवकर डिसेंबर महिन्याचे १३ वे तारिखेस पार्लमेंट सभेस बोलावणें केलें. याचे पूर्वीं राजानें एक जाहीरनामा लाविला होता कीं, मे महिन्याचे २१ वे तारिखेस एक जाहीरनामा लागला असतांही, आजून राज्यांतील कित्येक लबाड लोकांनीं बाहेर देशचे लोकांशीं मिळून कायदे व राज्यरीति मोडावयाविषयीं फार उद्योग चालविला आहे, आणि त्यामुळें बंद होऊन बंडें, व दंगे होऊं लागले आहेत, म्हणून राजानें राज्यांतील मिलिशिया यांचा कांहीं भाग जमवावा असा निश्चय केला आहे. या जाहीरनाम्यापासून फार भय उत्पन्न

झालें, फौज लंडन शहराचे नजीक आली, बांक या-
वरचे रखवाली लोक दुप्पट केले, आणि लंडन शह-
रचे किल्ल्याचे तट नीट केले. तशाच राज्यांत सर्व ठि-
काणीं सभा होऊन राज्य व राज्यरीति यांचे पक्षाचीं
स्तुतिपत्रें राजास येऊं लागलीं.

पार्लमेंट सभेचे प्रारंभीं राजानें भाषण के-
लें, त्यांत कळविलें कीं, फ्रान्स देशाचे राजाचे वहिवाटी-
ची तजवीज करणें जरूर आहे, कारण, तेथें चिन्हें अ-
शीं दिसतात कीं, दुसरे देशांत दंगा करावा, जीं सरकारें
त्याविषयीं उदासीन आहेत, त्यांचे ही हक्क मनास आ-
णूं नये, आणि आपले मित्र स्टेट्स जनरल यांजवळ
सांप्रतचे तह मोडून राज्यकायद्यांबाहेर वर्तणुक करा-
वी. राजानें सांगितलें कीं, अशा प्रसंगीं आपलें रक्ष-
ण होण्याचे उपाय कायद्यांप्रमाणें माझे स्वाधीन
आहेत ते करणें, व आरमार आणि फौज वाढविणें
मला जरूर आहे. हा बेत प्रथम कामन्स सभेंत कां-
हीं विघ्न होऊन, शेवटीं दोनही सभांस मान्य झाला;
आणि लढाईची मोठी निकराची तयारी करण्याचा प्रा-
रंभ झाला. सर्व परदेशी लोकांस राज्यांतून जबरीनें का-
ढून टाकण्याचा हुकुम पार्लमेंट सभेंत झाला, आणि

धान्य फ्रान्स देशास पाठवावयाचें बंद केलें, परंतु त्या देशाचे शत्रूंस पाठविण्याची मोकळीक ठेविली. शेवटीं फ्रेंच दरबाराचा वकील शावेलिन साहेब यास थोडा अवकाश देऊन निघून जाण्याचा हुकूम केला, आणि फ्रान्स व इंग्लंड या दोनही देशांत लढाईचे बेत होऊं लागले, त्यामुळें ऐक्य होण्याची निराशा झाल्यावर, कन्वेन्शन यानें प्रतिज्ञा केली कीं, फ्रेंच सरकार व ब्रिटिश दरबार आणि हालंड देशाचा स्टाट्‌ होल्डर याशीं लढाई होणार.

आतां ग्रेटब्रिटन जर्मनी व प्रशिया यांच्या फौजा मिळून लढाई चालू झाली. फौज बाहेर देशीं पाठविली, व राजाचा दुसरा मुलगा ड्युक यार्क यानें स्वतः सरदारपणा पतकारिला. त्या लढाईंत शेवटीं एकत्र जमलेले फौजेचा चढाव झाला. त्यांनीं जनरल मिरांडा याचे हाताखालचे फ्रेंच लोकांचा पराजय केला, आणि मेस्त्रिकूट एथील वेढा उठविला. जनरल वालेन्स याचे लोकांचाही मोड झाला, आणि पुढें वालेन्स व मिरांडा यांचे फाटाफूट झालेले फौजेचा सरदारपणा जनरल डुमुरियर यानें केला. त्यावरही लवकरच प्रिन्स कोब- इ॰स॰ १७

आणि जनरल क्लेयर्फे यांनीं हल्ला करून त्यांचा टिर्लैमों एथें पराभव केला, आणि फ्रेंच अमलदार आपले बेनास अटकाव करूं लागले असें पाहून त्यानें आपली फौज फितूर करण्याविषयीं यत्न केला. तो व्यर्थ गेल्यानंतर तो इंग्लंड देशास आला. त्यास तेथून जावें म्हणून लागलाच हुकूम झाला. कोंड आणि वालेन्‌शिएन हीं दोन शहरें जमझलेले फौजांचे स्वाधीन झालीं. त्यांतून शेवटचें दुयुक यार्क याचे स्वाधीन झालें. त्यानें पुढें डन्‌किर्क शहरावर हल्ला केला, परंतु तो सिद्धीस गेला नाहीं. तिनक्यामध्यें इंग्लंड व स्पानिश अरमार यांचा टूलों बंदरांत प्रवेश झाला. तेथें लार्ड हूड यानें जाहीरनामा लाविला कीं, माझें बंदरामध्यें येण्याचें कारण हें कीं, गलबतें अरमाराचें सामान, आणि तोफखाना हीं राजाचें राज्य होईपर्यंत आपण ठेवावीं. व मग त्याचे स्वाधीन करावीं. आतां टूलों यांत रखवालीसाठीं बेगवेगळे देशाचे १८००० लोक ठेविले होते. स्पेन, नेपल्स, सार्डिनिया हीं राज्येंही फ्रेंच यांशीं लढावयासाठीं एकीकडे मिळालीं, स्वीडन, डेन्मार्क, टस्कनी आणि जिनोआ हीं मात्र उदासीन राहिलीं. नवें-

बर महिन्यामध्यें सरगिल्बर्ट एलियट, जनरल ओहारा आणि लार्डहूड यांस टूलों बंदरीं फ्रेंच राजपक्षी लोकांशीं बोलण्याचें काम सांगितलें; परंतु फ्रेंच यांनीं डिसेंबर महिन्याचे प्रारंभीं टूलों शहर पुनः घेतलें, आणि एकीकडे जमलेली फौज तेथून त्याम-हिन्याचे १८ वे तारिखेस निघाली. त्यापूर्वीं तोफखाना, दारूखाना, नऊ मोठीं व कित्येक धाकटीं लढाऊ गलब-तें, आणि गोदीवरचीं जहाजें जाळलीं. वेस्ट इंडीस देशांत ब्रिटिश फौजेची एक टोळी हिस्पानिओला बेटाचे ज्या भागांत फ्रेंच यांचा अमल होता, तेथें जा-ऊन उतरली.

या लढाईचे वेळेस पारिस शहरांत फार नि-र्दय कृत्यें चाललीं होतीं. त्यावेळेस माक्सिमिलि-यन राबेस्पियर म्हणून कोणी हलका पुरुष मोठे-पणास चढला होता, त्याजवळ सर्वसत्ता होती, त्यानें राज्यकर्त्यांस खुशी नाहीं असे संशयावर बहुत माण-सांचे व बहुत कुटुंबांचे शिरच्छेद केले. त्यानें निराश्रित आणि निरपराधी राणीचाही अक्टोबर महिन्याचे सोळावे तारिखेस तिचे ३८ वर्षांचे वयांत शिरच्छेद के-ला. आणि तिचा प्राण घेण्याचे पूर्वीं तिची अन्याया

नें चौकशी करून तिचें दुःख वाढविलें.

इंग्लंड देशामध्यें कित्येक लोकांची गुन्हेगार ठरवांसाठीं चौकशी करून त्यांस बाटनीबे एथें पाठविलें.

पार्लमेंट सभा जान्युआरी महिन्याचे २१ वे तारिखेस मिळाली, तेव्हां राजानें कळविलें कीं, बालेन्‌शिएन, टूलों, आणि इंडीस एथील लढाया सिद्दीस गेल्या, आणि कळविलें कीं, आपलें अबरूस योग्य असा करार फ्रेंच लोकांकडून करून घेण्याकरितां लढाई निकरानें चालवावी हें आपणास योग्य होय. त्यावेळेस सभेंतील राजविरुद्ध लोकांतून कित्येक कमी झाले होते, तरी त्यांनीं या वर बहुत वाद केला. परंतु शेवटीं राजाकडच्या संमति अधिक पडून ठरलें कीं, आरमाराकडे पंचायशीं हजार लोक ठेवावे. तेवेळेस मिलिशिया, रखवाली वगैरे सर्व मिळून ब्रिटिश फौज १४०००० वर जमली. त्यावर्षीं राजाकडे एकंदर वसूल

इ.स. १७९५ १९९४०००० पौंड इतका झाला, आणि दुसरे एक कोटी दहा लक्ष पौंड उसनवार घ्यावयास आज्ञा दिली. यावर्षीं गुलामांचा व्यापार बंद होण्यासाठीं

यत्न केला, परंतु लार्ड सभेचे फार आग्रहामुळें तो सिद्धीस गेला नाहीं. फ्रेंच राज्यसभेनें कायदा केला कीं, जे व्यापारी पैकेदार किंवा दुसरे यांची जिनगी बाहेर देशांत असेल, त्यांनीं आपला बाहेरचा पैका व व्यापाराचा जिनस याच्या यादी द्याव्या. या कायद्यापासून पुढें जें होणार तें बंद करण्याकरितां ब्रिटिश सरकारानें कायदा ठरविला कीं, आपले प्रजांतून कोणी फ्रान्स देशांत सांप्रतचे अमलदारांचे राज्यांनर होणारे कोणाचें देणें असल्यास देऊं नये.

फ्रेंच यांनींही ब्रिटन बेटावर हल्ला करण्याचें भय घातलें होतें, तें सिद्धीस नजावयाकरितां फौज जमवावयासाठीं सरकारचा सेक्रतारी यानें प्रांतोप्रांतींचे लार्ड लेफ्टेनंट यांस पत्रें पाठविलीं, आणि आज्ञा केलीकीं, बाहेरून शत्रूंचा हल्ला आला, किंवा देशामध्यें आतलेआंत दंगा झाला, तर कोणते रीतीचा उपाय करावा, याविषयीं लोकांचें मन काय आहे, हें पहावें. यामुळें राज्यांतील सर्व मोठे शहरांत सभा झाल्या, आणि पैक्याच्या टिपा केल्या. पुढें राजास फ्रेंच लोक चाकरीस

ठेवावयाची आज्ञा असावी म्हणून एक कायदा ठरला. तशीच प्रशिया देशाचे राजास मदत होण्याकरितां मोठी एक पैक्याची रकम द्यावी, असें ठरलें.

मे महिन्याचे १२ वे तारिखेस राजाचा सेक्रतारी यानें राजाचा निरोप पार्लमेंट सभेस कळविलाकीं, लंडन शहरांतील कित्येक मंडळ्यांनीं देशांतील दुसरे ठिकाणच्या मंडळ्यांशीं कागद पत्रें ठेवून वाईट वर्तणुक चालविली आहे, आणि ते, पार्लमेंट सभेचे सत्तेचा तिरस्कार करून तिचे विरुद्ध दुसरी एक राज्यसभा करावयाचा बेत उघड करीत आहेत, अशी बातमी ऐकून त्या मंडळ्यांचीं लंडन शहरांतील दसरें व कागद जप्त करण्याचा हुकुम केला, व हुकुमाप्रमाणें ते जप्त करून कामन्स सभेजवळ विचार करण्याकरितां पाठविले आहेत. त्यावेळीं लंडन शहरांतील कारिस्पांडिंग सोसेइटी (कागदपत्रांची मंडळी) इचा सेक्रतारी हार्डी, कन्सृटिटूशनल सोसेइटी (राज्यरीतिमंडळी) इचा सेक्रतारी आडम्स, आणि हार्नृटूक साहेब, जानथेलवाल, व जेर्मैया जायस,

यांस धरून सरकार गुन्हेगारीचा आरोप ठेवून किल्ल्यांत बंदीस ठेविलें. तसाच कायदा केला कीं, राजाचे शरीरावर किंवा राज्यावर जे बंड करितील, त्यांस धरून कैद करावयास राजास अख्त्यार आहे. हा हुकुम सन १७९५ चे फेब्रुआरी महिन्यापर्यंत काईम रहावा असें केलें. ती बैठक जुलै महिन्याचे ११ वे तारिखेस उठली.

यावर्षीं एकत्र मिळालेले फौजेचे विजयाची अगदीं उलट झाली. एकत्र जमलेले सरकारांनीं पूर्वीं जीं मकाणें मिळविलीं होतीं, तीं त्यांचीं गेलीं, आणि लावेंडी प्रांतांत एक भयंकर बंड झालें होतें, त्यावर सर्व युरोप देशाचे डोळे लागले होते, तेंही मोडलें गेलें. यापासून फ्रान्स देशाचा फारच स्वार्थ झाला; परंतु या गोष्टीपासून झालेलें दुःख, दुसरे ठिकाणीं ब्रिटिश फौज जय पावली, त्यामुळें कमी झालें. वेस्ट इंडीस देशांत पार्टिनिको, सेंटलुसी, व गुआडालुप, हीं घेतलीं, आणि कार्सिका बेटांत ब्रिटिश यांचा जय होऊन तेथील लोक ब्रिटिश सरकारचे ताबेखालीं रहाण्यास, व तें सरकार जी राज्यरीति स्थापील ती मान्य करावयास कबूल झाले. परंतु लार्ड हो यानें

जून महिन्याचे दुसरे तारिखेस फ्रेंच अरमारावर जय मिळविला, त्यांत फार प्रतिष्ठा झाली. त्यावेळेस फ्रेंच यांचीं मोठीं गलबतें सवीस आणि इंग्लिश यांचीं पंचवीस होतीं. फ्रेंच गलबतांतून सात घेतलीं, आणि बाकीच्यांतून बहुतांची फार खराबी झाली. या जयप्रसंगीं लोकांनीं मोठे उत्साह केले. हिंदुस्थानांत फ्रेंच यांचीं पांडिशरी, चांदिनगर, व माही, हीं गेलीं.

ही लढाई होत असतां फ्रेंच यांचा स्पेन देशाचे पश्चिमेकडील शेवटापर्यंत फार विजय झाला. आणि त्यांचे दुसरे फोजेनें सर्व आस्त्रियन नेदर्लंड, लांड्रसी, कुएस्नाय, कोंड, आणि वालेन्शिएन, हीं परत घेतलीं. तशींच त्यांनीं आस्तेंद, ब्रसेल्स, घेंट आणि आंटवर्प हीं घेतलीं, आणि डिसेंबर महिन्यांत मोठ्या नद्या थिजल्या म्हणून त्यांच्या फोजेनें, रैन व वाआल या नद्या उतरून कित्येक लढाया करून सर्व हालंड देश घेतला.

यावर्षीं सरकार गुन्हेगाऱ्यांसाठीं कित्येक लोकांच्या चोकशा झाल्या. त्यांतून तिघांस चोकशी करून गुन्हा नाहीं म्हणून सोडिलें, बाकीच्यांस चोकशी केल्यावांचून सोडिलें.

डिसेंबर महिन्याचे २० वे तारिखेस पार्लमेंट सभा दोनही मिळाल्या, त्यावेळेस राजानें सांगितलें-कीं, पूर्वीचे लढाईत जरी निराशा आणि पराजय हीं झालीं आहेत, तरी लढाई आरंभिली, ती आग्रहानें चालवावी हें मला खचीत चांगलें वाटतें. त्यानें दुसरें सांगितलें कीं, सांप्रतचीं संकटें पाहून स्टेट्स जनराल यानें फ्रान्स देशांत आतां लोकांमध्यें जो पक्ष बळकट आहे, त्याशीं तहाचें बोलणें लाविलें आहे, आपण कार्सिका बेटांतलें राज्य आणि प्रभुत्व कबूल केलें; अमेरिका देशाशीं मैत्री, व्यापार, आणि गलबतें चालविणें, यांसंबंधि तह केला, आणि आपला मुलगा प्रिन्स आफ वेल्स याचें व प्रिन्स आफ ब्रन्स्विक याची मुलगी क्यारोलिन इशीं लग्नाचा करार झाला आहे.

लढाई चालविण्यासाठीं जर्मनी देशाचा एंपरर यानें दोन लक्ष लोक पाठवावे, म्हणून त्याचे मदतीसाठीं साठ लक्ष पौंड उत्पन्न करण्याचा विचार ठरविला. ब्रिटिश आरमारासाठीं एक लक्ष माणसें ठेवावीं असा निश्चय ठरविला. यावर्षी एकंदर नेमणुक दोन कोटि एक्यायशीं लक्ष अठ्ठावीस हजार झाली. याखेरीज एक लक्ष ऐशीं हजार पौंड उसने घे- इ.स. १७

ण्याची परमाणगी दिली, आणि दारू, चाहा, वगैरे ज़िनसांवर कर बसविले.

बुधवारीं एप्रिल महिन्याचे ८ वे तारिखेस राजाचा मुलगा प्रिन्स आफ वेल्स याचें प्रिन्सेस आफ ब्रन्स्विक याची चुलत बहीण इशीं लग्न झालें; आणि सत्तावीसावे तारिखेस दोनही पार्लमेंट सभांस राजपुत्राचे कर्जाबाबद निरोप पाठविला, आणि सांगितलें कीं, त्याची नेमणुक वाढवावी. त्या निरोपाचें तात्पर्य हें होतें कीं, राजपुत्राचें कर्ज थोडें थोडें कार्न्वाल प्रांताचे उत्पन्नांतून, आणि त्याचे घरखर्चाबाबद जी अधिक नेमणुक होईल तिचे बाकींतून फेडावें. या बाबद हुकुमाचा विचार होऊं लागला तेव्हां, फार वाद झाला. पिट साहेबानें सांगितलें कीं, राजपुत्राचें कर्ज साहा लक्ष आणि सात लक्ष पौंड यांचे मध्यें आहे, आणि राजाचे नेमणुकींतून फार खर्च करणें प्राप्त झालें आहे, म्हणून त्यांतून त्याचा कांहीं फडशा होणार नाहीं. त्यानें सांगितलें कीं, राजपुत्रास कार्नूवाल प्रांताचे उत्पन्नांवांचून १२५००० पौंड नेमणुक करावी. यावर फार विरुद्द बोलणें होऊन शेवटीं त्याप्रमाणें ठरलें. मग त्याचे नेमणुकीचे एक

भागाच्या खर्चखेचाची चौकशी करण्याकरितां कित्येक कमिशनर नेमिले. जून महिन्याचे २७वे तारिखेस पार्लमेंट सभेस पुढें सभा होईतोंपर्यंत निरोप दिला.

पूर्वी सांगितलेंकीं हिंवाळा फार यामुळें ह्यालंड देशांतले नद्यांचें पाणी थिजलें, म्हणून जनरल्ल पिग्रु याचे आज्ञेखालीं जी फ्रेंच फौज होती, तिला त्या देशांत जावयास सोपें पडलें. फ्रीझलंड एथील संस्थानांनीं इंग्लंड देशाशीं एक मत होतें तें सोडून फ्रेंच सरकाराशीं तह केला. जान्युआरी महिन्याचे दाहावे तारिखेस ७०००० फ्रेंच फौज वाआल नदी उतरून पलीकडे गेली, आणि तिनें, ड्युक आफ यार्क गेल्यानंतर फौजेच्या सरदारपणावर जनरल वाल्मोडन म्हणून होता त्यावर हल्ला केला. त्याचा सर्वत्र पराजय झाला. त्यास अटकाव होईना असें झालें, म्हणून युत्रेख्ट, राटर्डम, या शहरांनीं फ्रेंच लोकांस आपले दरवाजे उघडले. पुढें फ्रेंच यांनीं लवकरच सर्व हालंड देश घेतला. फ्रेंच, वाआल नदी उतरून आलीकडे आले, अशी बातमी समजतांच स्टाट् होल्डर यानें पळून जि-

तकी संपत्ति सांपडली, तितकीचा बचाव केला. तो दैववशात् एक लहान गलबतावरून जाऊन वांच-ला. तें गलबत एकुणिसावे तारिखेस हांकारलें, आ-णि कांहीं अडचण सोसुन शेवटीं तो आपले कुटंबा-सह्वां इंग्लंड देशांत आला, तेथें हांपूतन कोर्ट या नांवाचा वाडा त्यास रहावयास राजानें उदारपणानें दिला. नंतर फ्रेंच राज्याप्रमाणें डच लोक आपलें रा-ज्य करण्याची तजवीज करूं लागले, आणि त्यांनीं त्या लो-कांशीं शत्रूंपासून आपलें रक्षण करण्याचा, व शत्रूंचे नाशाविषयीं मदत करण्याचा तह केला; परंतु फ्रेंच यांनीं तेव्हांपासून त्यांस स्वतंत्र लोक असें नसमज-तां आपले ताबेदार असें वागविलें. वाल्मोडन या-चे पराजयांत जी ब्रिटिश फौज वांचली होती, ती अ-तिशय संकटें व अडचणी भोगून इंग्लंड देशास परत आली.

तथापि या लढाईच्या शेवटीं आस्त्रियन यां-नीं फ्रेंच लोकांस रैन नदी उतरून माघारें जावया-स लाविलें; आणि मेन्स शहर बळकट वाटत होतें, तें ही जबरदस्तीनें घेतलें. त्याप्रसंगीं एकशें सहा तो-फा, दोनशें सामानांचीं गाडीं आणि दोन हजार बंदि-

वान इतकीं आस्ट्रियन लोकांचे हातीं सांपडलीं. मग लवकरच मान्हीम शहर त्यांचे स्वाधीन झालें; आणि डिसेंबर महिन्याचे अखेरिस असा ठराव झाला-कीं, तीन महिन्यापर्यंत उभय पक्षीं तह असावा. तितक्यांत दोघांकडून मोठे एके लढाईची तयारी झाली. इकडे फ्रेंच यांनीं स्पानिश राज्यांत शिरून त्यांस मोठे तहांतून फोडिलें. स्पानिश दरबारानें भिऊन आगसृट महिन्यांत फ्रेंच यांशीं तह केला. ब्रिटिश सरकारानें फ्रान्स देशांतून पळून आलेले लोकांतून सुमारें सात हजार पगार देऊन ठेविले होते, त्यांस तेथील बंडवाल्यांस मदत करावयास पाठविलें; परंतु जुलै महिन्याचे २१ तारिखेस प्रजापक्षाचे लोकांनीं त्यांवर अकस्मात् हल्ला केल्यामुळें ते सर्व मेले गेलें. कित्येक सांपडून बंदींत पडले. त्यांतून नऊशें मात्र बाकी राहिले, ते व त्यांस मिळालेले राजपक्षाचे लोक सुमारें १५०० इतके मिळून अरमारावरून जाऊन वांचले. तेथें गेलेले लोकांतून जे सांपडले होते, त्यांस चौकशी करून ठार मारिलें.

समुद्रामध्यें आजूनही ब्रिटिश अरमाराचा

इतरांपेक्षां श्रेष्ठपणा तसाच होता. जून महिन्याचे २३ वे तारिखेस लार्ड ब्रिड्पोर्ट यानें आपले हातारवालचें अरमार घेऊन पोर्ट लोऱ्यां एथें फ्रेंच यांचें अरमार होतें; त्यावर हल्ला केला. त्या दिवशीं सकाळीं पुढलीं गलबतें शत्रूंजवळ जाऊन लढाई सुरू झाली, ती नऊ वाजेपर्यंत चालली. तींत ब्रिटिश यांचा जय झाला. केप गुडहोप व सिंहल बेटांतील त्रिंकोमाली शहरही हीं ब्रिटिश सरकारास मिळालीं. मेडितरेनियन समुद्रांतही आड्मरल होथम याचे हातारवालचे अरमाराची व फ्रेंच अरमाराची लढाई होऊन, फ्रेंच यांचीं मोठीं गलबतें दोन घेतलीं, परंतु त्यावेळेस इंग्लिश यांचेंही एक मोठें गलबत धरिलें गेलें. फ्रेंच यांनीं यावर्षांत दुसरीं ही कित्येक सरकारी व सावकारी गलबतें घेतलीं. त्यांनीं सर्वसत्ताक राज्याचे पक्षास ही बहुत लोक अनुकूळ करून घेतले. त्यांनीं स्पेन देशाचे दरबाराशीं तह केला होता, त्याखेरीज डुच, टस्कनी हेसी कासेल, हानोवर आणि बर्लिन एथील दरबारांशीं स्नेहभावानें तह केले. यावर्षी त्यांनीं राज्यरीति ही बदलली, ती अशीकीं, एकींत दोनशें पन्नास सभा-

सद, व दुसरींत पांचशें अशा दोन संभांतीं राज्याचा स-र्व विचार ठरवावा, आणि नेमलेले पांच आसामीनीं त्या विचारांप्रमाणें वहिवाट चालवावी, व त्या पांचांतून प्रतिवर्षी एक एकानें आपली जागा सोडावी, असें केलें.

एप्रिल महिन्याचे २३ वे तारिखेस वारन हेस्तिंग्झ साहेबाचे अन्यायाविषयींचा निश्चय वेस्तमिनस्तर हाल यांत ठरला. तेथें त्यावेळेस कामन्स सभेंतील सुमारें चारशें असामी होते, परंतु लार्ड यांतून एकुणतीस मात्र आले होते. तितक्यांच्याच मनांत संमति द्यावयाची होती. अपराधाचे पहिले कलमावर अर्ल राड्नर, सफक, फित्स् विलियम, आणि काअर्नार्वन, तसेच ड्युक नार्फक व लार्ड चान्सेलर यांनीं त्यावर गुन्हा लागू झाला असें म्हठलें, परंतु दुसरे तेवीस लार्ड यांनीं त्यास निरपराधी म्हटलें. दुसरे तेवीस कलमांवर त्यांचीं संमतें बहुतकरून अशींच पडलीं. सोळा कलमांचा कोर्ट यानें असा विचार केल्यावर, हेस्तिंग्झ साहेबास आंत बोलावून लार्डचान्सेलर यानें सांगितलेंकीं, कामन्स यांनीं तुम्हांवर जे

आरोप ठेविले होते, ते तुल्यावरचे दूर झाले, आणि तुम्ही आपला खर्च वेच दिला म्हणजे तुम्हास मोकळीक मिळेल. ही स्मरण रहावया जोगी चौकशी सन १७८८ चे फेब्रुआरी महिन्याचे १२ वे तारिखेस चालू झाली होती, परंतु मध्यें काम बंद झाल्यामुळें इतका काळ गेला कीं, तितक्या वर्षांमध्यें १४९ दिवस मात्र काम चाललें.

फिरून अकुटोबर महिन्याचे २९ वे तारिखेस पार्लमेंट सभा एकत्र झाली. तेव्हां राजानें होनही सभांस सांगितलें कीं, या वर्षांत राज्याची स्थिति फार चांगले रूपास आली हें पाहून मला मोठा संतोष झाला, व फार दिवसांपासून फ्रान्स देशांत बंड व प्रजांची सत्ता हीं चाललीं आहेत, त्यांपासून ज्या गोष्टी पुढें घडणार त्या उघड दिसत नाहींत; परंतु जर त्यांपासून सर्व राज्याची स्वस्थता होई असा तह होण्याची संधि आली, तर त्याविषयीं मी फार यत्न करीन. दुसरें त्यानें सांगितलें कीं युद्ध मोठ्या हुशारीनें चालविल्यास तह सहज घडून येईल, असें समजून वेस्ट इंडीस एथें अरमोराची खबरदारी ठेऊन उमेदीनें लढाई चालवि-

ण्याविषयीं माझे प्रयत्न चालले आहेत. राजानें त्या दोन सभांस आणखी सांगितलें कीं, जर्मनी आणि रशिया एथील दरबारांशीं संरक्षणाचा व अमेरिकन सरकाराशीं व्यापाराचा तह केला आहे.

या पार्लमेंट सभेचे बैठकीचे प्रारंभीं राजा लार्ड सभेस जात असतां वाटेनें वाड्या पुढील अरुंद जागेंत त्यावर कोणीं गोळीसारिखें कांहीं मारिलें, व दुसरी दांडगाई केली. याविषयीं शायदीदार लार्ड व कामन्स या दोघांचे सभेंत नेऊन चौकशी झाली. पुढें त्या दांडगाईत जे लोक होते, त्यांस धरित्यास एक हजार पौंड इनाम मिळेल असा जाहीरनामा लाविला; परंतु त्या पासून कांहीं उपयोग झाला नाहीं. एक किड्वेक म्हणून होता, त्यास राजाची हुर्यो केली, म्हणून धरून ग्लास्तर बंदिखान्यांत पांच वर्षें कैदेंत ठेविलें.

पुढें नवेंबर महिन्याचे ४थ्ये तारिखेस दुसरा जाहीरनामा लाविला, व लार्ड सभेपुढें जाहीर केला. तो असा कीं, राजाचे शरीरावर दांडगाई झाली त्याचे पूर्वदिवशीं लंडन शहराजवळ कोपेन्हेगेन् हौस या वाड्यांत एक सभा झाली,

तींतकित्येक लोकांनीं दांडगाईचीं, हलकीं, आणि लबाडीचीं भाषणें केलीं, त्यामुळें ती दांडगाई झाली, व अशाच सभा आलीकडे बहुत होत चालल्या आहेत. तर सर्व माजिस्त्रेट यांस हुकूमकीं, अशी सभा होण्याची बातमी त्यांस कळली, म्हणजे त्यांनीं ती सभा होण्याचे ठिकाणीं स्वतः जाऊन ती सभा न होईल याविषयीं कायद्यांप्रमाणें यत्न करावा, व लोकांस घालवून द्यावें.

तशा संकट समयीं या हुकुमापासून चांगला बंदोबस्त होणार नाहीं, असें समजून पार्लमेंट सभेंत दोन कायदे ठरविण्याचा विचार निघाला. त्यांत एक राजाचे शरीराचें चांगलें संरक्षण होण्यासाठीं; व दुसरा, अशा दुष्ट सभा न व्हाव्या याविषयीं चांगला बंदोबस्त राहाण्यासाठीं. या दोन कायद्यांतून शेवटच्याविषयीं सभेचे बाहेरचे लोकांनीं फार अडथळा केला. राज्यांत सर्व ठिकाणीं लोकांच्या सभा होऊन पार्लमेंट सभेस अर्ज्या येऊं लागल्या. त्यांत त्या दोन कायद्यांस अनुकूळ अर्ज्या पांसष्ट आल्या, व त्या देतेवेळेस त्यांवर सह्या एकुणतीस हजार नऊशें बावीस होत्या; परंतु त्या—

कायद्यांस विरुद्ध अर्ज्या चवऱ्याण्णव आल्या, व त्यां-
वर सह्या एक लाख एकतीस हजार दोनशें चव
ऱ्यायशीं होत्या. तथापि ते दोनही कायदे पार्लमें
ट सभेंत बहुत अधिक संमति पडून मुकरर झाले.

लढाई खात्याकडील सेक्रतारी यानें कळवि-
लेंकीं, वर्षांत लढाईकडे २०७००० फौज आहे. ए-
क्स्चेकर याचा चान्सेलर यानें सांगितलेंकीं, या व-
र्षांत राजास २७६६२०७२ पौंड इतके पैक्याचा पुरा-
वा झाला. या खेरीज एक कोटि ऐशीं लक्ष उसन वार
घेण्याचा करार ठरविला. वारिसदार यांचे हिंशाची
जिनगी, शोभेचे व मजूरदार घोडे, व छापलेलें काप-
साचें कापड, यांवर नवे कर बसविले, व सरकार व-
सूलाचे दुसरे खात्यांत फेरफार केले. हें सर्व मिळू-
न जमा ११२३००० पौंड होईल असा आकार केला
होता.

डिसेंबर महिन्याचे ८ वे तारिखेस राजानें पा-
र्लमेंट सभेस एक निरोप पाठविला. तो असाकीं, आ-
पण व आपले स्नेही राजे यांचें हित साधून तह हो-
तो, असें संधान आल्यास, शत्रूंचे तहाचें बोलणें
लागलेंच आपणास ऐकावें लागेल, अशी फ्रान्स दे-

शाची सांप्रत स्थिति झाली आहे. याराजाचे निरोपावर पार्लमेंट सभेनें त्यावेळेस कांहीं विचाराचा आरंभ केला नाहीं.

इ.स. १७९६ फेब्रुआरी महिन्यांत विरुद्ध पक्षांतून कोणी कांहीं बोलल्यावरून प्रधानानें सभेस सांगितलें कीं, आपण व आपले मदतनीस शांतीं मह होण्याविषयीं फार प्रयत्न केला आहे. फ्रेंच हे जें बोलतील तें ऐकावयास सिद्धता आहे, आणि मर्जी असल्यास तहाचा प्रारंभ करण्यास मी तयार आहें.

एप्रिल महिन्याचे ८ वे तारिखेस पिट साहेबानें वसूल व खर्च यांची दुसरी याद दिलीकीं, मी मागली याद दिली तेव्हां छापलेले कापसाचे कापडावर कर बसवून १३५००० पौंड वसूल उत्पन्न करावा असा माझा बेत होता, परंतु आतां मला वाटतेंकीं तो रद्द करून कुत्रे, टोप्या, यांवर नवे कर बसवावे, व दारूवरचा कर वाढवावा. या सर्वांचा आकार त्यानें ७४००.०० पौंड केला होता. जुलै महिन्याचे पांचवे तारिखेस पार्लमेंट सभेची बैठक उठली; व त्यावेळेस राजानें सांगितलेंकीं राज्यांतील बंड व दांडगाई बंद होण्याकरितां तुम्ही बंदोब-

म केला त्यापासून फार मोठें काम झालें. व तुम्ही प्रथमपासून तह होण्याची आस्था दाखविलीत, व सर्व कृत्यें सारिखीं चतुरपणानें, स्वस्थचित्तानें. व स्थिरतेनें केलींत यापासून मला सर्वकाळ संतोष होईल. दुसरे दिवशीं पार्लमेंट सभेस निरोप देऊन दुसरीस बोलावण्याकरितां जाहीरनामा लाविला.

या सभेचे बैठकींत तहाविषयीं फ्रेंच यांचे मनांत काय आहे, हें पहाण्याकरितां यत्न केला. तो असा. मार्च महिन्याचे ८ वे तारिखेस ब्रिटिश दरबारांतून विखम साहेबाचे हातून बार्थलमी साहेब फ्रेंच दरबारचा स्विस लोकांकडील वकील यास ब्रिटिश सरकारानें एक चिटी पाठविली कीं, यापुढील तीन प्रश्नांचीं उत्तरें लिहून पाठवावीं. ते तीन प्रश्न हे. पहिला, पुढें जी जागा नेमिली जाईल तेथे वकील पाठवूं व सर्वांच्या तहाचें बोलणें चालू करावयाची फ्रान्स देशांत इच्छा आहे कीं नाहीं? दुसरा, फ्रान्स देशाचे मर्जीप्रमाणें तहाचीं मूळ कलमें कोणतीं, हें सांगावयाचें मनांत आहे कीं नाहीं? कीं जीं कळलीं असतां ब्रिटिश राजा व त्याचे साथी मिळून तीं तहाचीं मूळ कलमें उपयोगी पडतील किंवा नाहीं हा

विचार करितील. तिसरा, तह होण्याची दुसरी कांहीं तरी मसलत करण्याची इच्छा आहेकीं नाहीं? याचें उत्तर बार्थलमी साहेबानें कळविलेंकीं, मी आपली चिठी फ्रेंच सरकारचे डिरेक्टर यांस पाठविली, व त्यांनीं मला कळविलेंकीं, फ्रेंच राज्याचा वास्तवीक प्रतिष्ठेचा व मजबूद तह व्हावा अशी आमची इच्छा आहे, परंतु तुम्ही आपणास तह करण्याचा कांहीं हुकूम किंवा अखत्यार नाहीं म्हणतां, यावरून तुमचे दरबारचे मनांत कांहीं कपट आहे असा संशय येतो. दुसरें डिरेक्टर यांचें म्हणणेंकीं कायद्यांप्रमाणें चालणें हा आमचा धर्म होय, म्हणून या काळाचे कायद्यांप्रमाणें फ्रेंच मुलुख जितका आहे, त्यांतून कांहीं सोडून देण्याची मसलत आम्ही करणार नाहीं, किंवा कधीं ऐकणारही नाहीं. या बोलण्यावरून ती तहाची मसलत संपली, आणि ब्रिटिश वकीलानें एप्रिल महिन्याचे १० वे तारिखेस जाहीरनामा छापिलाकीं, फ्रान्स एथील कायद्यांत जितकें राज्य आहे, तितकें सगळें फ्रान्स मुलुखाचे ताबेंत ठेवण्याचा बेत डिरेक्टर यांनीं जाहीर केला, व त्यास विरुद्ध कोणतें बोलणें ते बोलणार नाहीं-

त, किंवा कधींही ऐकणार नाहींत. तर आतां लढाई चालविणें हेंच ब्रिटिश राज्यास योग्य आणि अवश्य आहे.

युरोप खंडांत लढाई चालू झाल्यापासून इंग्लंड देशाची फौज शत्रूंचीं बाहेरदेशचीं संस्थानें घेणें, व त्यांचे अरमारांचा नाश करणें या कामास लागली होती. म्हणून मद्रास एथें एक अरमार तयार करून मोलका बेटांतील डच यांचे संस्थानांवर पाठविलें. आणि तें आंबोयूना बेटांत पोंचतांच तेथील गवर्नर व कौन्सिल यांनीं तें स्वाधीन केलें. बांडा म्हणून दुसरें एक बेटही लवकर तसेंच त्यांचे हस्तगत झालें, व त्या दोन ठिकाणीं बहुत पैका व बहुत खजीना सांपडला. ब्रिटिश फौजेनें दक्षिण अमेरिका देशांतील डच यांचीं संस्थानें डमरेरा व एसेक्विबो हीं घेतलीं. आगस्ट महिन्यांत डच यांचीं तीन मोठीं, व पांच लहान गलबतें व एक सामानाचें गलबत इतकीं केपआफगुडहोप यावर हल्ला करावयासाठीं साल्डाना एथील समुद्रांत शिरलीं. तेव्हां सरजार्जकीथ एल्फिन्स्तन यांचें मोठें अरमार तेथें आलें, त्याची व त्या डच्च गलबतांची गांठ पडली, तेव्हां तीं सगळीं धरून घेतलीं.

तेव्हां डच यांचा सरदार लुकास म्हणूं लागला कीं, ख-लाशी लोक नाराजी म्हणून हा अनर्थ घडला. दुसरे धाकट्या लढायांमध्यें लहान मोठीं गलबतें फ्रेंच, स्पानियर्ड, व डच यांपासून इंग्लिश यांनीं घेत-लीं.

इकडे इटली देशाचे बाजूनें फ्रेंच यांनीं ल ढाई मोठे प्रतिष्ठेनें चालविली. तेथें त्यांचे फौजेचा सरदार बोनापार्ट या नांवाचा कोणी एक कार्सि-का बेटांत जन्मलेला असा होता. फ्रेंच व आ-स्त्रियन आणि फ्रेंच व इटली देशाचीं संस्थानें यां-च्या लढायांमध्यें खळ पडल्यावांचून सन १७९७चे एप्रिल पर्यंत चालल्या होत्या. त्यांचा विस्तार हा ग्रं-थ लहान म्हणून लिहीत नाहीं. सारांश, फ्रेंच वि येन्ना शहराच्या दरवाज्यापर्यंत येऊन पोंचले ते-व्हां ती लढाई संपली. जर्मनी एथील लहान राजां-चीं फ्रेंच यांशीं तहाचीं बोलणीं चालविलीं, व फ्रें-च यांनीं इटली देशांतील बहुत करून सर्व संस्थानें जिंकून मनास येतील तसे तह करून घेतले. पुढें कोणते तरी रीतीनें सर्व इटली देशांतील जुने संस्थानांत फेरफार केले. पोप याचें संस्थान मोडून

त्यांचीं फार स्वतंत्र राज्यें केलीं. या विजयामुळें शत्रूं-स मेदितरेनियन समुद्रांत अंमल मिळाला, म्हणून कार्सिका बेटांतील इंग्लिश गवर्नर यानें आपली फौज तेथून काढली. त्यामुळें तेथें राजनीति स्थापिली होती, ती मोडली.

स्पानिश गुलाम यांची संमति मारून नांवाचे लोक जमेका बेटांत होते, ते इंग्लिश यांनीं तें बेट घेतलें तेव्हां त्यांचे ताबेखालीं नराहून स्वतंत्रपणानें वागत होते, त्यांशीं व इंग्लिश यांशीं सन १७९५ चे अखेरीपासून लढाई चालली होती, ती सन १७९६ चे मार्च महिन्यांत ते लोक अगदीं जिंकिले जाऊन संपली. त्यांनीं मोठ्या शौर्यानें वीस लढाया केल्या, व त्यांस फ्रेंच यांनीं डोमिनिका, ग्रिनाडा, व सेंटविन्सेंट या तीन ठिकाणींही बंडें उत्पन्न केलीं, परंतु तीं लागलींच नाहीं अशीं केलीं. दुसराही मोठा अयर्लंड बेटावर येण्याचा फ्रेंच यांनीं उद्योग केला, व तेथें लोक सरकाराशीं नाराजी असें दिसून आलें होतें, म्हणून ते आपणास मदत करितील, अशी फ्रेंच यांस आशा होती. डिसेंबर महिन्यांचे २६ वे तारिखेस सात मोठीं फ्रेंच गल-

बतें वांत्रिबे या ठिकाणीं दृष्टीस पडली, परंतु वाद‑ळा मुळें त्या गलबतांस जमिनीजवळ येतां आलें नाहीं. दैववशात् एक लेफ्टेनंट व दुसरे कित्येक लोक एके होडींतून तडीस लागले, त्यांस धरून कैद केलें. त्यांनीं सांगितलें कीं अयर्लंड बेटावर हल्ला करण्याकरितां कांहीं दिवसांपासून अरमाराची तयारी चालली आहे. त्या अरमारांत मोठीं गलबतें सत्रा, व तिसांपेक्षां अधिक लहान आणि भाड्याचीं गलबतें, यांच्या तीन टोळ्या आडमरल डिगाल याचे हाताखालीं आहेत, व त्या गलबतांवर तीसांपासून पंचवीस हजारपर्यंत लोक आहेत, व त्यांचा सरदार जनरल होश आहे. हें अरमार वादळानें मागें हटून परत ब्रेस्त व रोशेल या ठिकाणीं गेलें. त्यांतून एक पन्नास तोफांचें ब्रिटिश यांनीं घेतलें, व दोन चवव्याहात्तर तोफांचीं गलबतें ब्रेस्त शहराजवळ तडीस लागून लुटलीं.

ससंबर महिन्याचे २८ वे तारिखेस नवी पार्लमेंट सभा बसली. तेथें पहिला स्पीकर आडिंग्टन साहेब यासच त्या जागेवर नेमिलें. त्या

बैठकींत राजानें सभेंत भाषण केलें, त्यांत दुसऱ्या गोष्टींमध्यें हें जाणिवलेंकीं, तह्याच्या बोलण्याचा उद्योग चालविला आहे, व सर्व अखत्यार देऊन कोणास तरी लवकर **पारिस** शहरास पाठवितों. तसाच शत्रूचा हल्ला करण्याचा उद्योग, आपले अरमाराचा विजय, शत्रूंचा पराजय, व लढाईचे प्रारंभीं **आस्त्रियन** यांचा चढाव झाला तो, व **फ्रेंच** यांनीं **स्पेन** देशास आपणाशीं लढाई करावयाची उमेद दिली आहे, या सर्व गोष्टीही सूचविल्या.

**ग्रेटब्रिटन** किंवा **अयर्लंड** यावर हल्ला करण्याचा शत्रूंचा बेत दिसत होता, म्हणून प्रधानांनीं मसलत सांगितलीकीं, पंध्रा हजार लोक नवे ठेवून ते फौज व अरमार यांत वांटावे, साठ हजार नवे **मिलिशिया** यांचे लोक जमवावे, व सुमारें वीस हजार स्वार, व बंदुकीचें निशाण मारण्यांत खबरदार असे सातशें, सगळे मिळून एक लक्ष दोन हजार. यानंतर थोडे दिवसांनीं पुढच्याचे विचारासाठीं सभेनें **कमिटी** केली, तेव्हां लढाईखात्याकडील **सेक्रेटारी** यानें जाहीर केलें कीं, सांप्रत देशांत व बाहेर लढाईचे चाकरीवर एक लक्ष पंचाण्णव हजार

सहाशें चवऱ्याहात्तर लोक आहेत. डिसेंबर महिन्यांत प्रधानानें हिंसाब दाखविला कीं, एकंदर खर्च २७६५४७००० पौंड झाला, व वसूल २७१४५०००पौंड झाला, म्हणून बाकी २९८०००पौंड राहिली. यारवेरीज दुसरे चाहा, कौंवा, लिलावें, दारू, वगैरे जिनसांवर २११०००० पौंड कर बसविले. परंतु पुढें उत्पन्न नाहीं किंवा त्यांपासून लोकांस दुःख होतें, म्हणून रद्द केले.

यानंतर पार्लमेंट सभेनें तहाचे उद्योगाकडे लक्ष्य दिलें. त्या वकीलीचे कामावर लार्ड मामस्बरी याची नेमणुक होऊन तो आकुटोबर महिन्याचे १५वे तारिखेस निघून गेला. त्यामहिन्याचे २४वे तारिखेस त्यानें डेला क्रोआ, फ्रेंच यांकडील वकील, यास, एक चिटी पाठविलीकीं, काईम तहाचा कांहीं तरी एक मूळ करार ठरवा. ही चिटी दिल्यावर प्रथम बोलणें झालें, त्यांत ब्रिटिश वकीलास विचारिलेंकीं, दुसरे संस्थानाकडून तुम्हास तह करण्याचा अखत्यार दिला आहेकीं काय? त्यानें नाहीं म्हटलें; परंतु सांगितलेंकीं माझे चिटींत लिहिलें आहे। त्याविषयीं डिरेक्टर यांचा अभिप्राय मला कळला म्हणजे मी तें वर्तमा-

---

*: यास बुंदही म्हणतात. हा जिनस मुंबईमध्यें फार प्रसिद्ध आहे.

न सांगण्याकरितां व त्यांचे हुकूम घेण्याकरितां त्या संस्थानांत जासूद पाठवीन. तेव्हां इंग्लिश वकीलास विचारिलें कीं, फ्रेंच राज्याविषयीं व मुलुख परत देण्याविषयीं ब्रिटिश सरकारचा काय विचार आहे तो तरी तुम्ही सांगाल कीं नाहीं? त्यानें उत्तर केलें कीं, डरेकृटर यांनीं आपला अभिप्राय कळविल्यावर त्याविषयींही हुकुम आणविण्याकरितां मी साजूद पाठवीन. डरेकृटर यांचें म्हणणें पडलें कीं, हें सर्व वेळ लावण्याचें लक्षण आहे; आणि असें बोलण्यावरून गेले वर्षीचे विरवम साहेबाचे करार फिरून सांगणार असें आम्हास खचीत दिसतें. नहाचे मुख्य कलमाविषयींही त्यांची मान्यता नव्हती. परंतु त्यांनीं सांगितलें कीं, तहाचें कोणतें बोलणें आम्ही अमान्य करणार नाहीं, व लार्डमामुस्बरी यानें, दुसरे ग्रेटब्रिटन याचे साथी राज्यांकडून अरवृत्यार आणिला. म्हणजे त्याचे बोलण्यावर आम्ही लागलेंच उत्तर देऊं. इंग्लिश वकील याकडून मध्यें एक पत्र गेल्यावर नवेंबर महिन्याचे १२वे तारिखेस डेला कोआ यानें इंग्लिश वकीलास लिहून पाठविलें कीं, परस्पर काय करार असतील ते ला-

गलेच लिहून पाठवावें. त्याच पत्रांत त्यानें कांहीं क्रोधाचा अभिप्राय लिहिला, व त्यानंतर कांहीं कागद पत्रें झाल्यानंतर डिसेंबर महिन्याचे १७वे तारिखेस इंग्लिश वकीलानें देण्याचे व घेण्याचे करार, आणि परस्परें बंदोबस्त हे लिहून एक गुप्त पत्र दिलें. त्यांतील कलमें. प्रथम, एंपरर याचें राज्य फ्रेंच यांनीं घेतलें असेल तें परत द्यावें. २ युरोप एथें साधारण निर्भयता असावी, असा जर्मनी एथील व फ्रान्स यांचा तह असावा. ३ फ्रेंच फोजेनें इटली देशांतून जावें, व त्या देशाचे आंतले कारभारांत पडणार नाहीं, असा करार करावा. दुसरें रशिया देशाची एंप्रेस इनें मर्जीस येइल तेव्हां या तहांत यावें, व पोर्तुगल देशाचे राणीचे मर्जीस येईल तेव्हां उभय पक्षीं कांहीं जुलुमाचे करार न करितां फ्रेंच राज्याशीं तिला तह करण्याचा अखत्यार असावा. चवथें, या करारानें ब्रिटिश राजा, फ्रान्स मुलखांतला जो भाग आपण घेतला आहे, तो सर्व तसाच परत देईल. तशींच सेंटपिएयर, व मिकिलन हीं बेटें व न्यूफौंड्लंड एथील माशांच्या व्यापाराचा अखू-

त्यार परत देईल, परंतु स्पानिश यांचें बंदर सेंट डोमिंगो, हें फ्रेंच यांस नदेण्याचा अखत्यार युत्रेक्ट एथील तहाप्रमाणें ब्रिटिश राजा जवळ आहे, तो सोडिल्यास त्या देशांत मुलुखाची बरोबरी राखण्याकरितां तो दुसरें कांहीं तरी मागेल. पाचवें, या तहांत जीं ठिकाणें दिलीं व घेतलीं जातील, त्यांतील सर्व लोकांस आपले कुटुंबासहित निघून जाण्यास, व आपली जमीन आणि स्थावर जिनगी विकण्यास सदरपरमाणगी असावी. तशाच ज्या ज्या जप्ती केल्या असतील त्या रद्द करण्यासाठीं, व दोहोंतून कोणते एके सरकारावर कोणी माणसाचा वाजवी दावा असल्यास तो चुकविण्यासाठीं बंदोबस्त व्हावा.

नंतर दुसरी एक गुप्त याद दिली, तींत हालंड देशाविषयीं लिहिलें कीं, फ्रान्स देशानें लढाईचे पूर्वीं जसें जसें होतें तसें जर सर्व विषयीं केलें नाहीं, तर ब्रिटिश राजा व त्याचे साथी यांचा त्या राज्याशीं फार संबंध आहे, म्हणून राज्य देण्याघेण्याविषयीं मात्र त्यांच्यानें रुकार देववत नाहीं, व स्पेन देशाचे राजाविषयीं लिहिलें होतें कीं, त्या-

ची मर्जी तहांत मिळण्याची असल्यास आपणाक-
डून अडथळा नाहीं.

या करारावर फ्रेंच वकीलाचें बोलणें पडलें, त्यांतील सारांशकीं, पहिल्या यादींत देण्यापेक्षां मागणें फार आहे, व त्याप्रमाणें दिलें असतां फ्रान्स युरोप खंडांतील दुसरे सरकारांप्रमाणें बळकट राहाणार नाहीं. राज्याचे कायद्यांप्रमाणें त्या यादींतील करार कबूल करवत नाहीं, व नेदर्लंड हे देश फ्रान्सयास मिळविले आहेत, ते सोडिले तर फार धांदल होईल. लार्ड माम्स्बरी म्हणाला, ब्रिटिश राजा व एंपरर या दोघांमध्यें तह झाला आहेकीं, लढाईचे पूर्वीं दोघांचें जितकें राज्य होतें तितकें परत आल्यावांचून शस्त्रें ठेवूं नये. यावर डेला क्रो आ यानें उत्तर केलेंकीं, सांप्रतचे कारभाऱ्यांनीं जर नेदरलंड सोडून दिलें, तर त्यांवर गुन्हा लागू होईल. रशिया, आस्ट्रिया, व प्रशिया यांनीं पोलंड देशाचे विभाग करून आपलें सामर्थ्य वाढविलें. इंग्लंड यानें मुलूख घेऊन आपलें सामर्थ्य दुप्पट वाढविलें, आणि आपलें एकटे हिंदुस्थानाचे राज्यानेंच युरोप एथील सर्व राज्यांस

फ्रान्स देशावर आणण्याकरितां पैका देण्यास श क्ति आली, व व्यापार त्या एके देशाकडेच आहे, म्ह- णून त्यास अपार द्रव्य मिळालें आहे.

त्याभाषणामध्यें लार्ड मामूस्बरी यानें फ्रें- च वकीलास सांगितलें कीं, नेदर्लंड, फ्रान्स मुलु- खाचा एक भाग असावा या गोष्टीस इंग्लिश रा- जा कधीं राजी होईल असें आपण मनांत आणूं नये. या भाषणाचे दुसरे दिवशीं लार्ड मामूस्बरी यास डरेकूटर यांकडून डेला क्रोआ याचे हस्तें चिटी आली कीं, गुप्त चिटी सहीवांचून पाठविली तीवर सही करावी, व २४ तासांचे आंत आपला शेवटचा करार सहीकरून पाठवून द्यावा. लार्ड साहेबानें चिटीवर सही केली; नंतर १९ वे तारिखे- स डुरेकूटर यांकडून त्यास १७ वे व १८ वे तारि- खेचे त्याचे दोन चिठ्यांचें उत्तर आलें कीं, फ्रेंच डु- रेकूटर राज्याची स्थिति, कायदे, व तह यांचे वि- रुद्ध कोणतें बोलणें एकणार नाहींत. लार्ड साहे- बास दुसराही हुकूम झाला कीं, पारिस शहरांतून ४८ तासांचे आंत निघून जावें.

नंतर राजानें कामन्स यांस निरोप पाठ-

विलाकीं, आपला तहाचा उद्योग, **फ्रेंच** यांनीं कबूल करावयास अयोग्य अशीं मूळ कलमें धरिल्यावांचून आम्ही बोलणें ऐकत नाहीं असें म्हणून, व आपला वकील **पारिस** शहरांतून घालवून देऊन मोडिला. **डिसेंबर** महिन्याचे ३०वे तारिखेस या निरोपाचा विचार झाला, व **नेदर्लंड** हे देश **फ्रेंच** यांचे हातीं न असण्याकरितां इतका आग्रह धरावा किंवा नाहीं, याविषयीं कित्येकांचें मत वेगळें होतें, परंतु तहाविषयीं राजाचे प्रधानांचें जें मत होतें त्यावर विरुद्ध छत्तीस मात्र संमति पडल्या.

**पार्लमेंट** सभेची पुनः बैठक झाल्यावर तिचें लक्ष्य एके मोठे गोष्टीकडे लागलें. ती गोष्ट ही. **फेब्रुआरी** महिन्याचे २६वे तारिखेस **प्रिविकोन्सिल** यानें हुकूम केलाकीं, **बांक** याचे कारभाऱ्यांनीं राज्यांतील स्थितीचा विचार होण्याचे पूर्वीं कांहीं पैका देऊं नये. या हुकुमाचें कारण कीं, सोनें रुपें मुलुखाचे बाहेर फार जाऊं लागल्यामुळें नाणें महाग झालें, आणि त्याविषयीं लोकांत गरज इतकी पडलीकीं **बांक** याच्या चिट्या विकून

पैका पाहिजे तर मिळावयास संकट पडूं लागलें. २८ वे तारिखेस कामन्स, सभेनें बांक याच्या काम कारभाराची चौकशी करण्याकरितां कमिटी नेमिली, तिनें त्यांचा जमाखर्च चांगले प्रकारचा आहे असा रिपोर्ट केला, नंतर पैका देण्याची बंदी कांहीं वेळ पर्यंत तशीच राखिली, परंतु दोन पौंड पर्यंत चिट्या देण्याचा अखत्यार बांक यास दिला, व डालर या नांवाचें नाणें नवें पाडून चालविलें, त्यामुळें लोक स्वस्थ झाले, आणि जो अविश्वास उत्पन्न झाला होता, तोही गेला.

एप्रिल महिन्याचे २६वे तारिखेस एक्स्चेकर याचा चान्सेलर यानें दुसरी जमाखर्चाची याद देऊन कळविलेंकीं, पूर्वींचे बैठकींत पैका देण्याचा हुकूम झाला आहे, त्याखेरीज या वर्षांत दुसरे एक कोटि पन्नास लक्ष पौंड लागतील. उसनवार पैका एक कोटि पंचेचाळीस लक्ष पौंड घ्यावा, व त्यांत पंध्रा लक्ष अयर्लंड याचे नांवावर लिहावा असें पूर्वीं ठरलें होतें. याखेरीज एंपरर यास आणखी अगाऊ पैका देणें झाल्यास पस्तीस लक्ष पौंड दुसरे उसने घ्यावे असा करार केला.

१२८४००० पौंड उत्पन्न करण्यास कांहीं जिनसांवर नवे कर बसविले. पुढें हे कर मना करून घोडे, कोळसे, मिरीं, मेवीं व लहान घड्याळें, व एकाच दारू यांवर बसविले. ती सभेची बैठक जुलै महिन्याचे विसावे तारिखेस उठली. बैठकीचे शेवटीं प्रधानांत फेरफार करण्याचे बेत चालले होते, व अरमारांत एक मोठें बंड झालें होतें, त्याचा बंदोबस्त करून त्यांतील मुख्यांस ठार मारिलें.

त्यावेळेस सरजान जर्विस म्हणून एक मोठा शूर इंग्लिश सरदार स्पानिश अरमार भेटेल या आशेनें समुद्रांत फिरत होता. शेवटीं त्याचे बातमीदार गलबतांपासून त्यास कळलें कीं शत्रु बारा मैल अंतरावर दिसत आहेत. त्याचे अरमारांत मोठीं गलबतें पंध्रा होतीं, आणि शत्रूंचीं पंचवीसांत कमी नव्हतीं, असें दिसत होतें, तथापि त्यानें लढावयाच्या निश्चयानें आपले गलबतांच्या बंदोबस्ताच्या रांगा करून स्पानिश अरमाराचा बंदोबस्त होण्याचे पूर्वींच त्यावर हल्ला केला. स्पानियार्ड यांशीं लढाईचे प्रारंभीं बहुत हिंमत पाहिजे असें समजून तो आपले लोकांचे भरंशानें नेहमीची पद्धति

सोडून शत्रूंचे अरमाराचे मधून गेला, आणि त्यानें त्याचा तिसरा हिंसा वेगळा केला. नंतर सुमारें पांच तास लढाई होऊन त्यानें शत्रूंचा पराजय केला, व त्यांचीं दोन गलबतें ११२ तोफांचीं, एक चव्व्यायशीं तोफांचें, व एक ७४ तोफांचें अशीं चार घेतलीं. तेव्हां असें कळून आलें कीं, शत्रूंचे अरमारांत मोठीं गलबतें २७ होतीं. ही लढाई फेब्रुआरी महिन्याचे १४ वे तारिखेस केप सेंट विन्सेंट याजवळ झाली, तींत इंग्लिश यांचे ३०० मेले, व सांपडलेले गलबतांत मेलेले व जखमी एकंदर आडूमरल जर्विस याचे याद्दीप्रमाणें ६०२ होते. या विजयानें इनाम म्हणून आडुमरल यास अर्लसेंट विन्सेंट लार्ड जर्विस असा किताब दिला.

पोर्ट्स्मोथ एथील अरमारांत उन्हाळ्यामध्यें एक बंड झालें म्हणून पूर्वीं सांगितलें, तें बंड एक वेळ मोडल्यावर फिरून कांहीं दिवसपर्यंत तें त्यापेक्षां जबर झालें, परंतु शेवटीं बंडवाल्यांमध्यें आंतलेआंत फूट पडून, त्यांतून बहुत आपले मुख्यांस धरून देऊन आपले कामावर हजीर झाले.

पार्लमेंट सभेचे मागले बैठकीचे वेळेस ठरलें

होतें कीं, तहाचा फिरून उद्योग करण्याकरितां फ्रान्स एथें एक वकील पाठवावा. तह व्हावा म्हणून लार्ड ग्रेन्विल यानें पत्र पाठविलें, त्याचें उत्तर फ्रेंच यांनीं चांगले रीतीनें केलें, व बोलणें लैल एथें व्हावें असें ठरलें. लार्डमामस्बरी यास फिरून इंग्लिश यांकडचा वकील नेमिलें; व लेटुर्नेर फ्रेंच यांकडचा नेमिला. तह होण्याचा प्रारंभ जुलै महिन्यांत झाला, परंतु फ्रान्स एथील राज्य चालविणारांनीं अशीं अपरिहार्य विघ्नें केलीं कीं, तह कांहीं नहोतां लार्ड मामस्बरी ससंबर महिन्यांत परत आला. त्यामुळें लोक फार कष्टी झाले.

आड्मरल डंकन म्हणून टेक्सल नदीवरील इंग्लिश अरमाराचा सरदार आपलें अरमार नीट करावया करितां तेथून गेला, ती संधी पाहून डच यांचें अरमार आपलें ठिकाण सोडून निघालें. क्यापटन त्रालप यानें हें पाहून आड्मरल यास कळविलें. तेव्हां आड्मरल यानें आपलीं मोठीं गलबतें चौदा, व दोन पन्नास तोफांचीं गलबतें अशीं घेऊन जलदीनें त्यांवर चालून गेला. डच यांचा आड्मरल डेविंटर यानें आपले हातारवालचे पंधा ग-

लबतांची मोठ्या शौर्यानें तयारी केली. नंतर कांपर्डौन गांव आहे, त्या कांठावर आक्टोबर महिन्याचे ११ वे तारिखेस लढाईचा प्रारंभ झाला. आड्मरल डंकन यानें शत्रूंची रांग मोडावयाचे लक्ष्यांत त्यांच्या व जमिनीच्या मध्यें प्रवेश केला. प्रथम भागून वैस आड्मरल ओन्स्लो यानें हल्ला करून फार पराक्रम केला. नंतर तो शूर आड्मरल डंकन यानें शत्रूंची रांग फोडून त्यांची पुढली बाजू व मध्य यांवर जबरदस्त हल्ला केला. शेवटीं डेविंटर याचे गलबतांचें रक्षण न होई, असें होऊन त्यानें आपलें निशाण उतारिलें. व त्याचीं नऊ मोठीं गलबतें, व दोन पन्नास तोफांचीं, इंग्लिश यांचे हस्तगत झालीं. त्या लढाईंत ब्रिटिश अरमारांतले साडेसातशांवर लोक मेले व जखमी झाले. तसेच शत्रूंचेही ५४० मेले व ६२० जखमी झाले. या विजयापासून लोकांस फारच संतोष झाला, व आड्मरल डंकन यास वैकौंट व आड्मरल ओन्स्लो यास बारोनेट हे किताब मिळाले. लार्डहौ, व आड्मरल जर्विस, व डंकन यांनीं तीन मोठे विजय संपादिले, तन्निमित्त सर्वांनीं ईश्वराचा स्तव करण्याकरितां डिसेंबर महिन्यांत ए-

क दिवस नेमिला, व त्या दिवशीं राजा व राणी पार्लमेंट यांतील सभासदांस बरोबर घेऊन सेंट पाल याचे देवळास गेलीं.

सन १७९७त ब्रिटिश अरमाराचा जय झाला असतांही शत्रूंनीं बाहेरून भय घालण्याचे उद्योग चालविलेच होते. जान्युआरी महिन्यांत पार्लमेंट सभा बसली, तेव्हां राजानें सांगितलें कीं, आपले राज्यावर हल्ला करण्याचा उद्योग फ्रान्स देशांत चालला आहे, अशी मला बातमी लागली आहे; त्यावरून लढाईसाठीं पैका उत्पन्न करण्याकरितां तिप्पट कर बसवावयाचा हुकूम केला, या खेरीज कित्येक सभासद मागितल्यापेक्षां अधिक पैका देण्यास राजी झाले, व बांक याचे कारभाऱ्यांस इच्छेनें कोणी पैका दिल्यास घ्यावा म्हणून हुकूम केला, तोही लवकरच पुष्कळ जमला. राजानें २०००० पौंड दिले, राणीनें ५००० दिले; व दुसरे लहान लोक एकमेकाचे ईर्षेनें स्वदेशाचे कल्याणाकरितां पैका देऊं लागले. पार्लमेंट सभेंत दुसरें ठरलें कीं, मिलिशिया यांचे कांहीं नवे लोक बोलवावे, आपले देशाचें संरक्षण करण्यास ज्यांस सामर्थ्य व इच्छा आहे,

त्यांचा हिंसाब आणवावा, व संकट पडल्यास त्यांपासून चाकरी घेण्यास राजास अखत्यार द्यावा. असा विचार ठरल्यावर राज्यांत सगळे ठिकाणीं प्रतिष्ठित गृहस्थांनीं एकीकडे जमून आपलीं नांवें वालंटीर पलटणींत लिहिविलीं, आणि बरोबर कवाईत शिकून स्वदेशांतलीं बंडे मोडण्याची व बाहेरचा हल्ला निवारण करण्याची इच्छा धरून ते लवकरच त्या कामांत तयार झाले. जमाखर्चाचे दुसरे कलमामध्यें त्या बैठकींत जमिनीवरचा कर बंद करण्याचा उपाय कांहीं झाला.

वर्षासाठीं पैक्याचा एकंदर पुरावा झाल्यानंतर, राजानें सभेस निरोप पाठविला कीं, फ्रान्स, फ्लांडर्स व हालंड या तीन देशांतील बंदरांत लढाईचें सामान व लोक यांची गलबतावर चढण्याची तयारी मोठ्या हुशारीनें चालली आहे, व या देशांतील लुच्चे, व असंतुष्ट लोकांचे कागद पत्रांनीं व निरोपांनीं फ्रेंच यांचा हल्ल्याचा बेत वाढत आहे. या निरोपावरून पार्लमेंट सभेनें हेबियस कार्पस कायदा बंद करावा असें ठरविलें. नंतर आर्थर ओकानर म्हणून एक ऐरिश गृहस्थ व दुसरे कित्येक लोक यां-

स शत्रूंस कागदपत्र पाठवितात. या अन्यायावरून धरून, मेड्स्टोन एथें चौकशी करून सोडिलें. ओकैली यावेर मात्र गुन्हा लागू होऊन त्यास ठार मारिलें. पार्लमेंट सभेची बैठक जून महिन्याचे २९ वे तारिखेस संपली.

लाहोग याजवळचें लहान सेंट मार्कुबेट इंग्लिश यांनीं घेऊन गलबतें वगैरे पहाण्याचें ठिकाण केलें होतें, त्यावर फ्रेंच यांनीं मे महिन्याचे ७ वे तारिखेस तोफांचे होड्यांची एक टोळी पाठविली, ती फार नाश पावून परत आली. इकडे ओस्तेंड एथील किल्ला मोडण्याचा इंग्लिश यांनीं यत्न केला, तो फुकट गेला.

असें बाहेरचें वर्तमान असतां अयर्लंड एथील हलके लोक सरकाराशीं नाराजी होते, त्यांस कित्येक मोठे लोकही सहाय झाल्यामुळें त्यांनीं बंड करावयाची मसलत केली. त्यांस फ्रेंच मदत करणार होते, परंतु त्यांची वाट न पाहतां मे महिन्याचे २३ वे तारिखेस त्यांनीं राजधानीवर जबरदस्त हल्ला करण्याचा निश्चय केला. परंतु सरकारानें चांगला बंदोबस्त केला होता, त्यामुळें त्यांचें कांहीं

चाललें नाहीं; व त्यांचे मुख्यांतून कित्येक, ज्यांत लार्ड एड्वर्ड फिट्सजरल्ड होता, त्यांस धरून बंदीस घातलें. तो लार्ड, धरावयाकरितां आले होते त्यांशीं लढाई करण्यांत फार जखमा लागल्या होत्या, त्यामुळें पुढें लागलाच मेला. तथापि त्याचे दुसरे दिवशीं हजार भालेवाले व बंदुकवाले लोकांनीं नास शहराजवळ राजाचे स्वारांवर हल्ला केला, परंतु त्यांचें निवारण चांगलें झाल्यामुळें त्यांतील शंभर समारें मारून बाकीचे पळाले. दुसऱ्या कित्येक त्यावेळेस लढाया झाल्या, त्यासर्वांत बंड वाल्यांचा मोड झाला. तेव्हां अर्ल क्यामडन याचे जागेवर मार्केइस कार्नवालिस यास अयर्लंड एथील लार्ड लेफ्टेनंट या कामावर पाठविलें. त्यानें जाहीर केलें कीं, अमुक दिवसांचे पूर्वीं केलेले अन्यायांची क्षमा, इनसाफाचा समार पाहून केली जाईल.

इतक्यांत अयर्लंड एथील कामन्स सभेनें बंडाचे बेतांचा सर्व शोध लावून तें वर्तमान सविस्तर लिहून पाठविलें. तें असें. युनैटेड ऐरिशमेन याची मंडळी म्हणून सन १७९१ त झाली होती; तिचे प्रारंभापासून तिचे मुख्यांचा वास्तविक बेत हा होताकीं

अयर्लंड व इंग्लंड हीं दोन राज्यें वेगळीं करावीं, व स्थापिलेली राज्यरीति फिरवावी. ह्या बेत त्यांनीं कांहीं वेळपर्यंत प्रसिद्ध केला नाहीं, शेवटीं फ्रेंच यांस कागदपत्र पाठवून त्यांनीं त्यांची मदत मागितली, व फ्रेंच यांनीं कबूल केली. सन १७९६ त शस्त्रें व सामान त्या लोकांनीं तयार करून जुरर, माजिस्त्रेट, व दुसरे जे लोक कायद्याप्रमाणें वहिवाट चालविणारे होते, त्यांचे जिवावरची भयंकर मसलत केली होती, परंतु बंडवाल्यांची तयारी मोडण्याचा सरकारानें हुकूम केला, व दुसरा बंदोबस्त केला त्यामुळें तें बंड शांत झालें. पुनः सन १७९७ चे अखेरीचे पूर्वी ती बंडाची मसलत उभारली, आणि तींत मुख्य आर्थर ओकानर, ज्यास मेडस्टोन एथें सोडलें होतें तो, व लार्ड एडुर्ड फिट्स जरल्ड हे दोघे होते. त्यांनीं फ्रेंच यास मदत पाठविण्याकरितां बहुत वेळ विनंति केली, आणि ती मदत आल्यावांचून त्यांनीं चढाव केला नसतां, परंतु सरकारानें चांगला बंदोबस्त आरंभिला, त्यामुळें त्यांस एकदांच चढून यावें, किंवा बेत सोडून द्यावा असें भास झालें.

त्यां बंडांत जे होते, त्यांस क्षमा होईल अशी जाहिरात लाविली म्हणून पूर्वी लिहिलें, त्याप्रमाणें लोक त्या करारास राजी होत असतां आगस्ट महिन्याचे १२ तारिखेस सुमारें एक हजार फ्रेंच लोक गलबतांतून येऊन किलाला एथें उतरले. त्यांस तेथील लोक थोडेच सामील झाले, इतक्यांत ते अधिक जमू नयेत म्हणून लार्ड लेफ्टेनंट स्वतः तेथें आला. तो येण्याचे पूर्वी त्यांनीं क्यासल्बार एथें जनरल लेक याचे हाताखालचे राजाचे फौजेवर हल्ला केला, आणि त्यास तेथून पळविलें. परंतु सप्तेंबर महिन्याचे ८ वे तारिखेस तो बालिंगमक एथें शत्रूंवर चढून गेला, तेव्हां थोडीशी लढाई करून ते स्वाधीन झाले.

यामुळें ऐरिश लोकांचे जमावांतून बहुत ताबेखालीं आले, परंतु केव्हां केव्हां लूट व दांडगाई करणें हें चाललेंच होतें. डिसेंबर महिन्याचे १६ वे तारिखेस एक फ्रेंच जहाज डानिगाल याचे कांठावर आलें, परंतु आलीकडील मोड झाला त्याचें वर्तमान ऐकून परत गेले. आकटोबर महिन्याचे ११ वे तारिखेस आड्मरल बारन यास फ्रेंच

यांचीं कांहीं गलबतें ऐरिश कांठावर दृष्टीस पडलीं, त्यांशीं त्यानें दुसरे दिवशीं सकाळीं लढाई केली. त्यांत एक मोठें गलबत व आठ फ्रिगेट होतीं; त्यांतून एक मोठें व तीन फ्रिगेट इतकीं त्या दिवशींच धरिलीं, व आणखी तीन फ्रिगेट नंतर धरिलीं. या गलबतांत शिपाई व ऐरिश बंडवाले बहुत होते. त्या बंडवाल्यांत थिओबाल्ड वुल्फटोन या नांवाचा एक पुरुष जो पूर्वीं पारिस शहरांत बंडवाल्यांचे कामावर होता, तोही सांपडला. त्यास ठार मारावें असें शासन ठरविलें, परंतु आत्महत्या करून तें त्यानें चुकविलें.

नंतर ब्रिटिश राज्यावर चांगला हल्ला करण्यास आपणास सामर्थ्य नाहीं, असें पक्कें समजून फ्रेंच सरकारानें इजिप्ट देश घेण्याचा बेत केला. तो करण्याचें कारण हेंकीं पुढें कधीं तरी आर्बस्थानाचे समुद्राचे वाटेनें किंवा इराणाचे समुद्राचे वाटेनें हिंदुस्थानांत जावें अशी त्यांची मसलत होती. मे महिन्यांत जनरल बोनापार्ट व आड्मरल ब्रुए हे दोघे सरदार मोठें अरमार घेऊन निघाले. त्यांनीं जून महिन्याचे ९ वे तारिखेस माल्टा बेटा पुढें येऊन तें घेतलें, व जुलै महिन्याचे पहिले तारिखेस त्यांची फौज आलेकुसांद्रि-

या शहरांत उतरली. तेथील लोक व तुर्क यांशीं कित्येक लढायांत फ्रेंच यांनीं जय मिळविल्यामुळें त्यांस हुशारी आली; आणि इजिप्त खचित आपले हस्तगत होईल असा त्यांचा निश्चय झाला. इतक्यांत अकस्मात् दैववशात् आगस्ट महिन्याचे पहिले तारिखेस ब्रिटिश आड्मरल नेल्सन नैल नदीचे संगमाजवळ आला, व फ्रेंच अरमार आबुकीर समुद्रांत नांगर टाकून राहिलें आहे असें त्याचे दृष्टीस पडलें. आड्मरल ब्रुए याचे गलबतांवर एकशें वीस तोफा व एक हजारावर लोक होते; दुसरीं तीन गलबतें एक एकावर ऐशीं तोफा अशीं होतीं, व चवऱ्याहात्तर तोफांचीं नऊ होतीं.

तीं फ्रेंच यांचीं गलबतें कांठाजवळ लढाई करितां घट्ट व मजबूद रांग करून राहिलीं. त्यांचे बाजूवर चार फ्रिगेट व बहुत बंदुकांच्या होड्या ठेविल्या होत्या, व पुढें बंदोबस्ताकरितां एक लहान बेटावर मोरचा बांधिला होता. हें पाहून इंग्लिश आड्मरल याची हल्ला करण्याची हिंमत खचली नाहीं. त्यानें फ्रेंच यां इतकीच आपले मोठी गलबतांची रांग बांधून तिला बळकटी येण्याकरितां एक पन्नास तोफांचें ग-

लबत ठेविलें होतें, परंतु शत्रूंजवळ जात असतां त्याचें कलोडन नावाचें एक चेवऱ्याहात्तर तोफांचें गलबत उथळ पाण्यांत जमिनीस लागल्यामुळें तेथून दुसरे दिवशीं सकाळपर्यंत निघालें नाहीं.

आड्मरल नेल्सन यानें मोठ्या युक्तीनें व शौर्यानें शत्रूंची रांग फोडून त्यांचे अरमाराचे कांहीं भागास वेढा दिला. सूर्यास्ताचे सुमारें लढाईस आरंभ मोठ्या धीरानें झाला, आणि प्रारंभींच आड्मरल एब्रु यास दोन जखमा लागल्या, आणि तो दुसऱ्या जागीं गेला, तेथें मेला. लढाई सुमारें दोन तास झाल्यावर फ्रेंच यांचीं दोन गलबतें घेतलीं, तिसरें लवकरच लागून फुटलें, आणि सर्व पुढील बाजू इंग्लिश यांचे हस्तगत होऊन त्यांचा विजय पूर्ण झाला. लोरियँ म्हणून एक फ्रेंच गलबत फार लढून शेवटीं जळून उडून गेलें. त्यावरचे लोकांतून थोडे वांचले. ती लढाई मधून मधून सूर्योदयापर्यंत झाली, तींतून फ्रेंच यांचीं मोठीं गलबतें दोन, व दोन फ्रिगेट इतकीं मात्र बचावून गेलीं. त्या लढाईंत ब्रिटिश यांचे मोठा सरदार व दोनशें दोन लोक मेले, आणि सहाशें पंच्याहात्तर जखमी झाले. फ्रेंच यांचे यापेक्षां

अधिक पडले. या विजयानंतर आड्मरल नेल्सन आलेक्सांद्रिया शहरांतील बोनोपार्ट याचे लोकांस वेढा घालण्याकरितां आपलीं कांहीं गलबतें ठेवून आपण सिसिली बेटास निघून गेला.

या मोठे विजयाचें वर्तमान ऐकून इंग्लंड देशांत सर्वत्र फार संतोष झाला. त्या प्रसंगीं लोकांनीं राजास आनंदपत्रें दिलीं; व आड्मरल यास लार्ड नेल्सन असा किताब मिळाला. तो विजय पाहून रशिया देशाचा एंपरर, तुर्क लोक व नेपल्स एथील राजा, यांस फ्रेंच यांशीं लढाई करण्याची उमेद येऊन त्यांनीं इटली देशांत व रैन नदीचे कांठावर कितीएक वेळ फ्रेंच यांचा पराजय केला. प्रिन्स आफ आरंज यास पुनः जागेवर स्थापावयास ही संधि चांगली आहे असें समजून ब्रिटिश सरकारानें मोठें अरमार देऊन ड्युक यार्क व आड्मरल मिचल यांस हालंड एथें पाठविलें. टेक्सल नदींत डच यांचीं आठ गलबतें होतीं, त्यांचा ब्रिटिश आड्मरल यानें मोड केला; व पुढें जात असतां ड्युक यानें आणखीही कित्येक विजय मिळविले; परंतु डच यांची इंग्लिश यांस मदत करण्याची इच्छा नव्हती, व फ्रेंच

चवऱ्याहात्तर बंदिवान होते.

या व दुसऱ्या फ्रेंच यांचे विजयामुळें जर्मनी एथील एंपरर यांकडून कौंट सेंट जुलीन यानें तहनाम्यावर सही करून दिली; परंतु तो तडीस गेला नाहीं. पुढें रशियन यांनीं लढाई सोडिली, व दुसऱ्या कांहीं प्रतिकूळ गोष्टी घडल्या, त्यांमुळें दुसऱ्यानें लढाई बंद होण्याचा करार एंपरर यानें केला, व त्याचीं कलमें पुढें ठरलीं.

त्यावेळेस इंग्लिश यांचा हिंदुस्थानांतील जो मुख्य शत्रु टिपू, त्याची राजधानी श्रीरंगपट्टण यावर इंग्लिश सरदार जनरल हारिस यानें वेढा देऊन तें घेतले, व त्या लढाईंत टिपू मारला गेला. यामुळें इजिप्त देशाच्या वाटेनें जाऊन त्यास मदत करावी असें फ्रेंच यांच्या जें मनांत होतें त्याची निराशा झाली.

एप्रिल महिन्याचे २१ वे तारिखेस प्रधानांनीं उद्योग केल्यावरून पार्लमेंट सभेंत विचार ठरला कीं, ग्रेटब्रिटन व अयर्लंड हीं दोनही मिळून एकुणिसावे शतकाचे प्रारंभापासून एक राज्य करावें; व सन १८०१ चे जान्युआरी महिन्याचे २२ वें तारिखे-

स त्या एकीभूत राज्याचे पार्लमेंट सभेची बैठक व्हावी असा हुकूम झाला; तसाच राजाच्या किताबांत, चिन्हांत, व निशाणांत फेरफार होण्याविषयींही जाहीरनामा लागला.

आतां अयर्लंड एथील रोमनक्याथोलिक लोकांस मोकळीक व्हावी याविषयीं प्रधानांमध्यें काहीं तंटा झाला; म्हणून पिट साहेब व त्याचे मित्र यांनीं आपलीं मोठीं कामें सोडिलीं. नंतर कामन्स सभेंतील पूर्वींचा स्पीकर आडिंग्तन साहेब यास मुख्य प्रधान व एक्सचेकर याचा चान्सेलर नेमिलें. लार्ड हाकसबरी व पेल्हम यांस सरकारचे सेक्रतारी नेमिलें; व कामनप्ली कोर्ट याचा पूर्वींचा मुख्य न्यायाधीश लार्ड एल्डन यास चान्सेलर नेमिलें.

त्या वेळेस रशिया देशाचा एंपरर पाल सर्व उत्तरेकडील सरकारांस अनुकूळ करून बहुधा फ्रेंच यांस मिळाला होता; अशासमयीं चतुरपणानें ब्रिटिश सरकारानें मोठीं गलबतें सज्ज तयार करून त्यांवर सर हैड पार्कर व लार्ड नेल्सन हे सरदार नेमिले. ते दोघे मार्च महिन्याचे १२वे

तारिखेस यामेंथि एथून निघून मोठें अवघड ठिकाण सौंड हें पार होऊन डेन्मार्क देशाची राजधानी कोपेन् हेगेन् शहर एथें पोंचले. जरी डेन यांनीं मोठी तयारी केली होती, तथापि लढाई निकराची होऊन त्यांचीं गलबतें अवरा गेलीं, व त्यांचे राजधानीस संकट प्राप्त झालें. अशा संधीस लार्ड नेल्सन यानें लढाई बंद करण्याचें बोलणें लाविलें, तें त्यांनीं मान्य केलें; व एंपरर पाल हा पुढें लवकरच मेला, त्यामुळें तो उत्तरेकडील राज्यांचा जमाव अगदीं मोडला.

इजिप्त देशांत सर राल्फ आबर्क्रोंबी यास बहुत फौज देऊन पाठविलें, त्यानें फार संकटें असतांही मार्च महिन्याचे ७ वे तारिखेस तेथें उतरून १३ वे तारिखेस आलेक्सांद्रिया शहराजवळ फ्रेंच यांचे कांहीं फौजेशीं लढाई करून तिचा अगदीं मोड केला. त्याच महिन्याचे २१ वे तारिखेस त्यानें फिरून आलेक् सांद्रिया शहराहून सुमारें ४ मैल अंतरावर दुसरी लढाई केली, तीं नहीं त्याचाच जय झाला, परंतु जखम लागल्यामुळें तो २८ वे तारिखेस मृत्यु पावला, हा मोठा नाश झाला. नंतर म

रदाराचें काम जनरल हचिन्सन याजवळ आलें, तो ही आलेक् सांद्रिया शहराजवळ शत्रूंची फौज होती तेथें गेला. त्यानें रोसटा किल्ला व शहर हीं दोनही घेतलीं. व तेथील रखवालदार फ्रेंच लोक यांनीं फारसा अटकाव केला नाहीं. मे महिन्याचे दुसरे तारिखेस ४००० ब्रिटिश लोक व तितकेच तुर्क लोक घेऊन तो कैरो शहरावर गेला; व त्यानें शमानिए याजवळ फ्रेंच लोकांवर हल्ला केल्यामुळें तो तेथें पोंचला. त्या ठिकाणीं लोक ५००० वर होते. परंतु त्यांनीं करार करून तें स्वाधीन केलें. हा मोठा विजय लहानसे इंग्लिश फौजेनें मिळविला; व त्यापासून सर्व इजिप्त देश इंग्लिश यांचे हस्तगत झाला.

ज्या दिवशीं या विजयाची बातमी इंग्लंड एथें आली, त्या दिवशीं तहाचे मूळ कलमांवर फ्रेंच यांचा वकील ओटो साहेब, व ब्रिटिश राजाचा वकील लार्ड हाक्सबरी या दोघांनीं सह्या केल्या होत्या. त्या तहाचें बोलणें कांहीं महिनेपर्यंत फार गुप्तपणानें चालत असे.

तो तह एमियाँ शहरीं सन१८०२ माहे मार्च तारिख २७ ते दिवशीं ठरला. तो असा. त्यांत ब्रि-

निडाड बेट व डच यांचें हिंदुस्थानचे दक्षिणेचें सिं-
हलद्वीप, या दोहों वांचून सर्व लढाईंत मिळालेला
मुलुख ब्रिटिश सरकारानें परत द्यावा. केप आफ्
गुडहोप हें अमानत ठेवून सर्वांनीं त्याचा सारिखा
उपभोग घ्यावा. माल्टा बेटांतून ब्रिटिश फोजेनें
निघून जाऊन, तें जिरुझिलम शहरांतील सेंट
जान याचे नैट यांस द्यावें, इजिप्त देश तुर्क सर-
कारास परत द्यावा. पोर्टुगल एथील राज्य जसें आ-
हे तसें असावें, व फ्रेंच फोजेनें रोम व नेपुस या
प्रांतांतून निघून जावें. त्या तहांत सात बेटांचे संस्था-
नांची स्वतंत्रता फ्रेंच यांनीं कबूल केली, आणि न्यू-
फौंड्लांड एथील माशांचा व्यापार पहिले रीतीनें
स्थापिला.

या तहापासून लोकांस फार संतोष झाला,
व लढाईचा खर्च वांचला. दहा वर्षेपर्यंत इतकी लढा-
ई झाली असतां इंग्लंड एथील राज्यरीति, कायदे,
व धर्म, हीं पूर्ववत् राहिलीं, आणि व्यापार वाढला ही
ही लोकांस मोठी गोष्ट वाटली. परंतु असा तह झाला

---

* तुर्क लोकांची नेहमी लढाई करणारि या नांवाची मंडळी.

असतांही लवकरच ग्रेटब्रिटन व फ्रान्स एथील सरकारांत पुनः द्वेष उत्पन्न झाला.

बोनापार्ट व्यापाराचा तह होऊं देईना, त्यानें जर्मनी देश लुटला, स्विट्सर्लंड घेतलें, व इंग्लंड एथील छापाची स्वतंत्रता नाहीं अशी करावी असें मागणें केलें, या गोष्टी पाहून तो पुनः लोभास प्रवृत्त झाला, असें, ब्रिटिश सरकारानें जाणिलें, आणि ब्रिटिश सरकार माल्टा बेट स्वाधीन करीना, व स्विट्सर्लंड देशाचे कारभारांत पडावयास त्याकडून यत्न होऊं लागला, या गोष्टी तह मोडावयाच्या झाल्या, असें फ्रेंच सरकार म्हणूं लागलें.

असें असतांही सन १८०३चे मार्च महिन्यापर्यंत बाहेरून ब्रिटिश प्रधानांनीं कांहीं विरोध दाखविला नाहीं, परंतु गलबतें मात्र कांहीं नवीं तयार केलीं होतीं. पुढें बोनापार्ट व ब्रिटिश वकील या दोघांमध्यें तंट्याच्या गोष्टीचा पक्का विचार ठरून शत्रूचें लक्ष्य पुरें ध्यानांत आलें.

इतक्यांत स्वदेशाचे रक्षणासाठीं सरकारास बंदोबस्त करण्याचें प्रयोजन पडलें. तें असें. सन १७९४ व ९५ या दोहों वर्षांत लोकांच्या मंडळ्या शत्रूंस जसे का-

गद्पत्र पाठवीत असत, तशीच आतां एक मंडळी झाली, व तिचा मुख्य कर्नल डेस्पार्ड झाला. त्यानें पूर्वी मोठी सरकारचाकरी बजाविली होती, परंतु कांहीं कारणामुळें तो सन १७९७ त बंडांत शिरून स्पाफील्डस एथें कैद झाला होता. त्यानें सन १८०२ त सुटल्यावर तीस लोकांची मंडळी मिळवून शिपाई व राजाचे रखवाली-लोक फितूर करावे, व पार्लमेंट सभेचे बैठकीचे प्रारंभीं राजाचा प्राण घ्यावा, इतक्यांत दुसरे मंडळीनें किल्ला व मोठी पेढी घ्यावी, व डांकेच्या गाड्या बंद कराव्या, आणि त्या बंद झाल्या ही खूण पाहून लोकांनीं चहूंकडुन उठावें, अशी मसलत केली. जरी सरकारास हें वर्तमान प्रथमच ठाऊक होतें, तथापि त्या लोकांचा गुन्हा पुरा होईपर्यंत चतुरपणानें वाट पाहून नवेंबर महिन्याचे १६ वे तारिखेस त्या बंडवाल्यांतून सुमारें तीस लोकांस सौथ लांबेथ एथें एक ठिकाणीं धरून कैद केलें. त्यांची चौकशी पुढले फेब्रुआरी महिन्यांत झाली, आणि कर्नल डेस्पार्ड व दुसरे पांच यांवर चांगले शायदीवरून गुन्हा लागू होऊन त्यांस त्या महिन्याचे २१ वे तारिखेस फांशीं दिलें.

पुढें उत्तरोत्तर बोनापार्ट याचा लोभ वाढत चालला,

तो ग्रेटब्रिटन देशांतील व्यापारास अडचण करूं-
लागला, व ब्रिटिश लोकांची फ्रान्स देशांत जिनगी
होती तीवर जुलूम करणें, व ब्रिटिश लोकांचा इनसा-
फ नकरणें, यांहींकरून ब्रिटन देश आपले ताबेरवाल-
चा असा भाव दाखवूंलागला. तहनाम्यावर सही झा-
ली, हें दोनही राज्यांत कळल्यावर फ्रेंच यांनीं हिंदु-
स्थानांत गलबतें धरलीं होतीं तींही परत देईना.
त्यानें व्यापाराचे कामगार यानांवानें ग्रेटब्रिटन व
अयर्लंड एथें कित्येक फोजेंतील सरदार पाठवून
हल्ला करण्यास उपयोगी माहीतगारी करणें ही दूसरी
मसलत केली.

परंतु माल्टा बेटांतून ब्रिटिश यांनीं निघू-
न जावें या गोष्टीविषयीं बोनापार्ट यानें तंटा आ-
रंभिला. त्यामुळें फ्रेंच व इंग्लिश दरबारांत फार दि-
वस बोलणें चालत होतें, परंतु तें नीट जमेना, म्हणू-
न तारिख ८ माहे मार्च सन १८०३, ते दिवशीं राजा-
नें पार्लमेंट सभेस निरोप पाठविला कीं, सांप्रत
फ्रान्स व हालंड एथें मोठी गलबतांची तयारी चाल-
ली आहे, ती बाहेरचे संस्थानांकरितां असें जरी
सांगतात, तथापि सांप्रत जें बोलणें चाललें आहे त्या

चा इत्यर्थ आजून कांहीं ठरला नाहीं, म्हणून मी विशेष बंदोबस्त केला आहे, व सरकारची अबरू आणि प्रजांचें रक्षण यांस जितका अवश्य दिसेल तितका पुरावा तुम्ही करावा. या निरोपावरून दोनही सभांनीं राजास संमतिपत्रें पाठविलीं, व दुसरे १०००० लोक अरमारांत दिले. मार्च्च महिन्याचे १० वे तारिखेस सभांस दुसरा एक राजाचा निरोप आला, कीं मिलिशिया बोलावून तयारी करण्यास मी हुकूम दिला आहे.

वर सांगितलेंलें तहाचें बोलणें कांहीं वेळपर्यंत चाललें होतें, परंतु शेवटीं बंदोबस्त होण्याचा कांहीं उपाय नाहीं, असें झाल्यावर लार्ड व्हिट्वर्थ, मे महिन्याचे १० वे तारिखेस पारिस शहरांतून निघून आला, व त्याच सुमारें फ्रेंच वकील आंद्रिओसी लंडन शहरांतून गेला. त्याच महिन्याचे १८ वे तारिखेस ब्रिटिश सरकारानें फ्रान्स देशावर फिर्यादी होत्या त्या छापून प्रसिद्ध केल्या, व पुढें लवकरच फ्रेंच गलबतें धरण्याचे हुकुम पार्लमेंट सभेचे संमतानें दिले.

संन १८०३ चे उन्हाळ्यामध्यें अयर्लंड बेटांत शत्रूंस सामील जे लोक होते त्यांनीं वंड उत्पन्न

केलें, तें वर्तमान लढाईचे पूर्वी लिहितों. त्या बंडांत मुख्य एम्मेट, रसल, व डौडाल या नांवाचे विद्वान् परंतु दांडगे व लबाड असे तिघे पुरुष होते. त्यांमध्यें एम्मेट व रसल हे दोघे सन १७९८चे बंडांत होते, व लढाई नंतर सरकारचे परमाणगीवरून देश सोडून फ्रान्स एथें जाऊन राहिले. तेथें ते आपला बंडाचा बेत करून सन १८०२मध्यें परत अयर्लंड एथें येऊन खोटे नांवावर राहिले. तशा स्थितींत त्यांस कित्येक तसेच मूर्ख लोक साथी मिळून त्यांनीं डब्लिन शहरांत टामस स्ट्रीट या नांवाच्या गल्लींतील एक घरांत भाले व दुसरीं हत्यारें जमा केलीं. त्यांनीं आपले साथी मंडळीस लढाईचें काम कांहीं शिकवून त्यांचे घरांत शस्त्रें, व बंदुकीची दारू ठेवून जेव्हां काम लागेल तेव्हां त्यांनीं चाकरीस हजीर व्हावें असें केलें होतें. त्यांचा बेत असा होताकीं डब्लिन एथील किल्ला घ्यावा, लढाऊ शिपाई यांस कैद करावें, व आपणास जे कोणी मिलिशिया यांतील किंवा वालंटीर लोक अटकाव करितील त्यांस ठार मारावें, व डांकेच्या गाडया बंद केल्या म्हणजे लोकांनीं चहूंकडून उठावें. असें करून त्या बंडास जुलै महिन्याचा

२३ वा दिवस नेमिला. त्यादिवशीं प्रहर रात्रीचे सुमारें त्यांनीं बाण जाळून खूण केली, व त्यांचे कोठ्यांचीं दारें उघडतांच एम्मेट, डौडाल, किग्ली, व स्टाफोर्ड हे टामसस्त्रीट या गल्लींत गेले. प्रथम त्यांचे मंडळींत पन्नासांवर लोक नव्हते, परंतु जे येत त्यांस ते भाले देत असत, यामुळें ते लवकर सुमारें पांचशें जमले.

त्या बंडवाल्यांतून कित्येकांनीं तेथील माजिस्त्रेट लार्ड किल् वार्डन यास एके सभेस लबाडीचें बोलावणें पाठविलें होतें. त्यास तें खरें वाटून तो आपली मुलगी व पुतण्या यांस बरोबर घेऊन घराहून, किल्ल्यास येत असतां वाटेनें बंडवाल्यांनीं त्यास व त्याचे पुतण्यास गाडींतून ओढून ठार मारिलें. त्याची मुलगी मात्र कांहीं उपाय करून किल्ल्यास निघून गेली. कर्नल ब्रौन व दुसरे कित्येक आपले पलटणींत जात होते त्यांस धरून तुकडे तुकडे केले, व शिपाई आल्याचे पूर्वीं बहुत लोक त्यांनीं मारिले. शेवटीं एम्मेट, डौडाल, किग्ली, व स्ताफोर्ड हे पळाले; परंतुपुढें लवकरच एम्मेट आणि रसेल यांस धरून चौकशी करून फांशीं दिलें. तें वर्तमान ऐकून

पार्लमेंट सभेनें अयर्लंड एथें हेवियसकार्पस कायदा बंद केला.

पुढें उघड फ्रान्स देशांत ब्रिटन बेट लुटून उद्दस्त करावें अशा बेतानें लोकांस चाकरीस ठेवूं लागले, व पुढील बेतही प्रसिद्ध करूं लागले, म्हणून लढाई करणें सर्व लोकांस जरूर वाटलें.

म्हणून पूर्वींचे लढाई पेक्षां समुद्रांतील फौज दुप्पट असावी व मिलिशिया याचे लोक जमवावे असा हुकूम केला. दुसरी फौज जमवावयाचाही हुकूम केला. त्यामुळें ३०००० लोक अधिक जमले. राज्यांतील लढावयाजोगे लोकांस बोलावणें करून त्यांतून कितिएकांस लढाई करितां तयार करावे, असाही राजास पार्लमेंट सभेनें अखत्यार दिला होता. परंतु लोक आपणाच लढावयास सिद्ध होत चालले, त्यामुळें राजास हा अखत्यार चालविणें जरूर पडलें नाहीं.

प्रथम बोनापार्ट यास आपले पेक्षां ब्रिटिश सरकारचे सामर्थ्य कमी व आपलें अधिक असें वाटलें होतें, परंतु आतां वास्तविक होतें तें त्याचे ध्यानांत आलें. त्यानें तीन हजार लोक समुद्रकांठावर जमवून समुद्रांत पाठवावयास तयार केले होते, पर-

तु बाहेर जाऊने हल्ला करणें हें त्यास कठीण वाटून त्यानें, मोजेनें किंवा कामामुळें जे इंग्लिश लोक फ्रान्स देशांत गेले होते त्यांस धरून कैद केलें; व लढाई चालू झाल्यानंतर पुढें सुमारें दोन महिन्यांनीं ब्रिटिश राजाचा सूड उगवावयाकरितां त्याचें निराश्रित संस्थान हानोवर एथें आपली फौज पाठवून तें लुटीवलें. ही बातमी राजानें मोठ्या धैर्यानें ऐकिली, व एल्ब आणि वीझर या दोन नद्या, जिनोआ, स्पोत्सिआ, व हेवर आणि सेन नदीवरचीं बंदरें वेढण्याचा हुकूम केला. आणि पुढें ब्रिटिश फौजेनें सेंटलुशीया, डोबेगो, डमरेरा, व एसिक्किबो हीं बेटें, बर्बिस एथील संस्थान, व सेंटपियर व मिकिलन हीं दुसरीं बेटें घेतलीं. तसेंच ग्रान्विल बंदर आणि डिएप, बलोन हीं शहरें व किल्ले यांवर कित्येक वेळ हल्ले केले, त्यांतही इंग्लिश यांचा जय झाला, व त्यांनीं शत्रूंचीं कित्येक गलबतेंही घेतलीं.

मागले वर्षीं फ्रान्स देशाचे राज्यांत फेरफार होऊन बोनापार्ट यास वंशपरंपरेनें त्या राज्याचा एंपरर असा किताब मिळून तो राज्य क-

रूं लागला, व त्यानें आपले कुटुंबांतील लोकांस प्रिन्स असा किताब देऊन दरबारांत पूर्ववत् लहान मोठे किताबांचे लोक ठेविले. या फेरफारापासून फ्रेंच लोकांस फार संतोष झाला, व पूर्वींचे सर्व सत्ताक राज्याचें स्मरण कांहीं नराहून बोनापार्ट आपले मर्जी प्रमाणें राज्य करूं लागला.

इंग्लंड देशांत तेव्हां लढाईकरितां नवे जे कर बसविले होते ते लोकांनीं आपले संतोषानें दिले. तेव्हां कांहीं कारणामुळें आडिंग्तन साहेबानें मुख्य प्रधानाची जागा सोडली, व त्या कामावर पिट साहेबास नेमिलें. पुढें आडिंग्तन साहेबास लार्ड सिड्मौथ असा किताब मिळून तो लार्ड सभेंत गेला.

सन १८०४ चे अखेरिचे सुमारें स्पेन एथील दरबारानें ब्रिटिश सरकाराशीं लढण्याची प्रतिज्ञा केली; म्हणून प्रधानांनीं त्यांचीं गलबतें धरण्याचे हुकूम दिले. ही युद्धाची प्रतिज्ञा स्पेन एथील सरकारानें बोनापार्ट याचे भयानें केली. तसेच युरोप खंडांतील जे राजे किंचित् स्वतंत्र होते, त्यांनीं नहांत कांहीं शाश्वतपणा नाहीं असें सम-

जून लढाईची तयारी केली. प्राशिया एथील दरबारानें मात्र आपणास फ्रेंच एंपरर, रशिया एथील दरबाराशीं बोलण्यांत मध्यस्थ करील अशी आशेनें उदासीनपणा धरिला. परंतु ब्रिटिश सरकारास मध्यस्थीस घातल्यावांचून एकटे प्राशिया एथील सरकाराची मध्यस्थी रशिया कबूल करीना. बोनापार्ट यास तें मान्य नव्हतें, तथापि त्यानें सन १८०५चे सप्टंबर महिन्यांत ब्रिटिश राजास तहाचें बोलण्याविषयीं पत्र पाठविलें, त्याचें उत्तर राजाकडून लार्ड मलग्रेव यानें लिहिलें कीं आपले स्नेही राजे यांशीं, व मुख्यत्वें रशिया एथील एंपरर याशीं मसलत केल्यावांचून या सरकाराच्यानें आणखी कांहीं बोलणें बोलवत नाहीं.

त्यावेळेस नवें कांहीं फ्रेंच यांचे लोक इटली देशांत गेले. त्यामुळें भय पावून आस्त्रिया एथील सरकारानें त्याचें कारण विचारिलें, परंतु तें नसांगतां मार्च महिन्यांत बोनापार्ट यानें आपणास इटली देशाचा राजा असें जाहीर केलें; परंतु सांगितलें कीं तेथून बाहेरच्या फौजा निघून गेल्यावर मी तेथील राज्य आपले कुळांतून कोणास तरी देईन. मग मे महि-

त्याचे २६ वे तारिखेस मिलन शहरांत त्यानें मोठ्या स- मारंभानें तेथील मुकुट धारण केला, व जिनोआ आ- पले राज्यास मिळविलें. यामुळें रशिया देशाशीं तह क- रण्याचा कोणताही प्रकार नाहीं असा झाल्यावर तेथें व आस्त्रिया देशांत लढाईची मोठी तयारी करण्या- चा प्रारंभ झाला, व ब्रिटिश सरकारानें जितकी म- दत होईल तितकी करण्याचा करार केला.

आजूनपर्यंत ब्रिटिश सरकार आपलें संरक्षण होण्याकरितां मात्र फौज जमवायाचा उद्योग करीत हो- ते. परंतु त्यांचें अरमार शत्रूंचे बंदरांस वेढे देऊन त्यां- चीं लढाईचीं व व्यापाराचीं गलबतें बहुत धरीत असे. फ्रेंच सरकाराचा ब्रिटन बेटाच्या कांठावर येऊन हल्ला क- रण्याचा बेत होता, आणि एकदां त्यांनीं ब्रिटन बेटा- च्या समोरचे कांठावर तीन लाख फौज जमविली हो- ती, परंतु रशिया व जर्मनी एथील सरकारांशीं तं- ट्या मुळें त्या फौजेंतून बहुत दुसरे ठिकाणीं पाठवि- णें जरूर पडलें, कारण कीं बोनापार्ट याचे अतिश- य लोभामुळें त्यास सर्वत्र शत्रु होते. त्यानें आपले बेत जर्मनी देशांत सिद्धीस नेण्याकरितां जाहीर के- लें कीं जर्मनी याचे संस्थानावर व मुख्य सें बेवे-

रिया, यावर कोणी जुलुम केला असतां मी त्याशीं लढाई करीन. व जे राजे मला मिळून आहेत त्यांचें मी कधीं वाईट करणार नाहीं.

आस्त्रियन लोक या ताकिदींचा तिरस्कार करून स्मारें पंचावन्न हजार फौज घेऊन इन नदी उतरून बवेरियन राज्यांत गेले. रशिया देशांनही तयारी चालिली. आस्त्रिया एथील फौज तीन लाखांवर होती, रशिया देशाची एक लक्ष ऐशीं हजार, व टिरोल एथील मिलिशिया स्मारें वीस हजार इतकी होती. परंतु तीमध्यें बंदोबस्त नव्हता, व तिची तयारी होण्याचे पूर्वीं फ्रेंच लढावयाचे प्रसंग आणीत, त्यामुळें त्या मोठ्या फौजेचा फार मोड होत असे.

फ्रेंच फौज सप्तेंबर महिन्याचे २५ वे व २६ वे तारिखेस तीन टोळ्या करून रैन नदी उतरली, व आस्त्रियन यांस रशियन येऊन मिळण्याचे पूर्वीं त्यांशीं लढून वेर्टिंगन आणि गंगीसबर्ग एथें बहुत लोक मारून त्यांचा पराजय केला. पूर्वीं सांगितलें कीं या लढाईत प्रशिया देशाचे राजानें केवळ उदासीनपणा धरिला होता, तथापि त्या देशाचा एक

प्रांत फ्रांकोनिया यांत जनरल बेर्नाडोट याचे हाताखालची फ्रेंच फौज सुमारें वीस हजार शिरली, आणि प्रशियन सरदार व प्रधान त्याचा जाब पुसूं लागले, तेव्हां फ्रेंच सरदारानें उत्तर केलेंकीं, गरज पडल्यास जबरदस्तीनें जावें असा मला हुकूम आहे.

पूर्वीं आस्त्रियन यांचा पराजय झाला, तो पुरा झाला नव्हता, परंतु आक्टोबर महिन्याचे १३ वे तारिखेस फ्रेंच सरदार मार्शल सूल्ट यानें मेमिंगेन यास वेढा दिला, व तें ठिकाण नऊ पलटणांसुद्धां हस्तगत झालें. १४ वे तारिखेस आस्त्रियन यांनीं अल्म शहरांतून निघून ड्युपों याचे हाताखालचे फ्रेंच फौजेचे टोळीवर हल्ला केला, परंतु त्या टोळीनें त्यांचे पंधराशें लोक धरिले, व त्यांचा मोड केला. पुढें थोडे दिवशीं अल्म शहरावर आस्त्रियन जनरल मांक रखवालदार होता, तें कांहीं संशय होण्याजोग्या गोष्टी घडून फ्रेंच यांचे हस्तगत झालें. आणि या चार लढायांत मिळून आस्त्रियन यांची फौज साठ हजार पडली.

आस्त्रियन व रशियन यांची फौज एकीक-

डे जमत्यामुळें इतकें माव झालेंकीं फ्रेंच यांनीं निक-
राची एक लढाई करून त्यांचा अगदीं मोड केला.
ती लढाई आस्तर्लिट्स एथें डिसेंबर महिन्या-
चे दुसरे तारिखेस झाली. रशियन फौजेंत पन्ना-
स हजार लोक व आस्त्रियन फौजेंत सुमारें पंच-
वीस हजार होते. फ्रेंच फौजेंत सुमारें एक लक्ष हो-
ते. त्या लढाईंत फ्रेंच यांचा जय झाल्यावर उभय
पक्षीं लढाई बंद होण्याचा करार ६ वे तारिखेस ठ-
रला, व तह होऊन त्यावर २६ वे तारिखेस सह्या झा-
ल्या. तो असा कीं, आल्पस डोंगरापलीकडील स-
र्व राज्य फ्रेंच यांनीं चालवावें. तेव्हां जर्मनी देशा-
चा एंपरर यानें बोनोपार्ट इटली देशाचा राजा अ-
सा कबूल केला; परंतु तें राज्य पुढें फ्रेंच राज्यापा-
सून वेगळें असावें. अशा करारानें आस्त्रिया देशा-
चा स्वतंत्रपणा राखण्याविषयीं बोनोपार्ट राजी झा-
ला.

असा बोनापार्ट विजय मिळवून आस्त्रि-
या देशाचे सरकाराकडून मनास येईल तसे करार
करून घेत असतां, ब्रिटिश अरमारानें त्याचा अ-
गदीं पराजय करून त्याचे बेत मोडिले.

त्यावेळेस केडिझ बंदरांत फ्रान्स व स्पेन या दोहोंचीं अरमारें होतीं, त्यांची चौकशी करण्याकरितां, ठेविलेले अरमारावर लार्ड नेल्सन यास सरदार नेमिलें होतें. त्यास आक्टोबर महिन्याचे १९ वे तारिखेस वातमी कळली कीं, तें अरमार बाहेर निघून गेलें. तें मेदितरेनियन समुद्रांत गेलें असेल असें जाणून तो त्यांत जलदीनें शिरला. त्याजवळ गलबतें सत्तावीस होतीं, व त्यांत तीन, चौसष्ट तोफांचीं होतीं सोमवारीं २१ वे तारिखेस शत्रु केपत्रा फाल्गर याजवळ दृष्टीस पडलें. तेव्हां त्यानें आपले गलबतांच्या दोन रांगा केल्या. शत्रूंचे गलबतांमध्यें १८ स्पानिश गलबतें व पंधरा फ्रेंच, अशीं होतीं. फ्रेंच यांचा सरदार आडमरल विलूसनव व स्पानिश सरदार ग्रावीना नामें होता.

दोन प्रहरांनंतर एक वाजतां ब्रिटिश गलबतांनीं शत्रूंच्या रांगा फोडून लढाईस प्रारंभ केला. तींत शत्रूंनीं बहुत पराक्रम केला. परंतु शेवटीं त्यांचा पराजय झाला. संध्याकाळीं तीन वाजावयाचे सुमारें शत्रूंची रांग फुटली. मग आडमरल ग्रावीना दहा गलबतें घेऊन फ्रिगेट यांस मिळून केडिझ शहरा-

कडे निघाला. सगळीं मिळून ब्रिटिश यांस एकुणीस गलबतें सांपडलीं, त्यांवर आड्मरल विल्सनव व दुसरे दोघे आड्मरल होते.

अशा लढाईंत बहुत लोक पडल्यास आश्चर्य नाहीं. परंतु सगळे ४२३ लोक मेले, व ११६४ जखमी झाले. परंतु एक मात्र गोष्ट मोठी वाईट घडली. ती अशी कीं अर्धे लढाईचे सुमारें लार्ड नेल्सन् यास छातीचे डावे बाजूस बंदुकीची गोळी लागली. त्यास खालीं नेतांच दुःख फार होऊन मृत्यूचीं चिन्हें होऊं लागलीं. तथापि तो शुद्धीवर होता; आणि जेव्हां विजय पूर्ण झाला, हें त्यास कळलें तेव्हां संतोषानें ईश्वराचा स्तव करून व हुकूम करावयाचे होते ते स्पष्ट शब्दांनीं करून त्यानें प्राण सोडिला.

ती त्राफाल्गर एथें लढाई झाल्यानंतर पुढें ब्रिटिश सरदार सरस्त्रीर्डस्त्रान एक ऐशीं तोफांचें व तीन चवऱ्याहत्तर तोफांचीं गलबतें घेऊन शत्रूंची वाट सांभाळीत होता. इतक्यांत तितक्याच वजनाचीं व तितकींच फ्रेंच गलबतें राचूफोर एथून निघून येत होतीं, तीं त्यास भेटलीं तेव्हां मोठी लढाई होऊन फ्रेंच गलबतें धरलीं गेलीं. तीं

त्राफल्गर एथून परत आलेल्यांतळीं होतीं, असा सर स्विर्ड यास शोध लागला. पूर्वी स्पेन व फ्रान्स यांचे मिळून तेहतीस गलबतांचें अरमार सांगितलें होतें त्यांत चार मात्र वांचलीं; बाकी सर्व धरिलीं व फुटलीं गेलीं.

या विजयाचें वर्तमान ऐकून इंग्लंड देशांत हर्ष व शोक हे दोनही झाले. हर्ष होण्यास कारण हें कीं आपलें अरमार अजिंक झालें; व शोकास कारण हेंकीं फार शूर व गुणी सरदार तरुण वयांत व आपले उमेदींत मृत्यु पावला. मग त्यास शत्रूंचा पराजय करून जी फार कीर्ति प्राप्त झाली होती ती मागें रहाण्यासाठीं त्याचें शरीर मोठ्या समारंभानें सेंटपाल याचे देवळांत पुरलें.

या खेरीज लोकांस चिंता होण्यास कारण झालें. तें हें कीं फ्रेंच सरकाराचा लोभ फार वाढत चालला यामुळें बाकी जीं स्वतंत्र संस्थानें राहिलीं आहेत तीं लवकरच त्यांस सामील होतील किंवा त्यांचे ताबेखालीं राहूं लागतील असें भय पडलें.

तारीख २१ माहे जान्युआरी सन १८०६ ते दिवशीं पार्लमेंट सभा बसली. तेव्हां राजानें मोठे ह

र्षानें कळविलें कीं अरमानें आलीकडे जो विजय मिळ-
विला, त्यापासून आपली कीर्ति राहिली, आणि सांगितलें
कीं जर्मनी देशचा एंपरर यानें जरी लढाईंतून आ-
पलें आंग काढलें, तथापि रशिया एथील एंपररें आ-
पण धरलेली मसलत कधीं सोडणार नाहीं, असे खा-
तरीचे निरोप सांगून पाठवीत आहे.

पुढें सभांनीं आपलें नेहमीचें काम चालविण्या-
स प्रारंभ केला. इतक्यांत मुख्य प्रधान पिट साहेब
याचे मरणामुळें त्यांत विघ्न झालें. त्या पिट साहेबानें
प्रधानाचें काम, सन १८०१ मध्यें कांहीं दिवस सोडलें
होतें, त्याखेरीज तेवीस वर्षेपर्यंत फार चांगले रीतीनें चा-
लविलें. गोट या नांवाचा रोग झाल्यामुळें व कामाचे
काळजीमुळें त्याची प्रकृति क्षीण होऊन तो जान्युआ-
री महिन्याचे २३ वे तारिखेस आपले वयाचे सत्तेचा
ळिसावे वर्षी मृत्यु पावला. पार्लमेंट सभेनें त्याचें
शरीर समारंभें करून पुरण्याचा व त्याची कबर
बांधण्याचा हुकूम केला.

पिट साहेब मेल्यानंतर लवकरच त्याचे बरो-
बरचे कारभाऱ्यांनीं आपापलीं कामें सोडिलीं. मग कि-
त्येक त्याचे पक्षाचे व कित्येक त्याचे विरुद्ध पक्षाचे गृह-

स्थ कामावर नेमिले. त्यांत लार्ड ग्रान्विल मुख्य प्रधान; फाक्स साहेब, अर्ल स्पेनूसर, व विंढम साहेब. हे सरकारचे सेक्रेतारी, लार्ड हेनरी पेटी, एक्स्चेकर याचा चान्सेलर, ये साहेब. अरमारावर मुख्य, शेरिडन साहेब अरमाराकडील जामदार. अर्ल माइरा तोफखान्याचा कारभारी, अर्ल फित्स विलियम, कौन्सिल यांत मुख्य लार्ड सिडमोथ, प्रिवी मोर्तबाचा धनी, ड्युक बेडफर्ड, अयर्लंड एथील लार्ड लेफ्टेनंट, आणि ओर्स्किन साहेब यास लार्ड अर्स्किन असा किताब देऊन लार्ड हे चान्सेलर अशा नेमणुकी झाल्या.

या प्रधानांनीं पार्लमेंट सभेस जाहीर केलें कीं, प्रशियन राजानें विश्वासाचे बोलण्याचे वेळेस राजाचें हानोवर संस्थान घेतलें, व आपले राज्यांत जीं गलबतें व जिनस येतील तीं बाहेर घालविण्याची प्रतिज्ञा केली. यामुळें तो राजा आपला शत्रु असें समजावें.

जर्मनी एथील संस्थानाचे ऐक्याची पद्धति जी पूर्वीं होती, ती बोनापार्ट यानें फिरवून नवे रीतीचा करार ठरविला, व त्या तहाचा मोटेक्टर म्हणजे रा-

रवणारा असा आपण किताब घेतला; यामुळें दुसरा फ्रान्सिस यास जर्मनी एथील एंपरर हा मोठा किताब सोडणें प्राप्त झालें. व सगळीं संस्थानें एकाचे आज्ञेंत वागत असत तें मोडलें.

अशी युरोप खंडाची स्थिति झाल्यावर बोनापार्ट याचा पराक्रम दुर्निवार झाला. पुढें पुनः एक वेळ तहाचें बोलणें होऊं लागलें. तें मनापासून होतें, असें दिसत होतें, व फाक्स साहेबास लढाई बंद व्हावी अशी इच्छा होती. परंतु ब्रिटिश राज्याची प्रतिष्ठा व संरक्षण यांस योग्य नव्हे इतकें दिल्यावांचून तह होत नाहीं असें झाल्यावर कांहीं दिवस वाट पाहून ब्रिटिश वकील परत आले.

त्या वेळेस फ्रेंच सरकारानें फार जुलूम आणि लबाडी आरंभिली. प्रशिया एथील राजा त्यांशीं फार दिवस स्नेह करून नम्रतेनें वागत होता, त्यासही तिरस्कार येऊन त्यानें प्रतिज्ञा केली कीं पुढें आपलें राज्याचें व अबरूचें रक्षण बाहुबळानेंच करीन.

परंतु यासमयीं त्यानें फ्रेंच सरकाराशीं विरोध आरंभिला, ही शहाणपणाची गोष्ट केली नाहीं; कारण कीं इतके दिवस फ्रेंच यांशीं स्नेह ठेविल्यानें त्याचें

दुसरें कोणतें दरबार स्नेही राहिलें नाहीं, व त्याची फौज फार दिवस रिकामी होती म्हणून लढाईची नवी रीति तिला अगदीं माहीत नव्हती. असें असतांही त्यानें धैर्य करून आकृटोबर महिन्याचे १८ वे तारिखेस जीना एथें लढाई केली, तींत संध्याकाळीं साडेतीन वाजतां फ्रेंच यांचा पूर्ण जय झाला. त्या लढाईत प्रशियन फौज सुमारें नव्वद हजार होती. फ्रेंच यांची त्याचे दुप्पट होती, आणि तिचा सरदार बोनापार्ट स्वतः होता.

पार्लमेंट सभेंत गुलामाचा व्यापार अगदीं बंद व्हावा, याचा विचार सुमारें वीस वर्षांपासून दर बैठकीस होत असे. शेवटीं यावर्षी त्या व्यापारापासून राज्याचि अपकीर्ति, व वेस्ट इंडिया बेटांस त्याची गरज नाहीं असें सर्वांचे मनांत येऊन सन १८०६ च्ये जून महिन्याचे १०वे तारिखेस फाक्स साहेबानें त्या विचाराचा उपक्रम केल्यावर त्यास अनुकूळ संमति ११४, व प्रतिकूळ १५ पडल्या. पुढें थोडे दिवसांत लार्ड सभेंत त्यावर अनुकूळ ४९ व प्रतिकूळ २० पडून तो कायदा ठरला. त्यावर्षीचे सप्तंबर महिन्यांत सेरकारचा सेक्रतारी फाक्स साहेब आपले वयाचे

एकुण साठावे वर्षी मृत्यु पावला. त्याचें शरीर मोठ्या समारंभानें वेस्तमिन्स्तर आबी एथें पुरलें.

यावर्षी पार्लमेंट सभेंत असा विचार निघाला कीं पोप याचे मताचे लोकांस मोठे अबरूच्या जागा देण्याची जी बंदी आहे ती नाहीं अशी करावी. याविषयीं प्रधानांनीं फार मेहनत केली. परंतु राजानें राज्याभिषेकाचे वेळेस जी शपथ घेतली होती, तीप्रमाणें आपण त्या कायद्यास संमति देणें योग्य नाहीं असें जाणून प्रधानास सांगितलें कीं, एकदां हा विचार सोडल्यावर मग पुनः तो विचार कधीं काढूं नये असें वचन द्यावें. तें न देऊन त्यांनीं कामें सोडल्यावर ड्यूक पोर्टलांड यास मुख्य प्रधान, क्यानिंग साहेब लार्ड हाकुस्बरी व लार्ड क्यास्लरे यांस सरकारचे सेक्रेटरी, पर्सिवल साहेब यास एक्स्चेकर याचा चान्सेलर, लार्ड मल्ग्रेव यास अरमाराचा मुख्य, व लार्ड एल्डन यास लार्ड हैचान्सेलर अशा नेमणुकी केल्या.

पुढें कांहीं दिवसपर्यंत पोलंड देशांत बोनापार्ट याचा मोड होण्यास प्रारंभ झाला, परंतु पलूस्तक व ऐला एथील लढायांत त्याचाच जय झाला, डां-

तूझिक लवकरच त्याचे हस्तगत झालें, आणि जून महिन्याचे १४ वे तारिखेस फ्रीडूलंड एथें लढाई झाली, तींत रशियन लोक इतके पडलेकीं त्यांचा एंपरर यानें टिलूसिट या ठिकाणीं युद्ध बंद व्हावें असे करारावर सही केली, व पुढें लवकरच तहाचे मूळ कलमाविषयीं बोलणें होऊं लागलें. प्रशियन राजास त्याचा स्नेही रशिया एथील एंपरर यानें सोडिल्यानंतर, नव्या तहाप्रमाणें त्याचें सुमारें अर्ध राज्य गेलें.

त्यावेळेस रशियन, फ्रेंच आणि तुर्क या दोघांशीं लढाई करीत होते, त्यांचे मदतीसाठीं इंग्लिश सरदार सरजे. टी. डकुवर्थ व सरटी. लुईस हे अरमार घेऊन डार्डू नेलूस समुद्रांतून वाट करून कनूस्तांतिनोपलू शहरास गेले. परंतु इच्छिली गोष्ट सिद्धीस जाण्याविषयीं दहा दिवस यत्न करून त्या ब्रिटिश सरदारांनीं परत जाण्याची मसलत केली.

त्यावेळेस बुएनोस ऐरिस प्रांत ब्रिटिश यांकडून घेतला अशी बातमी आली. त्या मोठ्या संस्थानाचे रक्षणाकरितां फार थोडे लोक ठेविले होते, त्यामुळें जनरल लिमियर्स म्हणून फ्रेंच सर-

दार स्पानिश याचे चाकरीस होता त्यानें तेथील राहणारे लोकांस फितूर करून त्या किल्ल्यावर हल्ला करविला. इतक्यांत गल्ल्यांमध्यें स्पानिश फौज येऊन भरली म्हणून त्या किल्ल्यावरचे लोक तहाचें निशाण लावून तो स्वाधीन करून आपण प्रतिष्ठेनें बाहेर निघून गेले. तो किल्ला पुनः घेण्याचा एकवेळ उद्योग केला, परंतु जनरल वैट्लाक याचे अज्ञानामुळें व भ्याडपणामुळें तो फसला. पुढें तो वैट्लाक इंग्लंड एथें आल्यावर कोर्ट मार्शल यांत त्याची चौकशी होऊन त्यास राजाचे चाकरींतून दूर केलें. परंतु मोंटी विड्यो शहर व तेथील किल्ला कर्नल ब्रौन याचे हाताखालचे सुमारें चार हजार ब्रिटिश लोकांनीं घेतला.

डेन्मार्क एथील दरबारानें ब्रिटिश यांशीं कित्येक ठिकाणीं शत्रुभाव दाखविला, व तेथें अरमार तयार होत होतें, तें बोनापार्ट याचे स्वाधीन होणार असें ऐकून लार्ड ग्यांबियर व अर्ल माकार्ट्नी यांस अरमार देऊन पाठविलें, आणि हुकूम केला कीं आम्ही तुमचा फ्रेंच यांपासून बचाव करितों असें त्यांस वचन द्यावें. तें त्यांनीं कबूल न केल्यास त्यांचें अरमार व सामान वगैरे सर्व घ्यावें. आगसृष्ट महिन्याचे १६ वे तारिखेस फौ-

ज उतरून ब्रिटिश सरदारांनीं हुकुमाप्रमाणें डेन यांशीं बोलणें केलें, परंतु तेंते कबूल करीनात म्हणून तीन अहोरात्र कोपनू हेगन शहरावर तोफांचा भडमार चालविला. त्यापासून शहराचा सर्वस्वीं विध्वंस होतो असें समजून डेन यांनीं लढाई बंद करण्याची विनंति केली, आणि सप्तंबर महिन्याचे ७वे तारिखेस त्यांनीं आपलीं सोळा मोठीं गलबतें, पंधरा फ्रिगेट, सहा ब्रिग व पंचवीस बंदुकांच्या होड्या सामानसुद्धां स्वाधीन केल्या. त्यावेळेस लोकांचे जिनगीस हात लाविला नाहीं व सर्व बंदिवान परत दिले.

टिलूसिट एथें तह झाल्यानंतर लवकरच बोनापार्ट यानें स्पानिश राज्य अगदीं नाहीं असें करण्याची मसलत करून अनेक निमित्तांनीं एक मोठी फ्रेंच फौज स्पेन देशांत पाठविली, त्यानें तेथील राजाकडून तें राज्य सोडवून त्याचा वारिसदार फर्डिनांड यास फौजेजवळून काढून कैद करून फ्रान्स एथें पाठविलें, व आपला भाऊ जोझफ याला स्पेन व इंडीस यांचा राजा असा किताब देऊन त्या ठिकाणीं स्थापिलें.

बोनापार्ट याचे या जुलुमापासून लोकांस

प्रथम भीति वाटली, परंतु पुढें लवकरच त्यांनीं बंड-करून त्यांशीं लढण्याची प्रतिज्ञा केली. मग फ्रेंच फौ-ज त्या देशांत होती तिचा बहुत ठिकाणीं मोड करून जोझफ बोनापार्ट यास फौजेसहित फार जलदी-नें व फजीतीनें पळून जाणें प्राप्त केलें. एक मोठी मुख्य सरकारी सभा करून सातवा फर्डिनंड याचे नांवानें लढाईची प्रतिज्ञा केली, व ग्रेटब्रिटन याशीं तहाची जाहिरात लावून मदत मागण्यासाठीं वकील पाठविले. त्यावरून ब्रिटिश सरकारानें सर डेविड बेर्ड यास अरमार देऊन त्यांचे मदतीस पाठविलें, व पैका शस्त्रें वगैरे यांचा बहुत पुरावा केला.

परंतु बोनापार्ट आपले नेहमीप्रमाणें त्वरेनें बहुत फौज घेऊन स्पेन देशाचे कांठावर आला, आणि कित्येक लढायांत स्पानियर्ड यांचा अगदीं मोड करून त्यांनीं जे किल्ले व शहरें घेतलीं होतीं तीं परत घेऊन राजधानींत मोठ्या समारंभानें शिरला.

पोर्टुगाल एथील वारिसदार राजपुत्रास बोनापार्ट यानें राज्य व आयुष्य हरण करण्याचें भय घातलें, त्यावेळेस तो दक्षिण अमेरिका देशांत

ब्राझिलस एथें गेला होता, त्यानें आपले प्रजांस एक पत्र पाठविलें, त्यावरून पोर्टुगाल देशाचे उत्तरेस लोकांनीं उठून त्या बाजूनें फ्रेंच लोक दांडगाईनें आंत शिरले होते, त्यांस घालवून दिलें. त्यावेळेस पोर्टुगीस यांनीं ब्रिटिश सरकारची मदत मागीतली, म्हणून एक बळकट फौज देऊन सरआर्थर वेलस्ली यास त्यांचे मदतीस पाठविलें. तो पोर्टुगाल देशांत शिरून जनरल जुनो याचे हाताखालचे फौजेवर हल्ला करावयास राजधानीकडे चालला. कित्येक लहान लढाया होऊन त्यांत शत्रूंचा मोड झाल्यावर एक विमिरा याजवळ मोठी लढाई झाली, तींत फ्रेंच यांच्या तेरा तोफा जाऊन व सुमारें तीन हजार लोक मरून व जखमी होऊन ते परत गेले. परंतु दुसरे दिवशीं सरह्युडालूरिंपुल, जिबराल्टर एथील लेफ्टेनंट गवर्नर, पोर्टुगाल एथील ब्रिटिश फौजेचा सरदार पणाचे कामावर नेमणुक होऊन सिंत्रा एथें शत्रु होते त्या ठिकाणीं आला, आणि थोडे वेळानें जुनो यानें तहाचें निशाण देऊन निरोप पाठविला कीं लढाई बंद व्हावी. हा त्याचा निरोप मान्य केला, व तह ठरविला कीं फ्रेंच फौजेनें पोर्टुगाल

देशांतून आवें, परंतु आण्याचा खर्च मात्र ब्रिटिश सरकारानें द्यावा. त्या तहांत एक कलम असें होतें कीं टेगस नदींतील रुशियन आरमारास उपद्रव करूं नये किंवा त्याला तेथून जाऊं द्यावें. परंतु सरसी. काटन यानें तें कलम कबूल केलें नाहीं व पुढें तें आरमार ग्रेटब्रिटन व रुशिया यांमध्यें तह झाल्यावर सहा महिन्यानंतर देण्याचे करारानें त्यांचे स्वाधीन झालें. या तहावरून इंग्लंड एथें राजा व प्रजा यांची फार गैर मर्जी झाली, व लढाई बंद केली हें आणि तह केला हें राजास मान्य झालें नाहीं. असें सर ह्युडालू रिंपल यास सरकारी पत्र पाठविलें. पुढें त्याचे चौकशीकरितां एक कोर्ट नेमिलें, परंतु त्यांस कांहीं लिहिण्याजोगें ठरलें नाहीं.

सन १८०९ त स्पेन देशांतील ब्रिटिश फौजेचा सरदार सरजानमूर त्या राज्याचे मध्यभागापर्यंत जाऊन पोंचला, परंतु फ्रेंच यांची फौज बहुत यामुळें त्यास फार जलदीनें मागें हटावें लागलें. त्यावेळेस त्यानें फार दक्षता व शौर्य हीं प्रगट केलीं, आणि कोरुन्ना एथें जी लढाई झाली, ती मध्यें शत्रूचा अगदीं मोड झाला, व ते जिकडे वाट सांपडली ति

कडे पळाले. परंतु इतकी गोष्ट वाईट झालीकीं त्या लढाईच्या प्रारंभीं तो शूर सरदार पडला.

बोनापार्ट याचा अगदीं पराभव करण्याची केवळ निराशा होत होती, इतक्यांत आस्त्रियन दरबारामें त्याशीं लढावयाची प्रतिज्ञा प्रसिद्ध केली. परंतु त्यानें युक्तीनें त्यांचे टोळ्यांमधून वाट फोडून त्यांचा कित्येक लढायांमध्यें पराभव केला, व विएन्ना शहर घेतलें. त्यास डान्युब नदीचे कांठावर आर्चु ड्युक चार्लिस यानें जबरीनें मागें हटविलें. तथापि वेग्रम एथील लढाईन असा निर्णय झालाकीं, त्यावरून आस्त्रिया एथील एंपरर यानें लढाई बंद व्हावी म्हणून विनंति केली, व आपले तोटयाचे करार मान्य करून तह केला.

असें वर्तमान बाहेर चाललें असतां ब्रिटिश सरकारचे मनांत होतें कीं, आपले स्नेही राजांस मदत करून बोनापार्ट याचा चढाव होऊं देऊं नये. सर आर्थर वेलस्ली फ्रेंच फोजेस पोर्टुगल एथून कडून देऊन आपले मोठे फोजेसहित स्पेन देशांत गेला, आणि तेथें टालाविरा या ठिकाणीं जनरल केसूटा याचे हाता खालीं स्पानिश फोज होती तिला मिळाला.

जुलै महिन्याचे २७ वे तारिखेस लढाई झाली तींत फ्रें-
च यांच्या वीस तोफा व बहुत सामान जाऊन, त्यांचे सु-
मारें दहा हजारांवर लोक मरून व जखमी होऊन,
त्यांस मागें हटावें लागलें. परंतु शत्रु मोठी फौज घे-
ऊन आपणावर पुढून मागून एकदांच हल्ला करणा-
र आहेत अशी बातमी लागल्यामुळें तो टेगस नदी
उतरून परत पोर्तुगल देशांत गेला. त्याप्रसंगीं सर
आर्थर वेलस्ली यानें फार पराक्रम केला, म्हणून
राजानें त्यास लार्ड वेलिंगृतन असा किताब दि-
ला.

आस्त्रियन यांस अधिक मदत व्हावी, व स्के-
लृट नदींत फ्रेंच यांचीं गलबतें होतीं तीं धरून त्यां-
चा नाश करावा, म्हणून पन्नास हजार ब्रिटिश फौज
वाल्करेन बेटावर जाऊन उतरली परंतु फ्लिशिं-
गृ हस्तगत होण्यासच फार वेळ लागला म्हणून श-
त्रूंनीं बहुत फौज जमविली. कित्येक तोफांचे भयंक-
र मोरचे बांधले, व आपलीं गलबतें लिलो किल्ल्या-
चे वरचे बाजूस नदींत गेलीं. ब्रिटिश यांचे उतराव-
याचे ठिकाणीं पूर आला होता. या लढाईचे उद्योगास
बहुत खर्च लागला. परंतु दैव प्रतिकूळ झाल्यामुळें

वाल्करेन बेटावांचून दुसरें कांहीं साध्य झालें नाहीं. तें, स्केल्ड नदीचें तोंड बंद करण्यासाठीं, व हालंड देशांत ब्रिटिश जिनस भेण्याकरितां राखावयाचा बेत होता. परंतु तेथील हवेमुळें फार लोक मरूं लागले, त्यामुळें डिसेंबर् महिन्याचे ९ वे तारिखेस किल्ला, तोफखाना, गोदी वगैरे मोडून तेथून निघून गेले. तशींच फ्रेंच गलबतें ज्या ठिकाणीं गेलीं होतीं त्या ठिकाणांहून त्यांस निघतां नयावें म्हणून सामान भरलेलीं कित्येक गलबतें वाटेघर नदींत पुरलीं.

राजाचा मुलगा ड्युक यार्क याजपाळ फौजेचे मुख्य सेनापतीचें काम होतें, त्यामध्यें त्यानें फौजेंतील कामें योग्यता न पहातां सांगितलीं, असा त्यावर आरोप आला. त्याची चौकशी होऊन कामन्स सभेंत बहुत संमतानें त्याजवळ गुन्हा नाहीं असें ठरलें. तथापि त्यानें आपलें काम सोडिलें, व पुढें त्यावर सरडेविड डंडास यास नेमिलें.

यावर्षी लार्ड ग्यांबियर व लार्ड काक्रेन यांचे हातारवालचे ब्रिटिश अरमारानें बास्क् रोड्स यांत एप्रिल महिन्याचे ११ वे व १२ वे तारिखेस फ्रेंच अरमारावर हल्ला. तेव्हां त्यांतून एकशें वीस तोफांचें

एक गलबत, ७४ तोफांचीं पांच, व दोन फ्रिगेट हीं कांठास लागून फुटावयासारिखीं झालीं. आणि एक ८० तोफांचें, दोन ७४ चीं, व एक पन्नासांचें इतकीं जाळलीं. या खेरीज बाल्टिक समुद्रांत सरजे. सोमारीझ यानें रुशियन अरमार घेतलें, व फ्रेंच यांचीं तीन मोठीं गलबतें, दोन फ्रिगेट, व वीस भाड्याचीं गलबतें लार्ड कालिंगवूड यानें फोडलीं, आणि केएन, मार्टिनिक, इस्किया, व प्रोसिडा हीं बेटें, आणि सेंटडोमिंगो शहर हीं घेतलीं.

असा बाहेर विजय होत असतां राजाचे राज्याचे पन्नासावे वर्षाचा प्रारंभ दिवस आल्यामुळें लोकांस फार उत्साह झाला. लंडुन शहरांत सकाळीं घांटा वाजूं लागल्या, ध्वज उभारले, शिपाई जमा झाले, दोन प्रहरीं ईश्वर भजन झालें, दरिद्री कुटुंबे व गरीब कर्जदार यांचे मुक्ततेसाठीं पैक्याच्या शिपा झाल्या, व रात्रीं सर्व ठिकाणीं दिव्यांचा तमाशा झाला.

सन १८१० चे प्रारंभीं फ्रेंच स्पेन देशांत शिरले ही नवी गोष्ट झाली. जान्युआरी महिन्याचे २९वे तारिखेस ते सेविल शहरापासून सुमारें सहा मैल अं-

तरावर पोंचले. त्यामुळें लोक चहूंकडे पळाले, व बहुत केदिझ शहराचे आश्रयास जाऊन राहिले. परंतु केदिझ शहर शत्रूंचे हल्ल्यावर टिकाव धरील असें समजून तें लोकांचें भय गेलें, आणि तेथें लोकांचे वस्तीप्रमाणें अन्नाचाही पुरावा त्या संकटसमयीं येऊन पोंचला. स्पानिश अरमारावर आडमरल पर्विस यास सरदार नेमिलें होतें, व किल्ल्याचा कारभार आणि संरक्षण हीं तीन प्रकारचे लोकांचे एके जमावाचे स्वाधीन केलीं होतीं. फेब्रुआरी महिन्याचे प्रारंभीं फ्रेंच यांनीं मालेगा एथें शिरून तें दोन दिवसपर्यंत लुटलें. आल्मीडा, आगस्ट महिन्याचे २७वे तारिखेस मासिना याचे हातारवालचे फौजेचे हस्तगत झालें, व फ्रेंच यांचे फार लोभामुळें, व त्यांचा सरदार सूल्ट याचे क्रूरपणामुळें सेविल शहराची अतिशय दुर्दशा झाली. तथापि स्पानियर्ड यांस आपल्या देशाविषयीं प्रीति होती म्हणून त्यांचा कांहीं ठिकाणीं जय होत असे. तशाच पोर्टुगाल देशाविषयीं फ्रेंच यांनीं जरी अभिमानानें मोठमोठ्या प्रतिज्ञा केल्या होत्या, तथापि लिस्बन शहर ब्रिटिश फौजेचे आश्रयाखालीं सुरक्षित राहिलें, व त्यांचा गर्विष्ठ सर-

दार मासिना यास बुसेको एथील लढाईनंतर लार्ड वेलिंग्तन याचे पुढून हटून जावें लागलें.

स्पेन आणि पोर्टुगल या देशांत असें वर्तमान असतां, लुईस बोनापार्ट फ्रेंच राजाचा भाऊ यानें हालंड देशांतील लोकांची स्थिति चांगली होण्याविषयीं व्यर्थ यत्न करून तें राज्य सोडल्याची जाहिरात लाविली. मग तो देश बोनापार्ट याचे हुकुमावरून फ्रान्स एथील राज्यास मिळविला. बोनापार्ट यानें एप्रिल महिन्याचे पहिले तारिखेस जोसफीन आपली बायको इला सोडून आर्चडचेस मारिया लुइझा इशीं लग्न केलें.

त्यावेळेस जानगेल जोन्स, म्हणून एके लोकांचे मंडळीचा मुख्य होता, त्यानें चिटयांवर हा प्रश्न लिहून प्रसिद्ध केला कीं, वालक्रेन एथील लढाईचा विचार परकीय लोकांनीं कामन्स सभेंत येऊन ऐकूं नये हा हुकूम यार्क साहेबानें मुकरर करविला, हें किंवा विंदम साहेबानें सांप्रत छापाची स्वतंत्रता नाहीं अशी होण्याचा उद्योग केला हें लोकांनीं अधिक निंदा करावयास योग्य ? या अपराधाकरितां जोन्स यास बंदीस ठेविलें. ही गोष्ट अयोग्य केली असें

मार्च महिन्याचे १२ वे तारिखेस पार्लमेंट सभेंत सर फ्रान्सिस बर्डेट या नांवाचे एके सभासदानें म्हटलें, आणि त्यास मोकळें करण्याचा हुकूम व्हावा म्हणून बोलला, परंतु तें त्याचें बोलणें अधिक संमतानें रद्द झालें, म्हणून त्यानें त्याविषयीं आपणास नेमणारे प्रांतांतील लोकांस एक पत्र लिहून तें वर्तमान पत्राचे द्वारें प्रसिद्ध केलें, ही गोष्ट त्यानें पार्लमेंट सभेचे कायद्याबाहेर केली असें लेथ्ब्रीज साहेबाचे म्हणण्यावर ठरून त्यास किल्ल्यावर बंदीस ठेवावें, असा सर आर साल्सबरी याचे म्हणण्यावर ३७ अधिक संमति पडून हुकूम झाला. तारिख ६ एप्रिल ते दिवशीं त्यास धरावयास सर्जेंट गेला, त्यास मी जबरीनें आपणास धरूं देणार नाहीं असें त्यानें सांगितल्यावर त्याचे घरासभोंवते लोक जमले, व अनेक प्रकारच्या दांडगाया करूं लागले, व सरकारचे अपमानाचे शब्द बोलले, आणि दगड व विटा मारूं लागले. नंतर घोडेस्वारांनीं त्यांवर घोडे घालून त्यांस पळविलें. त्या गर्दींत बहुत दुखविले, परंतु त्यांत तिघांस मात्र मोठ्या जखमा लागल्या. पुनः लोकांचा जमाव झाला तो घोडेस्वारांनीं हातांत तरवारी घेऊन पळविल्यानंतर, ते चहूंकडे तोफा ठेवून ९

वे तारिखेस त्याचे घरांत स्वयंपाकघराचे खिडकींतून शिरले, आणि त्यास धरून किल्ल्यावर नेलें. ते शिपाई येतेवेळेस लोकांनीं त्यांवर भडमार केला. म्हणून ते गोळ्या मारीत परत आले. वाटेनें त्या गोळ्यांनीं तीन असामी मेले. जून महिन्याचे २१ वे तारिखेस पार्लमेंट सभा उठली. तेव्हां त्यास किल्ल्यावरून मोकळें केलें. त्यास घरीं नेण्याकरितां त्याचे मित्रांनीं बहुत समारंभ केला होता; परंतु तो सर्व कबूल नकरून तो एकटा चोरून विंबूल्डन एथें आपले घरीं गेला.

मे महिन्याचे ३१ वे तारिखेस सेंट जेम्स वाड्यांत राजाचा मुलगा ड्युक कंबर्लंड यास त्याचे खोलींत त्याचा चाकर सालिस या नांवाचा होता, त्यानें अडीज प्रहर रात्रीस मारावयाचा उद्योग केला. परंतु सिद्दीस गेला नाहीं, म्हणून त्यानें भिऊन पळून आपण मारून घेतलें. ड्युक यास जखमा लागल्या असतांही कांहीं दिवसांनीं अगदीं बरा झाल्यामुळें लोकांस बहुत संतोष झाला.

दुसरा एक सन १८१० चे वर्षी राजाचे कुटुंबांत अनर्थ झाला. राजाची धाकटी मुलगी एमिलिया फार दुखणेकारी होती, व तिला वांचावयाची आशा न-

ह्ती, म्हणून बापास कांहीं तरी आपले हातची वस्त घावी असें तिच्या मनांत आलें, नंतर तिनें एक आंगठी करवून ती भेटीचे वेळेस आपले बापाचे हातांत प्रीतीनें घालून, माझें स्मरण धरा” असें बोलली. परंतु या दुःखानें राजाचे शरीराची व्याधि वाढली, व त्यास बुद्धिभ्रंश झाल्यामुळें पार्लमेंट सभेस कामकारभार चालविण्याची तजवीज करणें जरूर पडलें. मग ती राजकन्या नवेंबर महिन्याचे २ रे तारिखेस मृत्यु पावली, व तिचें शरीर विंड्सर एथें पुरलें.

कांहीं दिवस गेल्यावर सन १८११ चे प्रारंभीं दोनही सभांमध्यें विचार ठरला कीं, राजाचा मुलगा प्रिन्स वेल्स यानें राजा दुखणेकरी आहे तंवपर्यंत त्याचे ठिकाणीं रिजेंट या किताबानें कारभार चालवावा, परंतु एक वर्षपर्यंत लार्ड वगैरे किताब नवे देऊं नयेत, आणि राजपुत्र जीं कामें व बैठे पगार देईल, ते त्याचा कारभार संपल्यावर राजानें काईम न केल्यास बंद व्हावे, आणि राजाचे शरीराची खबरदारी राणीनें करावी.

तारिख ६ माहे फेब्रुआरी सन १८११ ते दिवशीं प्रिन्स वेल्स यानें रीजंट या कामाच्या शपथा घ्या-

व्या असें ठरलें. त्याप्रमाणें क्रमारें अडीज प्रहर दिवसास सर्व ड्युक व प्रिविकौन्सिलर, क्यार्लटन होस एथें मिळाले. नंतर राजपुत्र आपले प्रधान बरोबर घेऊन मोठ्या समारंभानें बसावयाचे ठिकाणीं गेला. तेथें फार शोभा केली होती, व मोठे मोठे अरमारांतील सरदारांच्या तसबिरी ठेविल्या होत्या. तेथें तो राजपुत्र मध्यें बसला, व त्याचा भाऊ आणि चुलतभाऊ आपापले मोठेपणाप्रमाणें डावे व उजवे बाजूस, आणि जे प्रिविकौन्सिलर मक्षते ते खोलीचे दाराजवळ बसले. नंतर राजपुत्रानें या अर्थानें भाषण केलें.

" लार्ड साहेब, मला कळलें कीं मला रीजंट ज्या पार्लमेंट सभेच्या कायद्यानें नेमिलें, त्याप्रमाणें मला कांहीं शपथा घेतल्या पाहिजेत, व कांहीं प्रतिज्ञा केली पाहिजे. तर त्यास मी तयार आहें."

नंतर लार्ड प्रिविसील यानें बहुमानानें राजपुत्राजवळ जाऊन एके चामड्यावरून पुढें लिहिलेलें वाचलें, व राजपुत्रानें तें ऐकावयास येण्याजोगे स्वरानें त्याचे मागून म्हटलें.

"मी मनापासून वचन देतों, शपथ घेतों कीं मी विश्वासानें राजाजवळ स्नेहभाव ठेवीन. मला ईश्वर स-

हाय होऊ."

"मी मनापासून वचन देतों, व शपथ घेतोंकीं, मी ग्रेटब्रिटन व अयर्लंड या राज्यांतील रीजंट याचें काम वास्तवीकपणानें, इमानानें, व तृतीय जार्ज राजाचे राज्याचे एकावन्नावे वर्षी कायदा झाला आहे, त्याप्रमाणें चालवीन. त्या कायद्यानें माझे जवळ दिलेला अखत्यार मी इनसाफाप्रमाणें चालवीन, व सर्व प्रसंगीं माझें सामर्थ्य व बुद्धि खर्च करून राजाची प्रतिष्ठा, व थोरपणा, आणि त्याचे प्रजाचें कल्याण करीन. मला ईश्वर सहाय होऊ."

या शपथांवर सही झाल्यावर लार्ड प्रेसिडेंट यानें द्वितीय चार्लिस राजाचे राज्यांत दोनही पार्लमेंट सभांत पेपिस्त यांस बसण्याचा अखत्यार नाहीं असें करून राजाचें शरीर व राज्य यांचा बंदोबस्त चांगला होण्यासाठीं कायदा झाला होता, त्यांतील प्रतिज्ञा वाचून दाखविली, तीही राजपुत्रानें म्हटली व सही केली, नंतर त्या दोनही दस्तोऐवजांवर लार्ड प्रेसिडेंट व प्रिविकौन्सिलर यांनीं साक्षी घालून ते दफ्तरदाराकडे दिले.

नंतर लार्ड प्रेसिडेंट, राजाचे कुटुंबांतील ड्यु-

क, क्यांतर्बरी एथील आर्चबिशप, व इतर सर्व लोकांनीं अनुक्रमाप्रमाणें राजपुत्राजवळ जाऊन त्याचे हाताचें चुंबन केलें. नंतर थोडके वेळपर्यंत दरबार होऊन रीजंट यानें मंडळीजवळ भाषण केलें; पुढें मुख्य प्रधान व एक्स्चेकर याचा चान्सेलर पर्सिवल साहेब यानें भेट घेऊन त्याच्या हाताचें चुंबन केलें.

फेब्रुआरी महिन्याचे १२वे तारिखेस पार्लमेंट सभेचा प्रारंभ करण्यासाठीं कित्येक कामगार नेमून सभेचा प्रारंभ झाला. त्यावेळेस रीजंट नेमण्याची गरज पडावयाजोगी राज्याची स्थिति झाली ही गोष्ट वाईट झाली; समुद्रांत व जमिनीवर ब्रिटिश फौजेनें बहुत पराक्रम केले; पोर्टुगल देशांत व केदिझ शहरांत शत्रूंची मसलत फसली, व ब्रिटिश यांचा शूरपणा पाहून आपले स्नेही राजांची फौज यत्न करीत आहे, या गोष्टी सांगितल्या; आणि दुसरेंही सांगितलेंकीं अमेरिका देशाशीं सांप्रत बोलणें चाललें आहे तें स्नेहभावानें संपवावें असें रीजंट याचे मनांत आहे. आणि सरकारास जितकी गरज लागेल तितका पुरावा पार्लमेंट सभेनें करावा असा भरंवसा आहे. या भाषणावर योग्य उत्तर द्यावें असें कामन्स सभेंत मिलून्स् साहेबांचे बोल-

ण्यावरून ठरलें.

जून महिन्याचे १९ वे तारिखेस राजपुत्र रीजंट यानें आपले बापाचे जन्मदिवशीं एक मोठी मेजवानी केली. तींत सर्वांनीं स्वदेशांत केलेलीं वस्त्रें पोषाक करून यावें असा हुकुम केला, कारणकीं कांहीं दिवसांपासून राजाचे दुखण्यामुळें कारागीर लोकांचा जिनस खपेना असें झालें होतें. त्या मेजवानीसाठीं अतिशय मोठा समारंभ केला होता, व बहुत मोठ मोठे गृहस्थ व बायका, सरकारी कामगार, बाहेरचे दरबारचे वकील, शहरांतील पहिले प्रतीचे व मध्यम प्रतीचे लोक हे सर्व होते. ती मेजवानी व गाणें आणि नाचणें प्रहर रात्रीपासून सूर्योदयपर्यंत झाली, व तिचे साठीं केलेला समारंभ लोकांस पहाण्यासाठीं कित्येक दिवसपर्यंत ठेविला होता.

कामन्स सभेंत फेब्रुआरी महिन्याचे २१ वे तारिखेस एक्स्चेकर याचा चान्सेलर यानें सांगितलेंकीं रीजंट नेमण्याविषयींचे कायद्याचा विचार चालला असतां १२ किंवा १३ हजार पौंडपर्यंत रीजंट यास घरगुती खर्चाबद्दल नेमणूक असावी, असा विचार मी काढणार असें सभेस कळवून मी तो बेत राजपुत्रा-

स कळविला; परंतु त्यानें सांगितलें कीं लोकांवर कर ब हुत झाले आहेत, त्यास आणखी नवे मी आपले उपयो‑ गा करितां वाढविणार नाहीं. पर्सिवल साहेबानें दुसरें म्हटलें कीं, लोकांवर फार कर बसूं नयेत असा विचार करून राजपुत्रानें नेमणुक नको म्हटली असें त्याचे स्व भावावरून ध्यानास येतें, व या त्याचे विचारापासून त्या‑ स जितकी शोभा आहे, तितकी किती राजासारिखा डौ ल केला तरी येणार नाहीं.

या बैठकींत तीन कायदे मोठे ठरले. एक थो डके कर्जासाठीं लोकांस उगीच बंदींत ठेवावें तें बंद करण्यासाठीं; दुसरा ब्रिटिश व ऐरिश मिलिशिया यांचें काम लागल्यास आपले देशांतून बदल करावा; व तिसरा असा कीं गिनी, अर्ध गिनी व सात शिलिंग याचें नाणें ही अनुक्रमानें २१ शिलिंग १०½ शिलिंग व ७ शिलिंग यांपेक्षां अधिक किमतीनें घेऊं नये, व बांक याच्या चिठ्या कमी किमतीनें घेऊं नये. जुलै महिन्याचे २४ वे तारिखेस पार्लमेंट सभेची बैठक नवेंबर महिन्याचे १२ वे तारखेपर्यंत बंद असावी असा हुकूम झाला. व त्या दिवशीं पुनः हुकूम झाला कीं पुढले जान्युआरी महिन्याचे ७ वे तारिखेपर्यंत ती

आणिखी बंद असावी.

बाहेर देशांत स्यानियर्ड व पोर्तुगीस आणि त्यांचे क्रूर शत्रु यांचे लढायांत उभयपक्षींचे जय पराजय झाले, परंतु साधारण एक गोष्ट अशीकीं. ब्रिटिश फौज लढाईंत आली म्हणजे बोनापार्ट याच्या पलटणींचा अजिंकपणा नाहीं असा होई, आणि कित्येक विजय असे झालेकीं, त्याची विस्मृती ब्रिटिश यांस व स्यानियर्ड आणि पोर्तुगीस यांस कधीं पडली नाहीं.

बारोसा एथें मार्च महिन्याचे ५वे तारिखेस ब्रिटिश व फ्रेंच यांमध्यें लढाई झाली, तींत ब्रिटिश लोक कमी असतां व दुसऱ्या फार अडचणी असतां ही सुमारें दीड तासाचे आंत सर्व फ्रेंच फौज पळून गेली. त्या लढाईंत फ्रेंच यांचे मेले, जखमी वगैरे मिळून एकंदर तीन हजार लोक नाहीं असे झाले, त्यांचें निशाण आणि सहा तोफा विजयी फौजेचे हातीं लागल्या, आणि जनरल रफिन, रोसे व बेलगार्ड कैद झाले. त्यांतून पहिला जखमी होता व दुसरा लढाइनंतर लवकरच मेला. या लढाईंत इंग्लिश यांचा सरदार जनरल ग्राहाम होता.

ही वरची लढाई होण्याचे पूर्वी बेत झाला हो-

ताकीं, तेव्हांच सर आरकीटस यानें केडिझ एथील समुद्रांत फ्रेंच यांवर हल्ला करावा, परंतु तो हल्ला वाऱ्यामुळें न होऊन दुसरे दिवशीं झाला. तेव्हां रोटा एथून सेंट मेरीझ पर्यंत समुद्राचे पूर्वेकडील सर्व मोरचे एका वांचून अकस्मात् घेतले.

दुसरी लढाई जून महिन्याचे सोळावे तारिखेस आलबुहिरा एथें मार्शाल स्लट आणि सरविलियम बर्स्फोर्ड या दोघे सरदारांमध्यें झाली, तींतही ब्रिटिश यांचा जय झाला. पूर्वीं बातमी होती कीं स्लट, सेविल शहराचा बंदोबस्त करून आपले रक्षणाचे उद्योगांत आहे, परंतु १२वे तारिखेस बातमी आलीकीं तो तेथून निघून इस्त्रिमादुरा प्रांतावर आला आहे. हें ऐकून सरविलियम बेर्स् फोर्ड बाडाहोस एथील वेढा कांहीं माणूस न गमावतां उठवून, आपली फौज जमवून १५वे तारिखेस जनरल क्यास्तेनोस, व ब्लेक यांस जाऊन मिळाला. दुसरे दिवशीं त्यावर शत्रूंनीं हल्ला केला, आणि त्यांचे स्वार बहुत व तोफखाना मोठा होता, म्हणून त्याचा जय होईल असें वाटत होतें, परंतु ब्रिटिश फौजेचे शौर्यामुळें त्यादिवसाचा विजय यांकडे

फिरला, आणि १७वे तारिखेचे रात्रीस फ्रेंच यांचे लष्करांत पळ सुटला, व त्यांचे सुमारें २००० लोक मेले, व ९००पासून १०००पर्यंत धरिले गेले. इकडेही तसेच बहुत पडले, परंतु सरविलियम बेर्सफोर्ड यानें लार्ड वेलिंग्तन यास पत्र पाठविलें त्यांत लिहिलें आहेकीं, " सर्व लोकांनीं आपणास जें योग्य तें केलें, व आमचे लोक ७ आणि मुख्यत्वें ५७वी पळटण यांतून जे मेले, त्यांच्या लढाईप्रमाणें रांगा पडल्या होत्या, आणि त्यांस जखमा पुढले आंगानें लागल्या होत्या." याखेरीज पर्सिवल साहेबानें कामन्स सभेंत गोष्टी सांगितल्या, त्याही वाचणारांचे संतोषाकरितां पुढें लिहिल्या आहेत. लढाईचे भरांत टामुसन या नांवाचा कोणी एन्सैन यास त्याचे हातांतील निशाण दे असें शत्रूंचे फौजेंत कोणी म्हटलें, तेव्हां त्यानें उत्तर केलेंकीं मी हें आपले जीवा बरोबर देईन, आणि असें म्हणून तो पडला. दुसरा वाल्श या नांवाचा एक एनसैन फार जखमा लागून पडल्यावर त्यानें निशाणाचा फडका फाडून तो आपले छातींत खोंचला, तो मेल्यानंतर तसाच सांपडला. सरविलियम बेर्सफोर्ड यावरही एके पोलिश स्वारानें हल्ला

केला, त्यास सरविलियम यानें घोड्यावरून खालीं ओढलें, तथापि तो त्यास मारावयास उद्युक्त झाला. त्यास शेवटीं एके स्वारानें मारिलें.

दुसरीं बाहेर देशांत वर्तमानें बहुत घडलीं, परंतु त्यांत हांशील गोष्ट इतकीकीं लार्ड वेलिंग्तन याची वर्तणुक मसलतीची व शहाणपणाची, आणि ब्रिटिश सरदार व त्यांचे स्नेही स्पानिश व पोर्तुगीस यांमध्यें एक मत होतें. म्हणून फ्रेंच यांच्यानें बंडाचा बंदोबस्त लागलाच करण्याची प्रतिज्ञा सिद्धीस गेली नाहीं, आणि जसजशी शत्रूंची कीर्ति कमी होत चालली, तसतसी स्पेन व पोर्तुगल एथें आपले पक्षाची उमेद वाढत चालली.

समुद्रामध्यें सन १८११ चे वर्षी जे विजय झाले, त्यांत लिसा बेटाजवळ फ्रेंच व इटालियन अरमाराचा मोड झाला, व बांडा आणि टर्नेट हीं बेटें आणि जावा बेटाची राजधानी बटेविया हीं हस्तगत झालीं, तें वर्तमान लिहितों.

वर लिहिलेलीं फ्रेंच वगैरे गलबतें लहान मोठीं मिळून अकरा होतीं, त्या सगळ्यांवर २७२ तोफा आणि २६५५ माणसें होतीं. त्यांशीं व ब्रिटिश राजाचीं

गलबतें चार, ज्यांवर तोफा १२४ व ८७७९ माणसें होतीं, त्यांशीं लढावयाचा प्रसंग आला. मार्च महिन्याचे १३वे तारिखेस लिसा बेटाचे उत्तरेकडे शत्रूंचें अरमार दृष्टीस पडलें, आणि पुढील गलबतांवर ब्रिटिश गलबतांनीं तोफा मारून सकाळीं लढाईस प्रारंभ झाला. ती लढाई मोठी होऊन संध्याकाळचे प्रहर दिवसास फ्रेंच यांचीं दोन गलबतें ४४ तोफांचीं व एक ३२ तोफांचें अशीं तीन ब्रिटिश यांचे हस्तगत झालीं. बाकीचीं वाट सांपडेल तिकडे गेलीं.

बांडा बेटावर आगस्ट महिन्याचे ८ वे तारिखेचे रात्रीस काळोखांत खलाशी, गलबतांवरचे शिपाई व क्यापटन कोल्स याचे हाताखालचे मद्रास एथील गोरे लोकांचे पळटणींतून सुमारें चाळीस, असे मिळून सुमारें दोनशें लोकांनीं हल्ला करून तें घेतलें.

तिसरें टेर्नेट बेट याचे किल्ले जरी मजबूद होते, आणि पहिले लढाईचे वेळेस जरी इंग्लिश यांशीं त्यानें स्मरण रहाण्याजोगा टिकाव धरिला होता, तथापि इंग्लिश यांची फौज थोडी असतांही तें एके दिवसांत माहे आगस्ट तारिख २९ ते दिवशीं

हस्तगत झालें.

ववथें जावा एथील राजधानी शहर बटेवि-या तें आगस्ट महिन्यांत लेफ्टेनंट जनरल सर साम्यु अल आर्कुस्युटी याचे हाताखालचे ब्रिटिश फौजेनें घेतलें, शत्रूंचे फार भयंकर किल्ले घेतले, व त्यांस बांटम आणि जोकभ्रा या राज्यांतून काढून दिलें. नंतर तें ब्रिटिश राज्याकडे चालूं लागलें.

अशीं सर्व देशांत राज्यें मिळत असतां ब्रिटिश राजाचें एक गलबत व अमेरिकन सरकारचें एक गलबत या दोघांमध्यें एक कळागत होऊन त्या दोन सरकारांमध्यें लढाई होण्याचें भय पडलें. त्या कळागतीचें कारण लिट्ल् बेलट गलबतावरील क्याप्टन बिंगम यानें असें लिहिलें आहे. मे महिन्याचे १६ वे तारिखेस दोन प्रहरांनंतर साडेतीन वाजतां, पूर्वीं एक परकी गलबत दिसलें होतें त्याचा बेत लढाई करण्याचा दिसला, कारणकीं मी खूण केली, तिचें त्यानें उत्तर दिलें नाहीं. साडेसाहा वाजतां तें गलबत आम्हाजवळ फार येऊं लागलें, असें पाहून मी विचार केला कीं गैर समजूत न व्हावी म्हणून आपण जवळ जाऊन निशाणें लावावीं, म्हणून आम्ही कोण आहों हें त्यांचे

दृष्टीस पडावें. म्हणून त्याजवळ जाऊन निशाणें लाविलीं. आणि कदाचित् अकस्मात् हल्ला करितील म्हणून तोफांत दोन दोन गोळे भरून लढाईचीही तयारी केली. तें गलबत हाक ऐकावयाइतकें जवळ आल्यावर मी, कोणचें गलबत, म्हणून विचारिलें. त्यानें माझेच शब्द पुनः म्हटले. मी फिरून हाक मारिली, आणि त्यानें फिरून माझ्या सारिखेंच विचारिलें, आणि तोफ मारिली. मी लागलीच उलटून मारिली. नंतर सुमारें पाऊण तासपर्यंत लढाई चालली, पुढें त्यानें तोफा मारावयाचें बंद केलें, आणि त्याचे गलबतामध्यें विस्तव पेटला असें दृष्टीस पडलें. तेव्हां त्यानें मला विचारिलें कीं, हें गलबत कोणतें. तें मी सांगून त्यास तसेंच पुसलें. त्यानें उत्तर केलें कीं, "युनैटड् स्टेट्स् फ्रिगेट."

दुसरे दिवशीं तें गलबत पुनः जवळ येऊन, एके होडीवर त्यावरच्या एके सरदाराबरोबर कमोडोर राजर्स याचा निरोप आला कीं, गोष्ट फार वाईट झाली म्हणून मी दिलगीर आहें, आणि तुमचे लोक इतके थोडे आहेत असें जर मला कळलें असतें तर मी तोफ मारिली नसती. मी त्यास तोफ मारावयाचें पुढीं कारण कोणतें म्हणून पुसलें, तेव्हां त्यानें उत्तर केलें-

कीं तुम्ही अगोदर तोफ मारली, परंतु खचित गोष्ट अशी घडली नाहीं. त्यानें सांगितलेंकीं, तुम्हास जी मदत पाहिजे असेलती मी करीन, आणि मसलत सांगितली कीं तुम्ही एखादे युनेटेड् स्टेट्स एथील बंदरांत जावें, परंतु ही त्याची गोष्ट मी लागलीच कबूल केली नाहीं. क्षमा मागण्याचे त्याचे रीतीवरून माझा स्पष्ट निश्चय झालाकीं, जर एकादें ब्रिटिश फ्रिगेट त्याला भेटलें असतें, तर त्यानें खचित लढाई केली असती.

क्यापूटन बिंगम यानें अशे प्रकारचें त्या कलागतीचें वर्तमान लिहिलें आहे. आणि त्याविषयीं संशय नाहीं. परंतु कमोडोर राजर्स यानें म्हटलेंकीं लिट्ल् बेल्ट गलबतानें प्रथम तोफ मारिली, व तसा अमेरिकन निशाणाचा अपमान झाला, त्याचा सूड उगविणें मला भास झालें, आणि त्यानें आपले मनास येतील ते शायदी आणून हें पुरवून ही दिलें.

सन १८११ चे वर्षी दुसरी मोठी गोष्टही घडली कीं, ममेलूक लोक इजिप्त देशांत नाहीं असें झालें.

ते ममेलूकलोक इजिप्त देश आपला असें समजून तुर्कस्थानचे बादशाहाचा हुकूम जबर-

दस्तीवांचून मानीत नसत. जनरल फ्रेझर याचे हा-ताखालची ब्रिटिश फौज इजिप्त देशांत गेली, तेव्हां ते महमद अली बादशाह याशीं उघड लढाई करीत होते. परंतु ब्रिटिश फौज आल्याची बातमी ऐकून ममेलूक हे तसे भयंकर नव्हत, असें समजून महंमद अली यानें त्यांशीं तह केला, आणि त्या तहांत एक कलम लिहि-लें कीं त्यांचे सर्व फौजेनें येऊन कैरो शहराजवळ रहावें. हा करार त्यांतून बहुतांनीं मान्य करून ते कैरो शहरा-जवळ गीझे एथें नैल नदीचे पलीकडील काठावर शा-यमबे याचे हाताखालीं इजिप्त देशाचे वरचे बाजूस राहिले.

त्यावेळेस वाहाबी या नांवाचे लोक मका व मेदि-ना हीं शहरें घेऊन जलदीनें चढून येऊं लागले, त्यामुळें तुर्कस्थान याचे सरकारास फार भय वाटलें. डामास्क-स एथील बादशाह युसफ याच्यानें त्यांस हटविण्या-चें काम होईना, म्हणून आकर शहरचा बादशाह स-लिमान यास हुकूम आला कीं युसफ याचें डोकें हुजूर पाठवावें, व डामास्कस एथील बादशाहत आपण करा-वी; परंतु युसफ कैरो शहरास जाऊन महंमद अली बादशाहाचा आश्रय करून आपले शत्रूंपासून सुटला.

पुढें डामास्कस एथील बादशाहाच्यानेंही त्या धर्मबाह्य लोकांचा बंदोबस्त होईना असें पाहून महंमद अल्ली बादशाह यास त्याच्या बंदोबस्ताविषयीं हुकूम केला; आणि तें काम बजावल्यास आकर व डामास्कस या दोन ठिकाणच्या बादशाहती देण्याचें कबूल केलें, तें आकर एथील बादशाहास कळतांच त्यानें ममेलूक लोकांशीं मिळून महंमद अल्लीचा मुलगा मेका शहरावर फौज घेऊन जाईल तेव्हां बाकीचे लोकांवर हल्ला करून त्याचा सूड उगवावा असा बेत केला. परंतु सियामबे याचे चाकरानें आपले धन्याशीं दगाबाजी करून केरो एथील बे व वरील इजिप्त देशांतील बे आणि आकर एथील सलिमान यांचे कागदपत्राच्या सर्व नकला बादशाहास पाठविल्या. त्यांवरून तें सर्व वर्तमान महंमद अल्ली यास कळलें, तें त्यानें तुर्कस्थानचे सरकारास कळवून तेथून हुकूम आल्यावर बंड लागलेंच मोडण्याची मसलत केली.

महंमद अल्ली सुएझ एथून केरो शहरास आल्यावर त्यानें मेका शहरावर पाठविण्याचे पूर्वीं आपले मुलग्यास सेनापतीचा अधिकार मार्च माहिन्याचे १ले तारिखेस देणार, असें जाहीर करून त्या समारंभा-

चे मेजवानीस सर्व ममेलूक लोकांस आमंत्रण केलें. नंतर पुढें पायदळ, मध्यें घोड्यावर बसलेले ममेलूक लोक, मागें सियामबे व बादशाहाचे दोन मुलगे, आणि सर्वांचे मागें तुर्कस्थान याचे स्वार असा तो समारंभ कैरो शहरांतील लहान रस्त्यांतून किल्ल्यांत जावयास निघाला. नंतर पायदळ किल्ल्यांत पोंचलें, व ममेलूक लोक त्याचे आंतले व बाहेरचे तटांचे मध्यें, दोनही बाजूंस उंच भिंती व जुन्या इमारती अशा अरुंद वाटेनें चालत होते, इतक्यांत वाटेचे दोनही शेवटांकडील दरवाजे लाविले. बादशाहानें त्याक्षणापर्यंत आपला बेत कोणास सांगितला नव्हता; आणि जरी त्याचे दोन मुलगे ममेलूक लोकांत होते, तरी आपले पायदळास भिंतीवर चढून त्यांवर बंदुकांचा मार करण्याचा हुकूम केला.

तेव्हां ममेलूक लोकांची अवस्था फार कठीण झाली. ते अरुंद जागेंत कोंडले गेले त्यामुळें त्यांचें, तरवार मारण्याचें कसब व्यर्थ झालें, आपलेच लोकांची अडचण होऊं लागली, मेजवानीचे पोषाकांचें ओझें झालें, आणि बळकट फौजेचा दोनही बाजूंनीं हल्ला येऊन पडला. अशांत ते कांहीं पराक्रम करून स्वाधीन झा-

ले. नंतर आंतले बाजूचे दरवाजाची दिंडी उघडून त्यां-
तून एकएकास तुर्क यांनीं आंत आढून घेतलें आणि
किल्लयांत नेऊन प्रथम त्यांचीं वस्त्रें काढून घेऊन मग
त्यांचा शिरच्छेद केला. त्या आठशें लोकांतून एकही
वांचला नाहीं, आणि एके महिन्यांत दुसरे आठशें
ममेलूक यांस जवळचे शहरांत व खेडयांत धरून
ठार मारिलें. इजिप्त देशाचे वरील प्रांतांत बाकीचे बे
होते त्यां नीं आठशें ममेलूक मिळवून नैल नदीचे
कठीण प्रवाहांवर बहुत शिदी व आरब घेऊन रा-
हिले; परंतु बहुत शिपायांनीं जाऊन त्यांचा अगदीं
नाश केला. ते लोक सालादिन याचे दिवसांपासून ते-
व्हांपर्यंत जय पराजय मिळवून होते, ते शेवटीं असे
नाश पावले.

सन १८१२ चे प्रारंभीं राजा दुखण्यांतून बरा
होण्याविषयीं निराशा झाली, आणि राजपुत्राचे कारभा-
राविषयीं जे प्रतिबंध केले होते ते संपल्यावर लोकांस
चिंता उत्पन्न झाली कीं, तो प्रधानांत अगदीं फेरफार
करील परंतु त्यानें आपला भाऊ डयुक यार्क यास
एक पत्र पाठविलें. त्यांत लिहिलें कीं मला कोणाचे सू-
ड उगवावयाचे नाहींत, किंवा कांहीं अर्थ साधावयाचे

नाहीं न. इतकें खरें कीं आपण ल्हानपणीं त्यांबरोब-
र वाढलों त्यांनून कित्येक आपले कारभारांत असावे अशी इच्छा
त्यानें सूचविली, परंतु लार्ड ग्रे आणि ग्रान्विल यां
ची कित्येक कामगारांशीं मिळून कारभार करण्याची
इच्छा नाहीं, असें समजून त्यानें त्यांस तसेंच काईम ठे-
विलें.

पुढें मुख्य प्रधान पर्सिवल साहेब मे महिन्या-
चे ११ वे तारिखेस संध्याकाळीं ५ वाजतां कामन्स सभेचे
वाड्यांत जात असतां, बेलिंगम म्हणून दारांत कोणीएक बस-
ला होता, त्यानें एक पिस्तलाची गोळी मारली ती त्याचे
छातीचे डावे बाजूस लागली. नंतर तो पर्सिवल साहेब
कांहीं अस्पष्ट शब्द बोलत थोडीं पावलें जात असतां तों-
डघशीं पडला. त्या साहेबास लागलेंच सभेचे मुख्याचे
खोलींत नेलें, परंतु तेथें पोंचण्याचे पूर्वीं त्याचा प्राण
गेला. तें पाहून सर्वांचे मनांत अतिशय भीति उत्पन्न
झाली, आणि पुढें काय करावें तें सूचेना. अशा संधीस
तो मारेकरी कोणास नकळतां पळून गेला असता, परंतु
विचारपूर्वक त्यानें तेथें बसून तें क्रूर कर्म आपण के-
लें ही गोष्ट कबूल केली. त्याचे चौकशीचे शेवटीं, त्यास
काय बोलावयाचें असल्यास बोल म्हणून सांगितलें,

तेव्हां त्यानें उत्तर केलें कीं मी झालेली गोष्ट कबूल करितो, परंतु तें करण्याचें कारण सांगण्याची माझी इच्छा आहे. सरकारानें मजवर जुलूम झाला, त्याची दाद दिली नाहीं, मी कोण व कसा आहें, हें त्या मर्वांस सरकार वा सेक्रतारी व बेकेट साहेब, ज्यांशीं माझी बहुत वेळ गांठ पडली आहे, त्यांचे द्वारें ठाऊक आहे. रुशिया एथील कोणी एक गवर्नर जनरल यानें आर्कएंजल एथुन रेगा शहरास पत्र पाठविलें. त्यांत मजवर अगदीं खोटा आरोप लिहिला, व दाद मागितली ती मिळाली नाहीं. मी फार हतभाग्य आहें; (आणि हृदयावर हात ठेवून म्हणाला,) मी जें केलं तें योग्य केलें. अशी खातरी एथें पुरती आहे.

पंधरावे तारिखेस त्याची चोकशी झाली. तेव्हां बुद्धिभ्रंशाचें निमित्त त्याचे वकीलानें सांगितलें असतांही त्यानें कबूल केलें नाहीं. शेवटीं तो अपराधी ठरून त्यास १८ वे तारिखेस फांशी दिलें; तेव्हांही त्याचें चित्त अतिशय स्वस्थ आणि निर्विकार होतें.

रीजंट याचे निरोपावरून पर्सिवल साहेबाचे मुलांस ५०००० पोंड द्यावे, व बायकोस दर वर्षास २००० पोंड नेमणुक असें पार्लमेंट सभेनें ठरविलें.

व त्याचे बायकोचे मागें तिची नेमणूक पार्सिवल्स साहेबाचा कोणी वारिसदार असेल त्यास जन्मवर पोंचावी असा हुकूम केला.

पुढें लार्ड लिवर्पूल मुख्य प्रधान, लार्ड सिड्मोथ स्वराज्याचा सेक्रेतारी, अर्ल हारोबी, कौन्सिल याचा मुख्य आणि वान्सिटर्ट साहेब एक्स्चेकर याचा चान्सेलर अशा नेमणुकी झाल्या

यावर्षी नाटिंगमशैर आणि चेशैर व लांकाशैर एथील कापुसाचे कारखान्यांतील हलके लोकांनीं जमाव करून अनेकप्रकारचीं बंडें केलीं, व त्यांपासून लोकांचे मनांत भय पडलें; परंतु त्यांतून कित्येकांस धरून फांशीं दिल्यावर सर्वत्र निर्भय झालें.

बाहिरदेशांत लार्ड वेलिंग्टन यानें जान्युआरी महिन्याचे आटवे तारिखेस कुइडाड रोड्रिगो शहरास घेरा घातला; आणि विसावे तारिखेस सीमेवरचें तें मोठें शहर त्याचे हस्तगत झालें; त्याठिकाणीं रखवालदार सरदारांखेरीज १७०० लोक होते, आणि त्या विजयापासून १५३ तोफा व बहुत लढाऊ सामान मिळालें. हा विजय पाहून कृतज्ञतेनें स्पानियर्ड्ज यांनीं त्यांस ड्युक कुइडाड रोड्रिगो असा किताब दिला. नंतर शूर वेलिंग्टन त्या किल्ल्याचे तट नीट करून व तेथें

रखवालीकरितां एक स्पानिश सरदार ठेवून आपण तेथून निघून मार्च महिन्याचे १५वे तारिखेस ग्वाडियाना नदीचे दोनही बाजूंनीं बाडाओझ यास वेढा दिला. बहुतवेळ मोठमोठे तोफांचे भडमार झाल्यावर शेवटीं दोन बुरुजांतून वाटा केल्या. पुढें एप्रिल महिन्याचे ६वे तारिखेस रात्रीं एकदांच बहुत ठिकाणीं हल्ला केला, आणि प्रथम किल्ल्यावर चढाव झाला. परंतु शत्रूंनीं इतका टिकाव धरिला आणि खंदकापाठीमागून इतकीं विघ्नें केलीं, कीं शेवटीं हल्ला करणारांस मागें हटावें लागलें, परंतु किल्ला साध्य झाल्यामुळें शहर आपाप हस्तगत झालें, तेथें हल्ल्याचे प्रारंभीं पांच हजार लोक होते, परंतु त्यांतून हल्ल्याचे गडबडींत बाराशें मेले व जखमी झाले.

बाडाहोस एथील लोकांस मदत करण्यासाठीं मार्मो, कुइडाड रोद्रिगो एथें जाऊन त्यास वेढा घालून राहिला, आणि त्याच वेळीं सूलट सेविल शहराहून विला फ्रांका यापर्यंत इस्त्रे माडुरा प्रांतांत आला, परंतु बाडाहोझ शत्रूंचे स्वाधीन झालें ऐकून तो परत स्पेन देशाचे हद्दीवर गेला. सूलट परत गेला अशी वातमी येतांच आपले हाता-

खालची एकत्र मिळालेली फौज घेऊन वेलिंग्‌तन क्यास्तेल प्रांताकडे चालला, आणि जुलै महिन्याचे १२ वे तारिखेस अगुएडा नदी उतरून १० वे तारिखेस सालामांका याचे समोर आला. कित्येक लढाया झाल्या, त्यांत सर टामस ग्रेम याचें शौर्य प्रगट झाल्यावर उभयपक्षींच्या फौजा समोरासमोर येऊं लागल्या. नंतर बाविसावे तारिखेस दोन प्रहरांनंतर संधि चालली पाहून वेलिंग्‌तन यानें शत्रूंचे डावे बाजूनें व समोरून एकदांच दोन हल्ले केले, ते दोनही सिद्धीस गेले. शत्रूंनीं ही मोठ्या शौर्यानें टिकाव धरिला, परंतु रात्र होण्याचे संधीस ते पळूं लागले, व ते दिसत होते तंवपर्यंत इकडले लोक त्यांचे पाठीस लागले. दिवस उगवतांच पुनः त्यांचे पाठीस लागले. अशी सालामांका एथें लढाई होऊन अकरा तोफा, कित्येक सामानांचीं गाडीं व आठ निशाणें हस्तगत झालीं, आणि बंदिवान धरिले त्यांत एक जनरल तीन कर्नल, तीन लेफ्टेनंट कर्नल, एकशें तीस सरदार व सहा हजारांपासून सात हजारांपर्यंत शिपाई होते. मार्शल मार्मों ही फार जखमी झाला, आणि चार जनरल मेले.

या विजयापासून फ्रेंच यांनीं फार दिवस के-

द्रिझ शहरास वेढा दिला होता तो उठविला. आणि लार्ड वेलिंतन याचे वर्तणुकीची अशी कीर्ति झाली कीं, त्यास स्पानिश फौजेचा कमांडर इनचीफ म्हणजे सेनापति असा किताब दिला.

युरोप खंडांत असें वर्तमान असतां इंग्लंड व अमेरिका या दोन देशांमध्यें तंटा होता तो तह करून मिटविण्याकरितां बहुत बोलणें होऊन शेवटीं लढाई करावी असें ठरलें.

अमेरिकन फौजेनें क्यानडा प्रांत घेण्याचा उद्योग केला, परंतु सर्व प्रथमचे लढायांत त्यांचा पराजय झाला. आगस्ट महिन्यांत ब्रिटिश यांनीं डिट्रोआ किल्ला घेतला, व तेथील जनरल हल्ल आपले फौजेसुद्धां शत्रूंचे स्वाधीन होऊन कैद झाला.

जनरल हल्ल ज्याचे स्वाधीन झाला होता तो मेजर जनरल ब्रूक, आकटोबर महिन्याचे १३ वे तारिखेस क्विनूस टौन एथें नियागरा प्रांताचे सीमेवर लढाईत पडला, परंतु त्यानंतर ज्यावर ब्रिटिश फौजेचे सरदारपणाचें काम पडलें तो मेजर जनरल शीफ यानें शत्रूंचा अगदीं मोड केला, आणि जनरल वाड्स्वर्थ नऊशें लोकां-

सहित त्याचे स्वाधीन झाला.

परंतु समुद्रांत अमेरिकन यांचा अधिकजय झाला. त्यांनीं सप्तंबर महिन्यापासून डिसेंबर पावेतों तीन ब्रिटिश गलबतें धरिलीं. तथापि त्या ब्रिटिश गलबतांनीं इतकी लढाई केली कीं, त्यांतून दोन हस्तगत होतांच त्यांनीं लागलींच जाळलीं, व तिसरें अगदीं निरुपयोगी झालें होतें.

सन १८१२ मध्यें दुसरी मोठी लढाई युरोप खंडाचे उत्तरेस झाली. तिचें वर्तमान असें.

नेदर्लंड एथील स्वारींतून परत आल्यावर बोनापार्ट यानें रशिया देशाशीं एक मोठी लढाई करून तंटा नाहीं असा करण्याचे बेतानें स्वीडन राज्यांतील पोमिरेनिया प्रांतांत जाण्याची मसलत केली, आणि वीस हजार शिपाई देऊन जनरल फ्रयां यास तेथें पाठविलें, तो फेब्रुआरी महिन्यामध्यें त्या प्रांतांत गेला, आणि पुढले ऋतूचे प्रारंभीं फ्रेंच फौज रैन एथील कानू फेडरेशनचे याचे फौजेशीं मिळून पोलंड देशाकडे चालली. मे महिन्याचे ९ वे तारिखेस बोनापार्ट आपली बायको व प्रिन्स आफ नुफशाटेल यांस समागमें घेऊन

पारिस शहराहून १६ वे तारिखेस ड्रेसडन एथें आला. तेथें त्याची व आस्त्रिया एथील एंपरर व त्याची राणी यांची भेट झाली. त्या वेळेस रशियन एंपरर आलेकुझांडर विल्ना एथें आला होता, व पश्चिमेकडील पहिले फौजेचा मुख्य सरदार बार्कैडी टोली, हाही होता. जून महिन्याचे ११ वे तारिखेस डावूस्त यानें कानिंग्सबर्ग मुख्य ठिकाण करून तो तेथें राहिला, तेथें त्यास बोनापार्ट येऊन मिळाल्यावर तो विजय मिळवीत स्मोलेन्स्को एथें येऊन पोंचला. त्या शहरावर मोठे निकराची लढाई होऊन तें शहर फ्रेंच यांनीं घेतल्यावर रशियन लोक ती जागा फार करून जाळून मोस्को शहराजवळ गेले, आणि जातांनां वाटेनें बहुतकरून सर्व त्यांनीं जाळलें. सप्तेंबर महिन्याचे ७ वे तारिखेस त्यांवर बोरोडिनो डोंगरावर फ्रेंच यांनीं हल्ला केला, आणि मोठी लढाई होऊन रशियन यांचा मोड झाला. नंतर मोस्को शहराचे समारें तीन चतुर्थांश जाळून रशियन तेथून निघून गेल्यावर बोनापार्ट १४ वे तारिखेस त्यांत शिरला, तेव्हां त्याचे हुकुमावरून जाळणारे म्हणून तीनशें माण-

मांस धरून गोळ्यांनीं मारिलें. तथापि रशियन फौ-
ज त्या शहराचे जवळ तळ देऊन शत्रूंस कांहीं सामान
पोंचूंनये असें करीत होती, आणि आक्टोबर महि-
न्याचे १८ वे तारिखेस मूरा याचे टोळीवर हल्ला
करून तिचा कांहीं मोड केला.

थंडीचे दिवसांमध्यें मोस्को शहरांत रहाणें
फार अशक्य असें समजून फ्रेंच तें सोडून निघाले.
नंतर २२वे तारिखेस रशियन त्यांत पुनः शिरले.
पुढें पळण्यामध्यें फ्रेंच यांची फार विपत्ति झाली.
बोनापार्ट यानें कालुगा याचे वाटेनें जाण्याचा बेत
केला होता, परंतु रशियन जनरल कुटुसोफ
यानें बंदोबस्त केला होता, त्यामुळें ती वाट सोडणें
भाग झालें.

नवेंबर महिन्याचे ९ वे तारिखेस स्मोलेन्
स्को एथें त्यानें मुख्य तळ दिला, परंतु १३ वे तारिखेस तेथी-
ल तटबंदी उडवून टाकण्याचें काम मार्शल नेय याज-
कडे देऊन तेथून निघाला. १६ वे व १७ वे तारिखे-
स डावुस्त आणि ने हे दोघेही सरदार नीपर न-
दीचे कांठीं क्रसूना याजवळ पराभव पावले. बो-
नापार्ट ; ब्रिसिनो नदी उतरून विल्ना याकडे चा-

लला, आणि डिसेंबर महिन्याचे ५वे तारिखेस वि-पत्तींत पडलेली आपली फौज सोडून व फौजेचा सरदारपणा मूरा यास देऊन गुप्त वेषानें पारिस शहरास चालला. त्या स्वारींत फ्रेंच यांस राशियन यांनीं बहुत दुःख दिलें, व हवा फार थंड यामुळें तीस हजारांवर घोडे मेले असें बोनापार्ट यानें कबूल केलें, आणि साहाशें स्वार आपले रखवालीस करावयाकरितां ज्या सरदारांचे घोडे जीवंत होते असे सरदार त्यास जमवावे लागले, आणि त्या टोळींत जनरल यांस क्यापूतन यांचें, व कर्नल यांस ल्हान सरदारांचें काम चालविणें जरूर पडलें.

बोनापार्ट फ्रान्स देशांत नसतां आकूटोबर महिन्याचे २३वे तारिखेस पूर्वींचे कामावरून दूर झालेले तिघे सरदार मालेट, लिहोरी आणि गिलाड यांनीं तो मेला अशी खोटी बातमी उठवून सर्व शिपाई व कामगार यांस आपले हुकुमाखालीं वागण्याचे हुकूम केले. मुख्य प्रधान वगैरे जे कोणी ऐकेनात त्यांस कैद केलें, आणि जनरल हूलिं पारिस एथील कमांडांट*

---

* शहरचा बंदोवस्त करणारा सरदार.

यास गोळी मारिली; परंतु शेवटीं ते धरिले गेले, आणि त्यांची लबाडी असें कळून शिपायांनीं आपलीं शस्त्रें ठेविलीं; आणि ते सुमारें वीस लहान मोठे सरदार, बतीन पूर्वीचे जनरल यांस कैद करून त्यांची चौकशी करून ते तीन जनरल व दुसरे सुमारें अका यांस फांशीं दिलें, व बाकीच्यांस सोडिलें.

फ्रेंच यांची रशिया देशांत विपत्ति झाली ती मुळें जनरल ड्यार्क याचे हाताखालची प्रशियन फौज त्याचा पक्ष सोडून कौंट विट्गेन्स्टेन् यास मिळाली; व त्या मिलाफापासून शेवटीं प्रुशिया एथील राजा व रशियन एंपरर या दोघांमध्यें तह झाला.

तारिख १४ माहे जान्युआरी सन १८१३ ते दिवशीं राजपुत्र रीजंट यास त्याची बायको वेल्स एथील प्रिन्सेस इनें पत्र लिहिलें कीं. माझे मुलीशीं माझे व्यवहारास प्रतिबंध केला यामुळें माझे अबरूस बट्टा लागला. या पत्राचें उत्तर आलें नाहीं असें पाहून तिनें तें वर्तमानपत्रांत छापून प्रसिद्ध केलें; कारणकीं तसें न केल्यास आपण तो आरोप कबूल केला असें लोकांस वाटेल, असें तिचे मनांत आलें

पुढें त्या गोष्टीचा विचार राजपुत्रानें प्रिवि कौन्सिल यांतील कित्येक लोकांस सांगितला; आणि त्यांनीं ही कांहीं दिवसपर्यंत प्रतिबंध असावा ही गोष्ट बरी दिसते असें सांगितल्यावर, त्याचे बायकोनें त्यागोष्टीविषयीं स्पीकर याचे द्वारें कामन्स सभेंत फिर्याद केली. सभेनें ती गोष्ट फार नाजूक जाणून तींत मन घातलें नाहीं, परंतु प्रिन्सेस इचेकडे कांहीं अपराध नाहीं अशीं बोलणीं मात्र उघड झालीं. त्यावरून लंडन शहरांतील आल्डरमान, मेयर इत्यादि लोकांनीं केन् सिंग्टन पालेस एथें तिला स्तुतिपत्र दिलें, व सर्व लोक तिचा पक्ष खरा असें म्हणूं लागले.

रशियन फौज श्रमापासून हुशार झाल्यावर प्रुशियन फौजेशीं मिळून चांगले ठिकाणीं तळ देऊन राहिली. तिचे मदतीस बर्नाडोट यानें ही स्वीड लोकांची मोठी फौज द्यावयाचें कबूल केलें होतें. इकडे बोनापार्ट यानेंही तयारी करून आपली बायको लुइझा इला राज्याचा कारभार सांगून व आपले मागें रूम शहराचे राजानें राज्य करावें असें ठरवून तो एप्रिल महिन्याचे १५ वे तारिखेस पारिस

तून आपले फौजेस मिळावयास गेला. कित्येक लढायांमध्यें जमलेले फौजेचा जय झाला, परंतु बोनापार्ट याची फौज फार त्यामुळें त्यांस मागें हटावें लागलें. लुनिन्बर्ग एथें एप्रिल महिन्याचे दुसरे तारिखेस लढाई झाली, तींत फ्रेंच यांचा अगदीं मोड झाला, त्यांचा एकही माणूस सुटला नाहीं, तीन हजारांस कैद केलें, व तीन निशाणें आणि बारा तोफा घेतल्या. त्याच दिवशीं प्रुशियन जनरल वानबार्स्तेल यांस मागूडीबर्ग एथें पाठविलें होतें तेथें त्याचा पराजय झाला, परंतु त्यास जनरल विट्गेन्स्तैन हा येऊन मिळाल्यावर फ्रेंच यांचे दोन हजार लोक मेले व जखमी झाले, आणि सुमारें एक हजार कैद करून त्यांचा मोड झाला.

मे महिन्याचे दुसरे तारिखेस लुट्झिन् एथें एक लढाई झाली. तींत फ्रेंच यांकडे स्वतः बोनापार्ट आणि दुसरे फौजेचा जनरल विंझिंजिरोड होता. त्या लढाईंत विसांपासून तीस हजार लोक पडले, व विजय आपणाकडचा झाला असें उभयपक्षीं मानिलें. पुढें कित्येक लढाया झाल्या, त्या सर्वांत मिळून उभयपक्षाचे सांगण्याप्रमाणें चाळी-

स हजार लोकांत कमी पडले नाहींत. जून महिन्याचे १ ले तारिखेस आस्ट्रिया एथील एंपरर याचे सांगण्यावरून लढाई बंद झाली, आणि ४ थे तारिखेस लढाई बंद होण्याचा करार होऊन तो जुलै महिन्याचे २० वे तारिखेपर्यंत रहावा असें केलें. तो पुढें आगस्ट महिन्याचे मध्यापर्यंत चालावा असें केलें, परंतु बोनापार्ट यास अभिमान व अविचार फार, त्यामुळें तहाची कोणती मसलत चालत नसे; आणि शेवटीं त्याचे सासऱ्यानेंही आपली फौज त्याचे शत्रूंचे फौजेस मिळविली.

आगस्ट महिन्याचे १७ वे तारिखेस पुनः लढाया चालू झाल्या, आणि बोनापार्ट बोहिमिया देशाचे राजधानीवर लागलाच हल्ला करण्याच्या बेतांत होता, परंतु ब्रेसला एथून रशियन व प्रशियन फौजेनें सिलिशिया एथील आपले लोकांवर हल्ला केला, असें ऐकून त्यानें तेथें जाऊन २१ वे तारिखेस तेथून शत्रूंस बाहेर काढून दिलें. हें झाल्यावर लागलीच त्यास बातमी आलीकीं, शत्रू आपणास एल्ब नदी वरून काढून देण्याकरितां ड्रेसडन शहरावर हल्ला करणार आहेत हें त्यास कळलें ते-

व्हां तो ड्रेस्डन शहराहून १२० मैल अंतरावर असतांही तो मोठी फौज घेऊन चार दिवसांत येऊन तेथें पोंचला. पुढें २६ वे तारिखेस मोठे निकराची लढाई झाली, परंतु शेवटीं फौजांचे जमावास पळून जावें लागलें, आणि मोरो म्हणून कोणी एक युरोप खंडास जुलुमापासून सोडवावया करितां आला होता, त्यास एक गोळा लागून तो मेला.

सप्टेंबर महिन्यांत बोनापार्ट यानें फौजेचे जमावावर कित्येक हल्ले केले, परंतु त्याचा आतां विजय होईना असें झालें. ड्रेस्डन एथील लढाईनंतर जनरल वांडाम यास धरून कैद केलें. ने आणि उडिनो यांचा स्वीडन एथील राजानें मोड केला, आणि पुढें काय करावें हें बोनापार्ट यास सुचेना, कारणकीं तो बोहिमिया एथील मोठ्या फौजेशीं लढाई करीत असतां सिलिशिया एथील फौज ड्रेस्डन शहरावर चढून गेली, आणि तो त्या सिलिशियन फौजेवर येतांच मोठी फौज परत आली.

शेवटीं फौजांचा जमाव वाढून आपले लश्कराचे पिछाडीवर हल्ला करितो, आणि आपला पुरावा

बंद झाला असें पाहून बोनापार्ट आक्टोबर महिन्याचे ७वे तारिखेस ड्रेस्डन एथून निघून लैप्सिक एथें चालला. त्यानें शहरांत रखवाली लोक ठेविले, व साक्सनी एथील राजा त्यास सोडून जमावांत मिळाला, व तीनही फौजा बोनापार्ट यावर चालत्या झाल्या.

त्या महिन्याचे १६वे तारिखेस मार्शलने याची ब्लुकर याशीं गांठ पडून त्याचा मोड झाला, त्याच दिवशीं लैप्सिक याजवळ मोठे फौजेचे मध्यावर बोनापार्ट यानें जबरदस्त हल्ला केला, परंतु त्याचा जय झाला नाहीं. नंतर त्या तीनही फौजांचा परस्पर करार ठरून १८ वे तारिखेस एक मोठी लढाई झाली; तींत बोनापार्ट याचा बहुत नाश झाला, आणि शत्रु शहरांत शिरण्याचे पूर्वी दोन तास तो मोठ्या संकटानें कैद करण्याचें चुकवून निघून गेला. मग फौजेचा जमाव मोठ्या समारंभानें शहरांत गेला; साक्सनी एथील दरबारास कैद केलें; आणि चार लाख फौज लढाईच्या प्रारंभीं होती, तींतून नब्बद हजार रैन नदी उतरून संरक्षितपणें परत गेली, तेव्हां जर्मनी एथील लहान राज्यें मोठे जमावास

मिळूं लागली, रैन एथील कनूफेडरेशन अगदीं मोडून गेलें, पूर्वींची रीति बंद झाली, व ज्यां किल्ल्यांवर फ्रेंच फौज रखवालीस होती ते एका मागून एक स्वाधीन झाले.

फ्रेंच फौज तेथें नसतां हालंड देशांतील राज्यांत लोकांनीं फेरफार केला. फ्रेंच याचे ताबेदार आपण त्यांत आपली फार अपकीर्ति व व्यापाराची खराबी आहे, असें समजून द्वेषानें फेब्रुआरी महिन्याचे सुमारें एक बंड झालें होतें, परंतु त्या बंडांतील लोकांचें शासन झालें, त्यामुळें तें प्रारंभींच मोडलें. शेवटीं फौजांचा जमाव हालंड देशाचे सीमेजवळ येऊं लागला, तेव्हां आमस्तर्डम शहरचे लोक जमून "आरेंजबोवन" असें म्हणत, आरेंज निशाणें घेऊन त्या कीर्तिवंत कुटुंबाचा राज्याधिकार प्रसिद्ध केला, लोकांनीं द्वेषानें फ्रेंच यांच्या जकातीच्या चौक्या, व त्यांचीं तीन गलबतें जाळलीं, व एक कामगारास ठार मारिलें. याप्रमाणेंच पुढें हालंड देशांतील सर्व मुख्य शहरांनीं केलें, व नवेंबर महिन्याचे २१ वे तारिखेस प्रिन्स आफ आरेंज यास आपणास मदतीस बोलावयाकरितां लंडन शह-

रांत वकील आले. ब्रिटिश राजाचे प्रधानांनीही त्यांस जितकी मदत होईल तितकी करण्याची मसलत ठरविली. पुढें त्या महिन्याचे ३० वे तारिखेस प्रिन्स आफ आरेंज, स्किवलिंग एथें जाऊन तेथून पुढें हेग शहरास गेला, तेथें त्यानें लोकांचे प्रार्थनेवरून पूर्वीचा सुटाट् होलडुर किताब सोडून नेदर्लंड एथील राजा असा किताब धरून राज्यकारभार चालवावयास आरंभ केला.

एप्रिल महिन्याचे ११वे तारिखेस डान फर्नांडो मिलर्स याचे हाताखालचे स्पानिश फौजेचे टोळीवर रूषे यानें हल्ला करून तीस हटवून विलेना एथील किल्ला घेतला, त्यावर रूमारें दोन हजार लोक रखवाळी होते. दुसरे दिवशीं फ्रेंच यांनीं जनरल मरे याचे हाताखालचे फौजांचे जमावावर हल्ला केला, परंतु तो रात्र होईतोंपर्यंत दर पाऊल राखीत राखीत शेवटीं मागें फिरला. १३वे तारिखेस फ्रेंच यांचा मोड होऊन ते विलेना यास व तेथून फुएंटला हिगेरा एथें गेले. नंतर आलिक्यांट एथें कांहीं वेळपर्यंत निरुद्योगी राहून सरजान मरे यानें आपले लोक एक स्पानिश टोळी व तोफखाना गलबतांवर चढवून ४थे

तारिखेस तेरा हजार पायदळ व कांहीं स्वारांसहित तो टारानोगा याचे शेजारीं पोंचला. ७वे तारिखेस एक मोठें मजबूद ठिकाण फोर्टसान फिलिप, लफ्टेनंट कर्नल प्रिवोस्त यांचे हातारवालचे एके टोळीने हस्तगत झालें, परंतु १२वे तारिखेस रूष आपणावर येतो अशी बातमी ऐकून सरजान मरे मोठ्या त्वरेनें आपल्या तोफाही नघेतां वेढा उठवून निघून गेला.

जून महिन्याचे २रे तारिखेस कर्नेल पांट याशीं व शत्रूंचे पिछाडीशीं स्वारांची लढाई झाली. तेव्हां लार्ड वेलिंगृतन डुरो नदीचे कांठावर टोर्स एथें होता. त्यानें दुसरे दिवशीं जनरल हिल याचे हातारवालची आपले लश्कराची उजवी बाजू डुरो नदीचे पलीकडे उतरविली, आणि जनरल गेरने याचे हातारवालची ग्यालिशियन फौज आपले डावे बाजूचें लश्कर जनरल ग्रेम याचे हातारवाली होतें, त्यास मिळविली. फ्रेंच यांचें पार्तुगल एथील व उत्तरेकडील जमलेलें लश्कर यास मार्शल जुर्डो याचे हातारवालची मध्यदेशची फौज मिळून इब्रो नदीकडे चालले; परंतु जनरल ग्रेम ती उतरून त्याची बाजू सांपडे अशो ठिकाणीं तळ देऊन राहिला. १८

वे तारिखेस एके फ्रेंच टोळीनें ओस्मा एथें जनरल ग्रेम यावर व दुसरीनें सेंटमिलन एथें बारन डाल्टन यावर हल्ला केला, परंतु दोनही टोळ्यांचा मोड झाला.

१९वे तारिखेस फ्रेंच यांची पिछाडी विटोरिया एथें मागें हटविली, आणि २१वे तारिखेस एक मोठी लढाई झाली. तीमध्यें जोझफ बोनापार्ट व मार्शल जुर्डा हे असतांही त्यांचा अगदीं मोड होऊन त्यांस आपल्या सर्व तोफा, दाणा, बुणगें व गुरें हें सर्व टाकून पळून जावें लागलें. एकशें एकावन्न तोफा, व चारशें पेक्षा सामानाचीं गाडीं लढाईंत घेतलीं; आणि मार्शल जुर्डा याचा अधिकाराचा सोटा सांपडला. फौजांचे जमावांतून सातशें मेले, आणि चार हजार जखमी झाले; परंतु फ्रेंच यांचे यापेक्षां अधिक पडले.

त्याच महिन्याचे २३वे तारिखेस जनरल ग्रेम व लुगां यांस शत्रूंस धरावयाकरितां पाठविलें. त्यांनीं २५वे तारिखेस टोलोसा शहरानें बहुत टिकाव धरिला असतांही तें घेतलें. २६वे तारिखेस सर रौलंड हिल यानें पांपिलुना एथें तळ दिला,

आणि जुलै महिन्याचे १२ वे तारिखेस जनरल ग्रेम यानें सेंट सिबास्तियन यावर हल्ला केला. या दुसरे ठिकाणचें ठाणें तटसहित त्यानें १७ वे तारिखेस घेतलें, आणि २५ वे तारिखेस किल्ल्यावर हल्ला केला. परंतु तट जेथें पाडिला होता, त्या ठिकाणीं तोफांचा भडिमार इतका होताकीं, शेवटीं एक हजार दोनशें सत्तर लोक मरून ब्रिटिश फौज मागें हटली.

जुलै महिन्याचे पहिले तारिखेस मार्शल सुल्ट यास स्पेन देशांतून बाहेर काढलेले फौजेचे सरदारपणावर जर्मनी एथून पाठविलें. आणि २४ वे तारिखेस तो आपली फौज पिरिनीज पाहाडांतून घेऊन चालला होता. दुसरे दिवशीं दोनही फौजांची गांठ पडून आगस्ट महिन्याचे दुसरे तारिखेपर्यंत मोठें युद्ध झालें, आणि स्पेन देशाच्या त्या भागांतून पुनः शत्रू निघाले.

आगस्ट महिन्याचे ३१ वे तारिखेस सरटामस ग्रेम याचे हाताखालचे ब्रिटिश व पोर्तुगीझ यांचे एके टोळीनें सेंट सिबास्तियान यावर हल्ला केला, आणि आंतून तोफांचा मार चालला असतां, आणि वर चढावयास वाट नसतांही बहुत उपाय करून

सुमारें तीन तासांचे आंत तें घेतलें, आणि पुढें सप्तें-बर महिन्याचे १८ वे तारिखेस किल्लाही शत्रूंनीं स्वाधीन केला. तेव्हां सुमारें १८०० लोक रखवालदार होते ते कैद झाले, व लढाईचें सामान वगैरे सर्व घेतलें.

लार्ड वेलिंग्तन यानें आकटोबर महिन्याचे ७ वे तारिखेस फ्रान्स देशांत लढाई केली, आणि नावार प्रांताची राजधानी पांपिलुना एथील किल्ला हस्तगत झाल्यामुळें स्पेन देशाचे त्यामुलुखांतून शत्रूंचा अंमल नाहीं असा झाला.

सन १८१४ माहे जान्युआरी तारीख २५ ते दिवशीं राज्यांत चहूंकडून शत्रु शिरूं लागले होते, त्यांचा मोड करण्याकरितां बोनापार्ट आपले फौजेचा सरदारपणा करण्यासाठीं पारिस शहरांतून निघाला. त्याचे पूर्वी १० वे तारिखेस बर्थियर निघाला होता. त्यानें २४ वे तारिखेस राज्याचा कारभार दुसऱ्यानें आपले बायकोचे स्वाधीन केला, आणि तिनें मोठे माठे मानकरी व प्रधान यांचे समक्ष शपथ घेतली.

यानंतर बहुत लढाया झाल्या, परंतु हा ग्रंथ संक्षिप्त म्हणून त्या सर्वांचें सविस्तर वर्तमान लिहिता येत नाहीं. सारांश हाकीं लढायांमध्यें उभयप-

क्षींच्या फौजा मोठमोठे पराक्रम करीत, आणि दोनही पक्षांचे जय होत असत. पुढें बोनापार्ट लढाई करण्यासाठीं बाहेर गेला असतां बुर्बो याचें निशाण लोकांनीं फ्रान्स देशांत लावलें. मार्च महिन्याचे १२ वे तारिखेस सरविलियम बेर्स्फोर्ड आपले फौजेंसहित मोठेपणा, पैका, व लोकांची वस्ती यांमध्यें पारिस शहराचे खालचे शहर बोर्डो एथें गेला. मेयर, कामगार व मुख्य लोक, कित्येक गाडयांत बसून व कित्येक पायीं चालणारे असे बरोबर घेऊन त्यास सामोरा गेला. त्याचे शरीरावर बोनापार्ट याचे राज्यांचीं चिन्हें घातलीं होतीं, तीं त्यानें मार्शल बर्स्फोर्ड याजवळ येतांच पायांखालीं तुडविलीं. या वर्तणुकीची अतिशय प्रशंसा झाली, आणि मार्शाल यास लोकांनीं मोठ्या समारंभानें शहरांत नेलें. त्यांत चवऱ्यायशीं तोफा व गुप्त शस्त्रांच्या शंभर पेट्या सांपडल्या.

फौजांचे जमावा बरोबर बहुत लाहान लढाया झाल्यावर मार्शल मार्टियर आणि मार्मो, हे फ्रेंच राजधानींत हटून गेले. तेथें शत्रु येऊन पोंचण्याचें कांहीं दिवसांपासून भय पडलें होतें. जनराल

जिराई याचे फौजेची एक टोळी जनराल कोंपां याचे हाताखालीं सुमारें आठ हजार सरकार चाकर शिपाई व तीस हजार नाशनल ग्यार्ड्स, शहरचा कमांडांट झ्युली याचेहाताखालींरखवालीइतकेलोक होते. इतकी फौज घेऊन जोझप बोनापार्ट (एंपरर याचा भाऊ) यानें बेलूविल याचे डोंगरावर तळ दिला. त्या प्रसंगीं फौजांचे जमावाचा पूर्ण विजय झाला; बेलूविल डोंगर प्रुशियन फौजेनें मोठे शूरपणानें साध्य केला, पांटिं खेडें बंदुकींचा हल्ला करून घेतलें, आणि शूर बुकर यानें मार्मो यावर हल्ला सुरू केला. इतक्यांत मार्शल मार्मो यानें तहाचें निशाण देऊन निरोप पाठविला कीं, पूर्वीं तुम्ही तहाचें निशाण पाठविलें होतें, तेव्हांचें काय बोलणें असेल तें ऐकावयास मी आतां सिद्ध आहें. त्यानें पारिस शहरचे बाहेरचे सर्व तळ उठवावयाचे करारानें लढाई चार तासपर्यंत बंद असावी, असें सांगून पाठविलें. तें त्याचें म्हणणें कबूल केलें, व पुढें लवकरच पारिस शहरही जमलेले राजांचे स्वाधीन झालें. नंतर रुशिया एथील एंपरर, प्रुशिया एथील राजा, हे सर्व आपले मोठमोठे सरदार व फौज बरोब-

र घेऊन दोन प्रहरांचे सुमारें पारिस शहरांत शि-रले, आणि तेथें तव दिला. त्यावेळेस सर्व लोकांनी संतोषानें बहुतच उत्साह केला, तो ज्यांनीं पाहिला असेल त्यांच्या मात्र चांगला मनांत येईल.

नंतर त्या एकमत झालेल्या राजांनीं जाहीर केलें कीं, यानंतर बोनापार्ट व त्याचे कुटंबांतील कोणी पुरुष, यांचा आमचा कांहीं संबंध नाहीं, व फ्रान्स एथील लोक जशी राज्यरीति कबूल करितील तशी आम्ही स्थापूं. या जाहिरातीनंतर लोकांची सभा होऊन पुढें चांगला बंदोबस्त होईतंवपर्यंत कारभार पाह्राणारे नेमून त्यांत बेनिवेंटो याचा प्रिन्सटालिरां यास मुख्य केलें. तेथें असें ठरलें कीं, बोनापार्ट व त्याचें कुटुंब यास राज्याविषयीं कांहीं अधिकार नाहीं म्हणून पूर्वीं लोकांनीं व शिपायांनीं ज्या शपथा घेतल्या आहेत त्या सुटल्या. पुढें राजा कोण करावा, याविषयीं बहुत विचार होऊन शेवटीं बुर्बो वंशांतील कोणी स्थापावा असें ठरलें.

हें वर्तमान एंपरर आलिकझांडर यास समजतांच, त्यानें एक मत झालेले राजांचें नांवें ड्युक विसेंझा याचे हस्तें बोनापार्ट यास निरोप सांगून पाठविला कीं, आपले मर्जीस येईल ती जागा सांगून तेथें आ-

पले कुटुंबासहवर्तमान जाऊन राहावें. एप्रिल महि-
न्याचे १ले तारिखेस बोनापार्ट यानें फोंटेंब्लो
एथील फौज आपलीच असें समजून तिची हजि-
री घेतली, आणि मार्शाल व जनरोल त्यास ऐ-
कावया जोगें मोठ्यांनी बोलत असत, तथापि तो ति-
कडे लक्ष्यच देईना. ती फौजेची हजीरी संपल्यावर मा-
र्शलने यानें वाड्यांत जाऊन, पारिस शहरांत मोठा फे-
रफार झाला तो कळला काय ? असें त्यास विचारिलें.
त्यास तें सर्व गाऊक असतां मला कांहीं कळलें नाहीं,
असें त्यानें स्वस्थ चित्तानें उत्तर केलें. नंतर मार्शलने
यानें त्यास पारिस शहरचीं छापलेलीं वर्तमानपत्रें दि-
लीं, तीं त्यानें मोठें लक्ष्य दिल्यासारिखें करून वाचलीं;
आणि कांहीं विचार करून आपण राज्य सोडून आप-
ले मुलास दिलें असा कागद सही करून पारिस एथील
कारभाऱ्यांस पाठविला. तो त्यांनीं मोठ्या तिरस्कारानें अ-
मान्य केला, म्हणून त्यानें एप्रिल महिन्याचे ६वे तारि-
खेस आपण व आपले वारिसदार यांस फ्रान्स व इ-
टली या दोनही देशांचे राज्यांविषयीं संबंध नाहीं असें
कागदावर सही केली. नंतर त्यास चांगली नेमणुक
करून देऊन एल्बा याठिकाणीं त्यानें राहावें असें

ठरविलें. त्याचे बायकोस एक मोठें राज्य दिलें, व तिचे मागें तिचा मुलगा रोम एथील राजा, त्यानें प्रिन्स आफ पार्मा या किताबानें त्याचा उपभोग घ्यावा असें ठरविलें.

असा बोनापार्ट याचा मोड झाला, म्हणून फार संतोष पावून लोकांनीं तीन रात्रीपर्यंत दिव्यांची शोभा केली, तशी पूर्वीं कधीं झाली नव्हती.

पूर्वीं एक फ्रेंच राजा कैद करून लंडुन शहरास आणिला होता, परंतु फ्रेंच राजास शत्रूंपासून आश्रय देऊन त्याचें राज्य सोडवून त्यास पुनः स्वदेशीं पाठविण्याचा शुभ दिवस एप्रिल महिन्याचे २० वे तारिखेस आला. नंतर २३ वे तारिखेस तो फ्रेंच राजा लंडुन शहरांतून निघून मोठ्या समारंभानें वाट चालून मे महिन्याचे ३ रे तारिखेस पारिस शहरास गेला. तो दिवस स्वच्छ आणि निरभ्र होता, आणि त्यादिवशीं लोकांस बहुत संतोष झाला. रात्रीं लोकांनीं दिव्यांची मोठी शोभा करून लुईस १६ वा याचे पूतळाजवळ दारूकामें लाविलीं.

जून महिन्याचे ६ वे तारिखेस रुशिया एथील एंपरर, प्रुशिया देशाचा राजा, जनरल बुक-

र ड्यार्क व दुसरे कित्येक मोठमोठे सरदार डोवर बंदरास उतरून दुसरे दिवशीं लंडन शहरास आले. तेथें नुकताच लुइस राजाचा जसा सत्कार झाला होता, तसाच त्यांचाही झाला. राजपुत्र रीजंट यानें त्यांस वारंवार मोठमोठ्या मेजवान्या केल्या. त्यावरून इंग्लंड देशाची समृद्धि त्यांचे लक्ष्यांत आली, आणि त्यांनीं सर्व युरोप जुलुमापासून मुक्त करण्यासाठीं बहुत मेहनत केली, म्हणून लोकांचा त्यांविषयीं आदर ही प्रगट झाला.

ग्याझेट वर्तमानपत्राचा अधिक एक कागद जून महिन्याचे २रे तारिखेस छापून जाहीर केलें कीं, गेले रात्रीस फ्रांटा साहेब बाहेर देशाचे कारभाराचे वाड्यांत ब्रिटिश व फ्रेंच या दोघांमध्यें शेवटचा कायम तहनामा तयार करून घेऊन आला आहे. त्या महिन्याचे २०वे तारिखेस तह झाला असें प्राचीन चालीप्रमाणें जाहीर केलें.

असा विजय होऊन फार दिवसांची व मोठी लढाई संपली, म्हणून जुलै महिन्याचे ७वे तारिखेस राजपुत्र रीजंट याचे सखे व चुलत भाऊ, पार्लमेंट सभेंतील गृहस्थ, मोठमोठे कामगार, न्यायाधीश, व दुसरे लोक, या सर्वांनीं सेंटपाल याचे देवळांत मो-

ठ्या समारंभानें जाऊन ईश्वराचा स्तव केला.

आगस्ट महिन्याची १ली तारीक सोमवार ते दिवशीं इंग्लंड एथील तक्तावर ब्रनूस्विक एथील कुटुंबाचा मूळ पुरुष बसला; तो, व नैल नदींत जय झाला तो दिवस म्हणून लोकांनीं उत्साह करावा असें ठरवून पार्क एथें लोकांचा मोठा जमाव झाला, आणि रात्री सर्पेंटैन नदीवरील लढाईचीं चित्रें लाविलीं, आणि फार दारूकाम जाळलें.

सन १८१४ चे शेवटीं ग्रेटब्रिटन व अमेरिका एथील युनैटेडसटेट्स या दोघांमध्यें लढाई चालली होती ती संपली, आणि डिसेंबर महिन्याचे २४वे तारिखेस घेंट एथें तहाचे मूळ कलमांवर कमिशनर यांनीं सह्या केल्या, व पुढें थोडे दिवशीं प्रिन्स रीजंट यानें तीं काईम केली

तेव्हां लोकांस असें वाटलें कीं यापुढें युरोप एथें फार दिवसपर्यंत स्वस्थता राहील, आणि व्यापार व कळा कौशल्यें ही वाढून सर्व सुखी आणि तृप्त होतील; परंतु बोनापार्ट याचे बुद्धीस विश्रांति नव्हती, म्हणून त्यानें पुनः आपलें राज्य घेण्याची मसलत केली, व त्याचे स्नेही फ्रेंच दरबारांतही फार होते म्हणून त्यांनींही मद-

त करून बंड उत्पन्न केलें. आणि लढाईचा प्रसंग आणिला.

कर्नल क्यांपबेल म्हणून ब्रिटिश कमिशनर एल्बा एथें होता, तो फ्लोरेन्स यास गेल्यावर मागें बोनापार्ट फेब्रुआरी महिन्याचे २६ वे तारिखेस एके गलबतावर बसून गेला, व त्याचे मागून पोल, कार्सिकन, नेपोलिटन, व एल्बा एथील लोक सगळे मिळून अकराशें चार लहान गलबतांवरून गेले. मार्च महिन्याचे १ले तारिखेस ते लोक जुआन एथील समुद्रांत कान्स एथें उतरले, आणि त्याच संध्याकाळीं तीन हजार शिपायांचें जेवण तयार करण्याचा हुकुम मेयर यास आला. दुसऱ्या तारिखेस बोनापार्ट तेथून निघून तीन दिवसांनीं ग्रिनोबल शहरास गेला. त्या शहरांत रखवालदार व लढाऊ पल्टनें होतीं, व तेथें जनरल मार्चांड सरदार होता, आपला पक्ष शिपायांस आहे असें समजून बोनापार्ट आपली छाती उघडी टाकून बोलला, " शिपाई हो, मी मृत्यूस भितों असें तुम्ही ऐकिलें आहे. बरें माझी छाती एथें आहे, तर तुमची मर्जी असल्यास यावर गोळी मारा." यावर शिपायांनीं " एंपरर

बहुत वांचो" असा शब्द करून उत्तर दिलें, आणि ते त्यास मिळाले.

बोनापार्ट यास ग्रिनोबल एथें लोकांचा बहुत पुरावा झाल्यावर तो लीन्स शहरावर गेला. तेथें ११०००० लोकांची वस्ति होती. एथें लोकांस वास्तवीक राजाचे पक्षाचें अगत्य होतें, आणि त्यांनीं राजाचा भाऊ ड्युक आर्लियंन्स, मार्शल माकुडनल्ड, आणि जनरल सेंसिर हे पारिस शहराहून आले तेव्हां त्यांची आदरानें भेट घेतली: परंतु तेथील रखवाली सरदारांस बोनापार्ट याचा पक्ष होता, व ते शिपाई " बोनापार्ट बहुत वांचो." असे शब्द करीत त्यास मिळाले. नंतर राजाचा भाऊ व मार्शल माकुडनाल्ड, मेयर वगैरे ८ वे तारिखेस शहराहून निघून गेले.

मार्शलने यानें पूर्वीं राजाचा पक्ष फार दाखविला होता, परंतु त्यानेंच आतां जाहीर नामा लाविला कीं बुर्बो घराण्यास राज्याचा अधिकार अगदीं नाहीं, म्हणून सर्व शिपायांनीं बोनापार्ट यास मिळावें. मग त्यानें आपले हाताखालचे सगळे फौजेची प्रतिज्ञा सही केलेली सरकारास पाठविली. ती अशी

कीं, आम्ही लुइ १८ वायांचे पक्षाची लढाई करणार नाहीं, परंतु बोनापार्ट यासाठीं आपलें सर्व रक्त पाडूं.

त्या महिन्याचे १९ वे तारिखेस बोनापार्ट यानें समारें पंधरा हजार बळकट फौज, व आपले डावे व उजवे बाजूस दुसऱ्या टोळ्या घेऊन फांटेब्लो एथें तळ दिला. त्यानें पुढें जाऊं नये म्हणून १०००० लोक मिळून एथें जमले, आणि त्यांचीं मनें राजाकडे होतीं, म्हणून त्यांवर त्याचा सर्व भरंवसा होता.

विसावे तारिखेस सकाळीं राजाची फौज लढाईची तयारी करून फांटेब्लो व पारिस यांचे वाटेवर डोंगराचे खालचे बाजूस सकळ जागेंत वाट पाहत होती; इतक्यांत प्रथम घोडयांचे पाय ऐकावयास येऊं लागले, आणि पुढें बोनापार्ट याचा उघडा रथ व बरोबर कांहीं थोडे स्वार असे जलद यांचे नजीक येऊन पोंचले. त्यांस पाहातांच राजपक्षाचे लोक "बोनापार्ट बहुत वांचो," इत्यादि विजयाचे शब्द करीत लागलेच त्यास मिळाले, आणि तोही आपले उजवे बाजूस बर्त्रांड, आणि डावे बाजूस डुए यांस घेऊन हात वर करून शिपायांस म्हणाला कीं; "माझे मित्रहो, युद्धांतील माझे सोबतीहो, तुमची अबरू

कीर्ति आणि देश राखावयास मी आलों." नंतर आपला हुकुम चालेना, आणि दंगा होऊं लागला असें पाहून राजाचे सरदार पळाले. शिपाई लोक आनंदानें ओरडूं लागले, आणि इकडले व तिकडले लोक वैर सोडून एकमेकांस भेटूं लागले. यारीतीनें तो जुलुमगार बोनापार्ट पुनः एकदां पारिस शहरास येऊन पोंचला. तो यण्याचे पूर्वींच हतभाग्य राजा तेथून निघून लील शहरास गेला होता. तेथून निघून त्यास लवकरच घेंट एथें जाणें प्राप्त झालें.

आतां बोनापार्ट यास वाटलें कीं आपलें राज्य स्थिर झालें, परंतु हें वर्तमान पूर्वींचे एकमत झालेले राजांस कळतांच त्यांनीं तो लुच्चा असें जाहीर करून, सर्वांनीं मिळून त्यास मोडावें असा तह केला. तें जाणून त्यानेंही इकडे आपले फौजेचा बंदोबस्त व तयारी करून त्यांनीं आपले राज्यावर हल्ला करावयाची वाट न पाहतां बेलजियम प्रांतांत जाऊन तेथें पराक्रम करून शत्रूंचा मोड करण्याची मसलत केली.

यावेळानें तो बोनापार्ट पारिस शहरांत आपले मागें कारभार चालवावयाकरितां जनरल सि-

बास्तियानी, ग्री नियर, वांमो, आणि कपानो यांस ठेवून जून महिन्याचे ११ वे तारिखेस निघाला. तो १३ वे तारिखेस आवेन एथें पोंचला; आणि त्याठिकाणीं शत्रूंवर अकस्मात् हल्ला करावा अशे बेतानें त्यानें शिपायांस सांगितलें कीं १४ वी तारिख मारिंगो व फ्रीड्लंड एथें लढाया झाल्या, तो दिवस आहे; आणि ज्यांस धैर्य आहे, अशे सर्व फ्रेंच लोकांस जय मिळविण्याचा किंवा मरण्याचा हा क्षण आला आहे.

असा लश्करास उपदेश करून त्यानें आपली फौज उद्योगास लाविली. सांबर नदीवर प्रुशियन यांनीं नळ दिला होता, परंतु त्यांवर त्यानें १५ वे तारिखेस सकाळीं हल्ला केला; आणि त्या दिवसांत त्यांस नदीपासून मागें हटवून थुइं यापासून फुरस यापर्यंत सुमारें १६ मैल जमीन साध्य केली; आणि तशीच ब्रसल याचे वाटेवर बेल्जियन फौजेस कादरब्रा एथें सुमारें १२ मैल मागें हटविलें, बेल्जियन यांस फिरून पुरावा होऊन त्यांनीं गेलेले जमिनींतून कांहीं पुनः घेतली; परंतु संध्याकाळीं विजय बोनापार्ट याकडचाच होऊन त्यानें शार्लि-

रोआ एथें तळ दिला.

ही बातमी ड्यूक वेलिंग्तन यास रात्रीं समजली, तेव्हां तो तत्क्षणीं आपले फौजेसहित निघाला. सर टामस पिक्टन याची टोळी, ड्युक ब्रन्स्विक याचें लश्कर, आणि नासो टोळी इतकें लश्कर सोळावे तारिखेस दोन प्रहरांनंतर दोन तास दिवसाचे सुमारें काटरब्रा एथें पोचलें. तेथें शेवटीं एर्लन आणि रेल यांचें पायदळ व किलेर्मा याचे हातारवालची स्वारांची टोळी यांनीं त्यांचा अगदीं मोड केला, व शूर ड्युक ब्रन्स्विक मारिला गेला. त्यांनीं प्रुशियन यांवरही लिग्नी एथें हल्ला केला, आणि मोठी लढाई होऊन प्रुशियन सुमारें १४ मैल अंतरावर ववर एथें, आणि ब्रिटिश सुमारें १६ मैल अंतरावर वाटर्लू एथें आपल्या मकाणावर येऊन राहिले. ते असे कीं जसा प्रसंग पडेल तसी दोघांनीं एकमेकांस मिळून मदत करावी, किंवा दोघांनीं शत्रूंचे पाठीस लागावें.

त्या महिन्याचे १७वे तारिखेस कांहीं मोठें वर्तमान घडलें नाहीं; परंतु दुसरे दिवशीं ग्रांडाम याचे टोळीवांचून सर्व फ्रेंच फौजेचा मार ड्यूक वेलिंग्

तन याचे लश्करावर पडला. त्याचें लश्कर त्यावेळेस ब्रसल्स शहराहून १५ मैल अंतरावर शार्लिरो आ- व निवेल्स यांपासून ज्या वाटा जातात त्यांवरून आ- त होतें.

ब्रिटिश फौजेनें तळ दिला होता, त्या ठिकाणीं त्यांचे उजवे बाजूचे समोर फ्रेंच यांनीं मोठा हल्ला क- रून लढाई सुरू केली. तसाच त्यांचे सर्व लश्करावर तो- फांचा मार चालू केला, आणि वारंवार पायदळ व स्वा- र यांचे रात्रीं सात तास वाजत तंवपर्यंत हल्ले केले, आ- णि तेव्हां त्यांची डावी बाजू हटवावयाकरितां मोठा प्र- यत्न केला, परंतु त्यांत मोठी लढाई होऊन फ्रेंच यांचा मोड झाला, आणि त्यांची फार धांदल होऊन ते मागें हटले. अशे संकटसमयीं शूर ड्युक वेलिंग्तन या- नें आपलें सर्व पायदळ, व त्यांचे मागून स्वार आणि तोफखाना शत्रूंवर घातला. तेव्हां फौजेची पहिली ओ- ळ मागें हटून दुसरीवर पडली, आणि ती पडतांच दुसरी लागलीच मोडली. नंतर फ्रेंच यांची इतकी धांदल झाली कीं, त्यांनीं आपला सर्व तोफखाना, बुणगें, व दुसरें सर्व सोडून दिलें, आणि ब्रिटिश जन- रल याचा उद्योग सफळ झाला.

याप्रसंगीं बोनापार्ट यानें लढाईंत १३०००० लोक आणिले होते. त्यांनीं मोठ्या निकरानें ही लढाई केली, परंतु या पळण्यानंतर ते आपलीं शस्त्रें टाकून जिकडे तिकडे गेले.

जनरल बुलो आपण शत्रूंचे बाजूस राहून प्रुशियन स्वारांचे १६ पलटणीसहित सारे रात्रभर त्यांचे पाठीस लागला, त्यामुळें सारे वाटभर मेलेले व मरणारे लोक, शस्त्रें, बुणगें, हीं पडत गेलीं, आणि बोनापार्ट याचा बसावयाचा रथ, तबक, आणि कागद विजयी लोकांचे हातीं लागले. सुमारें तीनशें तोफा, व सुमारें १४००० बंदिवान सांपडले. फ्रेंच यांचे मेले व जखमी मिळून ५०००० लोक पडले, व फौजांचे जमावांतून तीस हजार पडले.

आपले फौजेची अशी फाटाफूट झाली पाहून बोनापार्ट मोठ्या त्वरेनें विसावे तारिखेस रात्रीस पारिस शहरांत आला, आणि त्यानें दुसरे दिवशीं आपले प्रधानांस स्पष्ट सांगितलें कीं माझी फौज अतां राहिली नाहीं. तेव्हां प्रांतांचे वकील यांनीं आपली बैठक आतां शाश्वत असें जाहीर केलें, आणि त्या दिवसांत त्याकडून राज्य सोडून त्याचे मुलाचे नांवें लिहिण्या-

ण्याची मसलत करविली. त्यावर चेंबर* यांनीं एकमत-
तीचा निरोप पाठविला, परंतु त्याचे मुलाचे अधिकारा-
चा विचार शाहाणपणानें चुकविला.

फ्रेंच फौजेंतून जी बाकी राहिली होती ती लो-
न शहरास गेली. मग कांहीं अडचण नपडतां फौजां-
चा जमाव वाटर्लू एथून पारिस शहरास गेला. त्यां-
चे शहर सर चार्लिस कालविल यानें तटांवर चढु-
न घेतलें. सेंट क्विंटन, मार्शल ब्लूकर याचे हातीं
लागलें; आणि दुसरे बहुत पराक्रम केले. असें सर्व
झाल्यानंतर कीर्तिमान वेलिंगतन आणि ब्लूकर हे
जुलै महिन्याचे ६ वे तारिखेस पारिस शहरांत शिर-
ले, आणि ८ वे तारिखेस त्यांनीं राजास आपले पूर्व-
जांचे वाड्यांत आणिलें.

नंतर बोनापार्ट अमेरिका देशांतील युनै-
टेड् स्टेट्स प्रांतांत जाण्याचे बेतानें राशफोर्ट ए-
थें गेला. परंतु त्या कांठाजवळ अरमार ठेविलें हो-
तें, त्यास चुकवून जाण्याची संधि बहुत दिवसपर्यंत
पाहून शेवटीं त्यानें राजपुत्र रीजंट यास विनंतीप-
त्र पाठविलें कीं, आतां मला आश्रय द्यावा. परंतु हा

---

* सभा.

त्यांचा मनोरथ सिद्धीस गेला नाहीं, कारणकीं, सर्वांनीं एकमत करून त्यास सेंटहेलीना बेटास पाठवावें असें योजिलें होतें. पुढें त्यास जनरल बोनापार्ट असा मात्र किताब देऊन तेथें पाठविलें.

फ्रान्स व एकमत झालेले राजे यांमध्यें तहनामा ठरावयास कांहीं दिवस लागले, परंतु शेवटीं त्यावर पारिस शहरांत नोवेंबर महिन्याचे २० वे तारिखेस सह्या झाल्या.

ब्रिटिश पार्लमेंट सभेची बैठक कमिशन यांनीं चालू केली, आणि चहूंकडून अर्ज्या फार आल्या, त्यामुळें एकुस्चेकर याचा चान्सेलर यानें जिनगीवरचा कर पुनः चालू करण्याचा बेत योजिला होता, तो राहिला.

मार्च महिन्याचे १४ वे तारिखेस राजपुत्रापासून निरोप आल्यावरून राजकन्या शार्लट इचें प्रिन्स लिओपोल्ड आफ साक्स कोबर्ग याशीं लग्न झाल्यावर, त्या दोघांस मिळून ६०००० पौंड नेमणुक करून दिली, व करार ठरविलाकीं, राजकन्या अगोदर मेल्यास ५०००० पौंड नेमणुक चालावी. प्रिन्स यास ब्रिटिश प्रजांचा अधिकार येण्याकरितां एक कायदा केला, आणि प्रारंभीं खर्चासाठीं दुसरे ६००००

पौंड दिले. मे महिन्याचे २रे तारिखेस कार्ल्टन हौस एथें त्या दोघांचें लग्न मोठ्या उत्साहानें झालें; आणि राज्यांतील सर्व प्रदेशांतून स्तुतिपत्रें येऊं लागलीं. जुलै महिन्यांत राजकन्या मेरी व तिचा चुलतभाऊ ड्युक ग्लास्तर या दोघांचें लग्न झालें, आणि पार्लमेंट सभेनें त्या दोघांचा चांगले रीतीनें चरितार्थ चालावया जोगी नेमणूक करून दिली.

आफ्रिका खंडामध्यें आल्जियर प्रांतांतील लोकांनीं समुद्रांत चांचेपणा आरंभिला, आणि बोना एथें पोंवळी समुद्रांतून काढण्याचे उद्योगांत कित्येक क्रिस्तियन लोक लागले होते, त्यांचा त्यांनीं निर्दयपणें प्राण घेतला होता; म्हणून त्यांचें पारिपत्य करण्यासाठीं लार्ड एक्स्मौथ मोठें अरमार घेऊन निघाला; जिबराल्टर शहरास येतांच त्यानें आल्जियर्स एथील इंग्लिश वकील व त्याचें कुटुंब आणावयाकरितां एक गलबत देऊन क्यापटन डाश्वूड यास पाठविलें. परंतु इंग्लिश वकीलास तेथील डे यानें कैद केलें होतें, आणि तो त्यास सोडीना, त्याचे कुटुंबाचीं माणसें मात्र गुप्तवेषानें पळून गेलीं होतीं. २७ वे तारिखेस अरमार दृष्टीचे टप्प्यांत आलें,

आणि लार्ड एकुस मौथ यानें तहाचें निशाण पाठविलें. त्याचें उत्तर आलें नाहीं, म्हणून गलबतें आपापले ठिकाणीं जाऊन तोफांचा मार चालविला, तो संध्याकाळीं तीन तासांपासून नऊ तासपर्यंत चालला होता. त्यावर डे यानेंही धक्क्यावरून व शहरांतील उंच ठिकाणांवरून तोफा मारिल्या, परंतु दुसरे दिवशीं सकाळीं डे आणि त्याचे प्रधान यांनीं, जिकडे तिकडे ओसाड झालें. व ४४ तोफांचीं चार मोठीं फ्रिगेट, २४पासून तीसपर्यंत तोफांचीं गलबतें पांच, आणि कित्येक तोफांच्या होड्या, आणि दुसरीं बहुत जाहाजें फुटलीं; आणि तोफखाना, कोठारें आणि अरमाराचें सामान सर्व खर्च झालें, असें पाहून त्यांची हिमत खचली. मग लार्ड एकस् मौथ यापासून दुसरें पत्र येतांच डे याचे करारांस मान्य झाला. ते करार हे. सर्व क्रिस्तियन बंदिवान फुकट सोडावे, त्यावर्षांत नि आ पोलिटन किंवा सर्डेनियन मोकळे करण्याबद्दल जो पैका घेतला असेल तो परत द्यावा, पुढें लढाईंन धरलेले बंदिवानांस युरोपियन लोकांचे चालीप्रमाणें वागविण्याचें वचन द्यावें; आणि असाच तह नेदर्लंड एथील राजाशीं करावा. हा करार डे यानें मान्य केला, आणि

इंग्लिश वकीलास कैद केल्याबद्दल त्याजवळ क्षमा मागितली. नंतर सप्तंबर महिन्याचे ३ रे तारिखेस लार्ड एक्स्मौथ तेथून निघून आला.

इकडे देशांत फार दिवस लढाई चालली होती, ती अकस्मात् बंद झाल्यामुळें कारागीर व मजूरी करणारे लोकांचा रोजगार नाहींसा झाला; आणि त्या वर्षीं पर्जन्य चांगला पडला नाहीं म्हणून गरीब शेतकरी लोकांस अन्नही मिळेना असें झालें, यामुळें बहुत ठिकाणीं सभा करून लोकांनीं या गोष्टीच्या कारणाचा विचार आरंभिला; आणि कर कमी करावे व कामन्स सभेंत फेरफार करावे अशा बहुत अर्ज्या पार्लमेंट सभेस दिल्या. या जातीच्या लोकांच्या दोन सभा वर्षाच्या अखेरीस इस्लिंग्टन् गांवाजवळ स्पाफील्ड्स् या ठिकाणीं झाल्या; त्यांतील शेवटच्या सभेंत वाट्सन् या नांवाचे एके जवानानें गाडींतून कांहीं दांडगेपणाचें भाषण करून कितीएक नव्या तऱ्हेचीं निशाणें दाखविलीं. त्यावरून लोक त्याचे पाठीमागून शहरांत शिरले. स्नोहिल एथें बेकिथ साहेबाचें दुकान लुटण्याचा उद्योग केला, तेथें प्लाट नामें गृहस्थ होता तो त्यास बोध करूं लागला, तेव्हां त्यानें त्यास पिस्तुलाची गोळी

मारून फार जखमी केलें. या अन्यायासाठीं त्यास धरून कै-
द केलें, परंतु पुढें गडबड झाली तींत तो पळून गेला. नंतरत्याचे
ड वाले लोकांनीं शहरांत जाऊन बहुत दांडगाई केली,
परंतु माजिस्त्रेट व लढाऊ शिपाई यांनीं मेहनत
करून त्यांस चहूंकडे घालवून दिलें.

जान्युआरी महिन्याचे २८ वे तारिखेस राज- इ.स. १८१
पुत्र पार्लमेंट सभेची बैठक चालू करण्याकरितां
स्वतः गेला होता. तो तेथून येत असतां कोणी त्यावर
गोफिणीचा दगड मारिला, तो त्याचे गाडीवर बसून
एक भिंग फुटलें. दुसरे महिन्याचे आरंभीं राजपुत्रा-
नें देशाचे स्थितीविषयीं निरोप पाठविल्यावरून
पार्लमेंट सभेनें हेबियस कार्पस कायदा कांहीं
दिवसपर्यंत तकूब करविला; राजाचे प्रमाणें राजपुत्रा-
चे शरीराचे संरक्षणाविषयीं कायदा केला, आणि लो-
कांचे मंडळ्यांविषयीं पूर्वीं झालेले कायद्यांची वहिवा-
ट चालू केली.

आबट साहेब पांच पार्लमेंट यामध्यें
कामन्स सभेंतील मुख्याचे ठिकाणीं होता, त्यानें मे
महिन्याचे ३० वे तारिखेस ती जागा सोडिली. तेव्हां
त्यांस लार्ड कोलचेस्तर असा किताब व प्रतिव-

षास ४००० पौंड नेमणुक होऊन तो लार्ड सभेंत गेला. जून महिन्याचे प्रारंभीं देशाचे स्थितीविषयीं दुसरा एक निरोप राजपुत्राकडून गेला, तेव्हां हेवियस् कार्पस कायदा फिरून तबूक केला. नंतर त्या महिन्याचे १२ वे तारिखेस राजपुत्राचें भाषण होऊन ती सभेची बैठक उठली.

स्पार्फील्ड्स् बंडांत वाट्सन, प्रेस्तन, हूपर, आणि थिस्लेवूड हे चार आसामी होते, म्हणून त्यांची चौकशी झाली, परंतु त्यांवर गुन्हा लागू झाला नाहीं म्हणून त्यांस सोडिलें. डर्वी एथें लोकांनीं फार लबाड्या केल्या होत्या, तेथील तीन आसामी ब्रांड्रेथ, लड्लाम, आणि टर्नर हे सरकारगुन्हेगार ठरून त्यांस ठार मारिलें. दुसरे त्यांचे साथी नऊ यांस त्यांपेक्षां कमी शासन केलें, आणि बारांस क्षमा केली.

राजकन्या शार्लट, जिचे लग्नाचें वर्तमान पूर्वीं लिहिलें, ती बाळंत होऊन नोवेंबर महिन्याचे ६ वे तारिखेस मृत्यु पावली, त्यामुळें राज्यांत सर्वांस फार दुःख झालें. तिचें शरीर विंड्सर एथें राजकुटुंबाचे कबरींत पुरलें, आणि त्यादिवशीं जो समा-

रंभ झाला, तो स्मरणांतून लवकर गेला नाहीं.

सेन १८१७ मध्यें युरोप खंडांतील राज्यांत कांहीं मोठा फेरफार झाला नाहीं. एंपरर आलेक्झांडर यानें हें वर्ष आपलें राज्य बळकट करण्यांत, व्यापाराची पेठी उत्पन्न करण्यांत, आणि बाहेरचे लोकांनीं आपले राज्यांत राहावें अशा मोई करण्यांत घालविलें. स्वीडन देशांत राजाचा जीव घेण्याकरितां बंड झालें होतें, तें कळल्यावर लोकांनीं राजाविषयीं आपला स्नेहभाव प्रगट केला. जर्मनी देशांत साक्सवीमर एथील संस्थानें स्वतंत्र राज्यरीति केली, परंतु विर्टिमबर्ग एथें राजानें जो विचार सांगितला, तो लोक मान्य करीतात, म्हणून त्यानें आपले संस्थानांची सभा रद्द केली. नेदर्लंड देशांत पूर्वीं चीन देशाचा व्यापार करणारी व्यापारी लोकांची एकच मंडळी होती. ती बंद करून तो व्यापार करावयास सर्वांस मोकळीक दिली, यामुळें सरकारची कीर्ति झाली.

जान्युआरी महिन्याचे २८ वे तारिखेस कमिशन यांनीं सभेची बेठक चालू केली, आणि त्याप्रसंगीं राजपुत्राचें भाषण वाचलें, त्यांत सांगितलें कीं गुलामांचा व्यापार अगदीं बंद व्हावा, याविषयीं स्पेन व पो-

तुगल एथील दरबारांशीं तह केले. राज्यांत क्रमें धंदा चांगला चालून वसूल वाढत आहे; आणि दुसरें सांगितलें कीं लोकही वाढत आहेत.

हेबियस कार्पस याची तकूबी मनाकरण्याविषयीं पार्लमेंट सभेंत निश्चय ठरला, त्यावर राजपुत्रानें देशाचे स्थितीविषयीं कित्येक कागद त्यांजवळ पाठविले. त्यांची चौकशी करण्याकरितां जी कमिटी नेमिली होती, तिनें तारिख २३ फेब्रुवारी ते दिवशीं रिपोर्ट केला कीं, पूर्वीं शासनें केलीं त्यामुळें चांगला बंदोबस्त झाला, परंतु लंडुन शहरांत मात्र कित्येक लबाड लोक आहेत. त्यांची चांगली चौकशी राखिली पाहिजे; व प्रधानांस पूर्वींचे बैठकींत जो अखत्यार दिला होता, त्याप्रमाणें त्यांनीं विचार पाहून कित्येकांस शासनें केलीं, व कित्येकांस सोडिलें. असा तो रिपोर्ट गेल्यानंतर सर्व बंडवाल्यांस माफीचा कायदा बहुत विघ्नें येऊन शेवटीं सर्वांचे संमतानें ठरला.

मार्च महिन्यांत दाहा लक्ष पौंड नवीं देवळें बांधण्याबद्दल नेमणूक केली.

एप्रिल महिन्याचे १३वे तारिखेस राजपुत्र रीजंट यानें कळविलें कीं ड्यूक क्लारन्स याचें प्रिन्से-

स मिचिंगन इशीं, व ड्यूक केंब्रिज याचें प्रिन्सेस हेसी इशीं अशीं, दोन लग्नें होणार आहेत. म्हणून त्या दोघेही राजपुत्रांचे पहिले नेमणुकीपेक्षां ६००० पौंड प्रतिवर्षास जास्ती वाढविले, आणि त्यांचे मागें त्यांच्या बायका वांचल्यास त्यांस तितकी नेमणुक पोंचावी असें ठरविलें. पुढले महिन्यांत ड्यूक केंट याचें लिनिंजेन एथील राजकन्येशीं लग्न झाल्यावर तितकीच नेमणुक व्हावी असें ठरविलें. त्या बैठकींत राजपुत्रांचे कारभाराविषयींचे कायद्यांत फेरफार केला, आणि गरीबांस विद्या शिकवा व याकरितां ब्रूम साहेबानें कायदा काढिला होता, त्याचा विचार करण्याविषयीं कमिटी नेमिली. त्या बैठकीचे शेवटीं पार्लमेंट सभेस निरोप झाला.

फ्रान्स एथें चांगली वहिवाट चालल्यामुळें एस्ला शापेल एथें युरोपियन राजांची सभा होऊन ठरलें कीं, आतां तेथें रखवालीकरितां बाहेरचे संस्थानांची फौज असणें जरूर नाहीं. असा विचार ठरून ती फौज जिकडची तिकडे गेली.

मे महिन्याचे ६ वे तारिखेस रिओडीजनेरो एथें भूमध्यरेषेचे उत्तरेस गुलामांचा व्यापार अगदीं बंद

व्हावा म्हणून पोर्तुगल एथील राजानें कायद्यां केला; तो असा कीं, तो व्यापार जे करितील त्यांवर कांहीं दंड बसविला; व या कायद्याप्रमाणें जे गुलाम सुटतील, त्यांचे चरितार्थाकरितां व रक्षणाकरितां बंदोबस्त केला. तथापि मध्यरेषेचे दक्षिणेस या व्यापाराचा कांहीं बंदोबस्त मात्र केला.

स्वीडन देशांत फेब्रुआरी महिन्याचे ६ वे तारिखेस राजा चार्लिस १३ वा मृत्यु पावला. नंतर पूर्वी जो बोनापार्ट याचे चाकरींत होता, तो जनरल बर्नाडोट त्या तक्ताबर बसला.

हिंदुस्थानांत पेंढारी व तेथील राजांचा जमाव यांशीं इंग्लिश यांस लढाईचा प्रसंग पडून शेवटीं पेशवा पदच्युत झाला, आणि मराठ्यांचें राज्य मोडलें. सिंहलद्वीपांतही कोणीं राजाचे कुटुंबांतील पुरुषानें बंड केलें होतें, परंतु तेथील गवर्नर सर आर ब्रौन् रिग याचे उद्योगानें तें मोडलें गेलें.

अमेरिका खंडांत युनैटेड स्टेटस एथील सरकार व इंडियन लोकांची एक जाति सेमिनोल्स म्हणून फ्लारिडा प्रांताचे कांठावर राहत होती, या दोघांशीं लढाया कांहीं दिवसपर्यंत चाल-

त्या ठिकाणच्या लोकांस कांहीं उपद्रव करूं देणार नाहीं असा स्पानिश यांनीं करार केला होता. त्या लोकांचे पाठीस लागून जनरल जाक्सन यानें फ्लारिडा प्रांताचे हद्दीपलीकडे जाऊन सेंट मार्क्स व पेन्साकोला हीं ठिकाणें घेतलीं, परंतु तीं पुढें लवकरच स्पानिश सरकारास परत दिलीं. यामुळें त्या दोनही सरकारांत कागदपत्रें चालू झालीं; आणि जनरल यानें ही गोष्ट, सभेस निरोप पाठविला त्यांत जाणविली.

इकडे इंग्लंड देशामध्यें त्यावर्षी पीक चांगलें आलें, कामधंदा वाढला, व लोकांचीं मनें पार्लमेंट सभेच्या नेमणुकीकडे लागलीं; त्यामुळें सर्वत्र स्वस्थता झाली. मांचेस्तर शहराजवळ मात्र कामकरी लोकांत कांहीं दुष्ट बुद्धि उत्पन्न झाली होती; परंतु लागलेच तेथें लढाऊ लोक आल्यामुळें त्यांच्यानें कांहीं दंगा करवला नाहीं.

राणीची प्रकृति कांहीं दिवसांपासून जलोदरामुळें क्षीण होत चालली होती, ती शेवटीं कित्येक दिवसपर्यंत फार दुःख पावून शेवटीं नवेंबर महिन्याचे १७ वे तारिखेस मृत्यु पावली, तिचें प्रेत विंडसर एथें पुरलें.

नवे पार्लमेंट सभेची बैठक जून महिन्याचे १४ वे तारिखेस झाली, आणि तींत प्रथम राणीचे मृत्यूमुळें विंडूसर एथील नेमणुक कमी करून ती दरवर्षास ५०००० पौंड ठरविली; व ड्यूक यार्क यास राजाचे शरीराची खबरदारी करण्याकरितां १०००० पौंड नेमणुक ठरविली. त्याच बैठकींत बांक यानें रोकड पैका देणें चालू करावें असा बंदोबस्त केला.

याच वर्षांत राज्यामध्यें लोकांच्या सभा होऊन सरकारास विरुद्ध गोष्टी उघड बोलून भयंकर बेत करण्याचा प्रारंभ झाला. त्या एक दोन सभांतील मुख्य बोलणारांस धरून जामीन घेतले व कैद केलें. नंतर आगस्ट महिन्याचे १६ वे तारिखेस मांचेस्तर एथील माजिस्त्रेट यानें स्वार आणिले म्हणून लोकांनीं दांडगाई केली, व इकडे समारे ६०००० लोक जमून पार्लमेंट सभेचे रीतींत फेरफार करण्याविषयीं अर्जी करावयाकरितां मिळाले. तेव्हां तेथील वक्ता हंट साहेब यास धरून कैद केलें, लोकांचीं निशाणें पाडलीं, व वय आणि पुरुष स्त्री हें न पाहतां सर्वांस स्वार तुडवूं लागले, आणि वार करूं लागले. त्यामुळें लवकर ती जमीन साफ झाली; व मेले, जखमी, व एऱ्हवीं फार दुखविले मिळून सगळे चारशें असा

हिंसाबीं सांपडला. यावरून लोकांनीं राजपुत्र रीजंट यास बहुत अर्ज्या केल्या; परंतु त्यांपासून कांहीं फळ नहोतां, लशा सभांचे वगैरे बंदोबस्ताविषयीं दुसरे बैठकींत नवे कायदे ठरले; आणि लहान लहान पुस्तकांवर कांहीं कर बसवून त्यांचे छापणारांविषयीं पुष्कळ बंदोबस्त केला.

नवे वर्षाचे प्रारंभींच नवीं दुःखें येण्याचा प्रारंभझाला. जान्युआरी महिन्याचे २३ वे तारिखेस, डेवनूशैर प्रांतांत सिडूमौथ एथें ड्यूक केंट (राजाचा मुलगा) खोकला होऊन मरण पावला. तें व्याधिदुःख ड्युक यानें मोठ्या विवेकानें सहन केलें, आणि त्याचे बायकोनेंही त्यास बहुत विश्रांति दिली; परंतु त्याचा मृत्यु जवळ आला, त्यास मनुष्याचा उपाय चालला नाहीं; आणि तो मेल्यावर विद्येचे मित्र आणि गरीब यांचा मोठा आश्रय, आणि इंग्लंड एथील राजकुटुंबाचें मोठें भूषण गेलें.

यापेक्षांही दुसरी मोठी वाईट गोष्ट घडली. राजाचें शरीर फार क्षीण होऊन तो जान्युआरी महिन्याचे २९वे तारिखेस शनिवारीं रात्रीं ८ वाजतां मृत्यु पावला. त्यावेळेस त्याचे वयास ८२ वें व राज्यास ६०वें वर्ष

होतें. त्याचें शरीर व त्याचे भीनींतील मुलाचें शरीर हीं दोनही विंडमर एथील राजकुटुंबाचे कबरींत पुरलीं. आणि ब्रिटिश राज्याचें प्रभुत्व चतुर्थ जार्ज राजाजवळ आलें.

या मायाळू राजास प्रजांचा बाप असें वास्तविक म्हणत असत, आणि तो एथून उत्तम लोकास गेला, तेव्हां त्यांनीं त्यासाठीं फार शोक केला. त्याची मान्य आकृति सर्वांचे नेत्रांपुढें दिसत असे. त्याचे गुण सर्वांचे हृदयावर लिहिले होते; आणि त्याची यथायोग्य स्तुति करण्यास आपणास सामर्थ्य नाहीं असें मोठे मोठे वक्ते, आणि ग्रंथकर्ते म्हणत आहेत.

समाप्त